# चिमणरावाचें चऱ्हाट

अथवा

शेंकडा शंभरांतल्या एका मनुष्याचें

आत्मचरित्र.








पाचें नाहीं असें डॉक्टरनीं सांगितलें आहे. (पृष्ठ ३४८)

# चिमणरावाचें चऱ्हाट.



सीताराम गंगाधर जोशी यांनीं काढिलेल्या
४ रेखाचित्रांसह.

लेखक आणि प्रकाशक
**चिंतामण विनायक जोशी**
दांडिया बाजार, बडोदें.

**कि. रु. २**

पुस्तकाची किं. २ रु. टपालखर्च ४ आणे.

**मिळण्याचीं ठिकाणें**

(१) व्यायामकार्यालय,--रावपुरा बडोदें;

(२) परचुरे पुराणिक, माधवबाग मुंबई ४;

(३) तु. पु. शेट्ये, माधवबाग मुंबई ४;

(४) केमकर गिरगांव ब्याक रोड मुंबई ४;

(५) महाराष्ट्र पब्लि. हौस, बुधवार पुणें शहर.

---

हें पुस्तक बडोदें येथें **कृष्णाजी वामन मराठे** यांनीं श्रीरामविजय छा. त छापून प्रो. **चिं. वि. जोशी** यांनीं उद्धवभुवन दांडियाबाजारांत प्रसेधिलें. २८--९--३३

---

हास्यकथांचे आचार्य

ती. कॅप्टन

गोपूमामा लिमये

यांस

# प्र स्ता व ना.



ज्याच्या लेखकानें कोणताहि नवीन उपक्रम सुरू केला नाहीं, ज्याच्या प्रसिद्धीनें महाराष्ट्र वाङ्मयांत कोणत्याहि प्रकारची क्रांति घडून येणार नाहीं आणि समाजांत खळबळ उडणार नाहीं असें हें पुस्तक दोनतीन वर्षांत पहिल्यानेंच प्रसिद्ध होत असलेलें पाहून वाचकांस हायसें वाटेल असा भरंवसा आहे.

चिमणरावाच्या चऱ्हाटाची छापखानी प्रत तयार करण्याच्या कामीं माझे तरुण मित्र **राजाराम यशवंत राऊत** यांनीं रात्रीचा दिवस करून निरपेक्षपणें सक्त मेहनत घेतली त्याचप्रमाणें श्रीराम-विजय छापखान्याचे उत्साही व्यवस्थापक मित्र रा. **कृष्णराव मराठे** यांनीं कामाविषयीं आपुलकीची भावना दाखवून हस्तलेखांतील दोष सुधारण्यासकट छपाईचें काम शुद्ध रीतीनें व त्वरित केलें आणखी तरुण चित्रकार **सीताराम गंगाधर जोशी** यांनीं हौसेनें व काळजीनें भावनादर्शी चित्रें काढून दिलीं त्याचप्रमाणें रा. **दि. ना. पुरंदरे** यांनीं कित्येक खर्डे तपासले याबद्दल या सर्व तरुण स्नेह्यांचे मनापासून आभार मानितों.

बडोदें, विजयादशमी
शके १८५५

लेखक.

# अनुक्रमणिका.







# माझा मुंबईचा प्रवास.



सन १९१५.



मी एक बडा प्रवासी आहें हें निदान महाराष्ट्रीय वाचकांस नव्यानें सांगण्याची जरूर नाहीं असें म्हणण्यास हरकत नाहीं असें मला वाटतें. मंगो पार्क, हंबोल्ट, स्वेन हेडिन, शरत्चंद्र दास यांच्यासारख्या प्रवाशांच्या मालिकेंत माझें नांव थोडक्याच दिवसांत झळकूं लागेल यांत शंका नाहीं, कारण मी आपल्या प्रवासवर्णनांचा संग्रह छापवून काढणार आहें, व त्याची प्रस्तावना एका अभिप्रायलोलुप प्रोफेसरां-कडून लिहून घेणार आहें. तींत ते माझें नांव वरील धाडसी प्रवाशांच्या यादींत गोंवतीलच आणि जर त्यांनीं तें गोंवलें नाहीं तर मी आपल्या पुस्तकाच्या जाहिरातींत तरी आपलें नांव त्यांच्या बरोबरीनें पुढें ढकलीन.

माझीं लांबलांबच्या प्रवासांचीं वर्णनें वाचकांच्या नजरेस वारंवार आलीं आहेतच. पुण्याहून मोरया गोसावी यांच्या उत्सवाकरितां चिंचवडापर्यंत रेल्वेनें मीं केलेला दहा मैलांचा लांबलचक प्रवास, चिंचवड स्टेशनापासून छकड्यानें गांवापर्यंत केलेला दीड मैलाचा त्रासदायक प्रवास व तेथील ब्राह्मणभोजनांत वाढले[ल्या] पदार्थांचें चटकदार वर्णन हीं वाचकांच्या ध्यानांतून शीघ्हि-नसतील अशी माझी खात्री आहे. हडपसरची गिरणी प. पास

करितां केलेला दौरा, राजयोगी नारायणबोवांच्या दर्शनाक-रितां केलेली केडगांवची सफर, कार्ल्याचीं लेणीं व टाटावर्क्स पहाण्याकरितां केलेली लोणावळ्याची सहल असे एकाहून एक लांबलांब आणि दुष्कर प्रवास करून आणि त्यांचीं वर्णन लिहून मीं पूर्वींच वाचकांस थक्क करून सोडलें; परंतु पुढें मला वाटलें असले आगगाडींतले प्रवास कोणीहि करील; पायगाडीचे अगर पूर्वींच्या काळच्या प्रमाणें बैलगाडीचे प्रवास करावे. ह्मणून मीं आळंदी, देहू, सिंहगड, पुरंदर, बनेश्वर आणि जुन्नर या ठिकाणचे प्रवास केले. दुपारचें जेवण टळो, एकाद्या वेळचा चहा टळो, डोक्यावरील सन् हॅटला न जुमानतां ऊन्ह लागो, वेळप्रसंगीं साय-कलवरून हापटी खाण्याचा प्रसंग येवो किंवा पायगाडीच्या धावेला भोंक पडो—कोणतेंहि संकट येवो, त्यास न जुमानतां वीसवीस कोसांचा प्रवास करण्यास हा पठ्या कधींहि डगमगला नाहीं. असे दुर्धर प्रसंग प्रत्यक्ष कोलंबसावर तरी आले असतील काय ? कोलंबसाच्या सायकलच्या धावेला भोंक पडून त्याला हाल सोसावे लागल्याचें कोणी ऐकिलें आहे काय ?

कित्येक वेळां असें होतें कीं, मीं दिलेल्या प्रवासवर्णनांतील हकीकती इतरांनीं लिहिलेल्या वर्णनांशीं हुबेहूब जुळतात, परंतु त्यास हरकत नाहीं. वाचकांस एकाच ठिकाणचीं [illegible]र्णनें पुन्हांपुन्हां वाचल्यानें तीं स्थळें विशेष [illegible]चित होतात; त्याचप्रमाणें एका लेखकाच्या हातून जर वर्णनां-[illegible] कांहीं भाग नजरचुकीनें गॅझेटियरमधून उतरून घेण्याचें [illegible] तर दुसऱ्या लेखकाच्या कडून ती उणीव भरून निघते;

शिवाय एखाद्या ठिकाणीं एका प्रवाशानें कोणत्या जिनसांचा फराळ केला व दुसऱ्या प्रवाशानें कोणत्यांचा केला हें वाचून वाचकांना त्या ठिकाणीं कोणत्या ऋतूंत कोणत्या जिनसा मिळतात याचें ज्ञान होतें. शिवाय हा प्रकार शिष्टसंमतहि आहे हें दिल्ली आग्रा, काशी, प्रयाग, गया, काश्मीर, कैलास, रामेश्वर, विजापूर, गोवा या ठिकाणांचे प्रवास अनेक शिष्ट जनांच्या हातून लिहिलेले निरनिराळ्याच काय पण त्याच त्याच मासिकांतून वारंवार दृष्टोत्पत्तीस येतात यावरून कोणाच्याहि लक्ष्यांत येईल.

परंतु आम्हां प्रवासवर्णनकारांना प्रवासवर्णनांचें चर्वितचर्वण करूनहि समाधान होत नाहीं; महाराष्ट्रांतील लोकांपैकीं बहुतेकांनीं पाहिलेल्या स्थळांचें वर्णनहि आम्ही पुष्कळदां करतों. याचें कारण फारसें लंगडें नाहीं; पर्वती, मांजरी फार्म, बाबुलनाथाचें देऊळ, नाशिक, पंढरपूर हीं ठिकाणें जरी वारंवार पाहण्यांत येणारीं असलीं तरी त्यांचीं वर्णनें वाचतांना त्यांच्या पुनर्दर्शनाचा भास होतो व आपण एकादी गोष्ट पाहिली नसली किंवा ती आपल्या लक्ष्यांत आली नसली तर ती समजते. वर्णनकारानें जर गॅझेटियर किंवा गाईड टु....वरून माहिती लिहिलेली असली तर थोडी ऐतिहासिक माहितीहि मिळते; परंतु असा योग क्वचितच येतो.

वरील प्रस्तावनेवरून बहुतेक महाराष्ट्रीयांच्या नेहमीं नजरेस पडणाऱ्या मुंबईसारख्या मध्यवर्ती ठिकाणचें वर्णन मी कां देत आहें हें वाचकांच्या लक्ष्यांत आलेंच असेल.

मी पुण्यास कॉलेजांत शिकत असतां दोन तीन वर्षें प्रीव्हियस क्लासांत घालविल्यावर सुदैवानें प्रिलिमिनरी परिक्षेंत पास

झालों व मला युनिव्हर्सिटीच्या परिक्षेस बसण्याची परवानगी प्रिन्सिपालसाहेबांनीं दिली. यापूर्वी मुंबई पाहिली नसल्यामुळें मला फारच आनंद झाला; कारण " मुंबई हें सर्व हिंदुस्थानचें नाकेंच काय पण नाक आहे " हें मीं पांच हजार वेळां ' करमणुकीं 'त वाचलें होतें. माझे वडील मला केवळ चैनीसाठीं मुंबईस धाडण्यास कबूल नव्हते. जावयाचें असेल तर परिक्षेसाठीं जा, उगीच तुला चैन करण्यास तेथें धाडण्याकरितां माझे पैसे वर आले नाहींत, असें ते म्हणत असत. आईच्या मनांतून मला धाडण्याचें पुष्कळ होतें, परंतु आमचे बाबा म्हणजे जमदग्नीचा अवतार; त्यांच्यापुढें तिच्या इच्छेची मात्रा चालेना, ह्मणून मला आपल्या उत्सुकतेची वाफ पोटांतल्या पोटांत सांठवून ठेवावी लागली, ती परीक्षेकरितां मुंबईस जाण्याचें ठरल्यावर ताडकन बाहेर पडली व मी हिंदुस्थानचें नाकें नव्हें तर नाकच असं मुंबई शहर, पृथ्वींतील उत्तम बंदरांपैकीं एक बंदर आणि जगांतील एक भर-भराटीची व्यापारी पेठ पाहणार ह्मणून मला फार आनंद वाटूं लागला.

चार अगर अधिक विद्यार्थी शिक्षणविषयक दौऱ्यावर चालले असतां रेल्वे कंपनी त्यांस सवलत देते. ह्मणून मी व आणखी तीन विद्यार्थी यांनीं या सवलतीचा फार्म कॉलेजांतील क्लार्कसाहेबां-जवळ मागितला. त्या वेळीं क्लार्कसाहेब अंमळ गर्दीत असल्यामुळें व आम्ही विद्यार्थी त्यांस कस्पटासमान वाटत असल्यामुळें आम्हांस फार्म मिळण्यास बराच वेळ लागला. असो; सरतेशेवटीं फार्म तर मिळाला. त्यावर आम्हीं आपलीं नांवें भरलीं व प्रिन्सिपालां-

करून त्यावर सही घेतली. सही घेतल्यावर आम्ही आपल्या आधुनिक अश्वांवर आरूढ होऊन घरीं गेलों. आमच्या कॉलेजपासून घरीं जातांना आम्हांस वाटेंत कोणकोणतीं घरें लागलीं, आमच्या पैकीं एक ( तो मीच होय असें हळूंच कंसांत सांगून ठेवतों ) वाटेंत सायकलवरून कसा "खालीं आला" व दुसरा एकजण कसा "आपटला," वाटेंतील रसाच्या गुऱ्हाळांत आम्ही किती रस प्यालों व किती भजीं खाल्लीं इत्यादि महत्त्वाच्या गोष्टींचें टांचण मीं "माझी आपल्या कॉलेजपासून घरापर्यंतची दुचाकीवरील चक्कर" या लेखांत केलें आहे. गरजूंनीं पहावें. ( दोन आण्याचीं तिकिटें पाठविणारांस फुकट. )

आम्हीं सकाळीं दहा वाजून दहा मिनिटांनीं पुण्याहून निघणाऱ्या पॅसेंजरनें जाण्याचें ठरविलें, तथापि आमचा मित्र लंबोदर त्या ट्रेननें निघण्यास कबूल होईना. तो म्हणूं लागला, "आपली बोवा त्या वेळीं निघण्यानें जेवण्याची अडचण होईल. दहादहाच्या गाडीनें निघायचें ह्मणजे सव्वा नऊला तरी गांवांतून टांग्यानें निघावें लागेल. अर्थात् साडे आठला जेवावें लागून पुनः दुपारीं भूक लागेल." सारांश आपले लोक असल्या तऱ्हेच्या बारीक सारीक अडचणींसाठीं अडून बसतात, त्यामुळें त्यांच्या हातून मोठमोठ्या पाश्चात्य प्रवाशांच्या सारखे किंवा माझ्यासारखे प्रवास होत नाहींत; असो.

लंबोदराच्या हट्टामुळें आम्हांस दहा–दहाच्या गाडीचा बेत रद्द करून अकरा-पन्नासच्या पॅसेंजरनें निघण्याचा बेत करावा लागला. निघण्याच्या दिवशीं सकाळीं सहा वाजतां घड्याळाच्या

गजरानें आपल्या कर्णकटु आवाजानें जागें केलें, नंतर मीं मुखमार्जनादि प्रातर्विधी आटोपले. माझ्या कॅर्बोलिक टुथपावडरच्या डबींतील–टुथपावडर संपली असल्यामुळें मीं राखोंडीनेंच तोंड धुतलें ! नंतर ताई स्टोव्हपाशीं बसून ती पेटविण्याचा यत्न करीत होती परंतु निपलमध्यें सुई घालतां घालतां ती काटकन मोडली. त्याबद्दल बाबा रागें भरतील असा धाक वाटून तिनें गोरेमोरें तोंड केलें. परंतु मीं स्टोव्ह नीट करून आणण्याचें कबूल करून चुलीवर चहाचें आधण ठेवण्यास तिला सांगितलें. यावरून मी कोणत्याहि प्रसंगीं अडून बसत नाहीं आणि संकटांतून पार पडण्यासाठीं ईश्वरावर संकट घातल्याशिवाय कसे मार्ग शोधून काढतों हें कोणाच्याहि ध्यानांत येईल.

चहा पिणें झाल्यावर हातांत पुस्तक घेऊन तें वाचीत वाचीत आंघोळीचें पाणी तापण्याची वाट पहात होतों. वेळ फार खर्च होऊं नये म्हणून साबण न लावतां लौकर लौकर आंघोळ केली व जेवणाची तयारी होईपर्यंत अभ्यास केला. साडेनऊ वाजतां आईनें जेवावयास हांक मारली. जेवावयास भात, भाकरी, वरण हे रोजचे पदार्थ असून गोवारीच्या शेंगांची भाजी, पापड व आंब्याचें गोडें लोणचें हे पदार्थ वाढले होते; गवारी मला आवडत नसल्यामुळें तिला मीं बोट लाविलें नाहीं, परंतु लोणच्यावर मात्र यथेच्छ ताव मारून सबंद बरणी खलास करून टाकली. तीन चतकोर भाकरी खाल्ली.

जेवून उठल्यावर आंचवलों व बाबांच्या ट्रंकेंतील त्यांचे कपडे काढून टाकून तींत मीं आपलें तीन शर्ट, दोन कोट व पुस्तकें

हें सामान ठेवलें व धोतररुमाल वळकटींत बांधलीं. इतक्यांत लंबोदर तांगा घेऊन आला व मला हांका मारूं लागला. मी तांगेवाल्याला आपलें सामान न्यावयास सांगून आईला, बाबांना, नमस्कार करण्यासाठीं गेलों. आईनें देवांच्या पायां पडण्यास सांगितलें. माझ्या पायांत बूट असल्यामुळें ते काढावे लागतील या भीतीनें कांकू करूं लागलों. पण बाबांनीं दरडावून सांगतांच बूट काढून देवांस नमस्कार केला आणि आईनें हातावर घातलेलें दही चाटीत चाटीत लंबोदरापाशीं तांग्यांत जाऊन बसलों व तांगा चालू झाला.

या तांग्याचा नंबर ३७३ असून याची घोडी काळसर तांबड्या रंगाची होती. तांगेवाल्यास नांव विचारतां त्यानें गणपत कोंडीबा असें सांगितलें. तांगेवाला अंमळ म्हातारा असून बराच गमत्या होता. तांग्याचा टप काळा असून सांगाड्यास पिंगट रंग दिला होता. घंटा नसल्यामुळें गणपत कोंडीबास वाटेनें ओरडावें लागत होतें. आम्ही स्टेशनावर पोंचल्यावर एक मुसलमान ( दाढीवरून तसें वाटलें ) हमाल आमच्या तांग्याजवळ आला. व त्यानें " रावसाब ओझं हाये ? " असें विचारलें. मीं म्हटलें, " तुमारा नंबर कितना हाय ? " " नंबर एकोणीस हो बगा, " असें म्हणून त्यानें आपला नंबर दाखविला आणि सामान घेऊन गेला. इतक्यांत माझे दुसरे दोन मित्र—श्रीयुत भोपळे आणि पडवळ—हे ३०१ नंबरच्या पांढऱ्या घोड्याच्या तांग्यांतून आले. नंतर आम्हीं सर्वजण एका डब्यांत चांगलीशी जागा पाहून बसलों. आमच्या कंपार्टमेंटांत दहा माणसें बसल्यावर दोन मावळे " दादा,

आम्हाला वाईच बसूं द्या खडकीच्या ठेसनापौतर " असें म्हणून आंत घुसूं लागले, परंतु आम्हीं त्यांस वरील पाटी दाखवून ते ऐकेनात तेव्हां गार्डास बोलावून त्याजकडून दुसऱ्या एका कंपार्टमेंटांत चौदा माणसें बसलीं होतीं त्यांत घुसविलें. ही गोष्ट येथें सांगण्याचें कारण एवढेंच कीं, आपल्या देशांत अजून उतारूंच्या हक्कांची जाणीव सामान्य जनतेस झाली नाहीं. तथापि सर्व लोक आमची हकीकत वाचून अशीच आपली दाद लावून घेतील अशी आशा आहे व सांगितलेल्या आमच्या धैर्याच्या कृत्याचें वर्णन वाचून वाचक आमची पाठ थोपटतील यांत शंका नाहीं.

गाडीची वेळ अकरा-पन्नासची असूनहि इंडियन रेग्युलॅरिटी-प्रमाणें चालू होण्यास अकरा-त्रेसष्ट ( १२–३ ) वाजले. आमच्या कंपार्टमेंटांत आम्हां चौघां विद्यार्थ्यांशिवाय इतर चार पुरुष व दोन स्त्रिया होत्या. खडकीचें स्टेशन आल्यावर दोनतीन पठाण आंत घुसले. उठल्या सुटल्या आपल्या हक्कांकडे लक्ष द्याव-याचें व बांधवांस त्रास भोगूं द्यावयाचा अशी आमची वृत्ति नस-ल्यानें त्यांस आम्हीं बसूं दिलें. पण लौकरच तळेगांवच्या स्टेशनावर बहुतेक गर्दी नाहींशी होऊन आम्हांला चांगली जागा मिळाली. लोणावळ्याचें स्टेशन घाटमाथ्यावर आहे. तेथें ट्रेनीस दोन एंजिनें जोडतात. रिव्हर्सिंगच्या स्टेशनावरून फारच उत्तम देखावा दृष्टीस पडतो. रिव्हर्सिंगच्या स्टेशनवर कोंकणी बायकांनीं द्रोणांतून करवंदें आणि तोरणें विकावयास आणलीं होतीं. मला तोरणें आवडत नसल्यामुळें करवंदेंच घेतलीं आणि आम्हीं सर्वांनीं त्यांजवर यथेच्छ ताव मारला. आम्हांला अपरिचित अशा एका




माझे दुसरे दोन मित्र श्रीयुत भोपळे आणि पडवळ.

करवंदी वर्णाच्या पुरुषानें चार आण्यांचीं करवंदें विकत घेतलीं व कोंकणी बायांस म्हटलें, " माम्यांनो, आजपासून तुम्ही द्रोणांत करवंदें विकायला आणूं नका. वाट्यांतून आणीत जा बरं ! " त्याचप्रमाणें कर्जतच्या स्टेशनावर चहा आणि पाव यांचा आम्हीं चांगलाच समाचार घेतला. कर्जतनंतर एक दोन स्टेशनें गेल्यावर नेरळ नांवाचें स्टेशन लागलें. या स्टेशनावर ट्रामगाड्यांपेक्षां लहान असे आगगाडीचे डबे दिसले. स्टेशनावरील एका पार्शी गृहस्थास विचारतां समजलें कीं, पुण्यास जी ट्राम्वे होणार आहे तिच्या गाड्या येथें तयार होत आहेत. सारांश लौकरच पुण्यास ट्राम होणार तर ! नेरळच्या स्टेशनाजवळ उंच डोंगरावर लोहगडचा किल्ला दिसत होता. हा किल्ला पाहून ज्या ठिकाणीं पेशवाईंतील राजकीय कैदी ठेवण्यांत येत असत तोच हा किल्ला असें मनांत येऊन पूर्वींच्या वैभवाची आठवण होऊन माझें अंतःकरण भरून आलें, आणि जरा मळमळूं लागलें.

गाडी सुरू झाल्यावर श्रीयुत सुदामराव भोपळे यांनीं आपलें नांव सार्थ करण्याकरितां भोपळ्याचें थालिपीठ आणि फोडणीचे खमंग पोहे आणले होते, ते खाण्याकरितां आपला फराळाचा डबा उघडला. मग आम्ही चौघे व मघांचा पार्शी गृहस्थ आमच्याच कंपार्टमेंटांत बसला होता, त्या सर्वजणांनीं लांडग्याप्रमाणें त्या डब्यावर तुटून पडून आंतील पदार्थांचा फन्ना उडविला. थालिपीठ फार गोड होतें पण पोहे अतिशय तिखट असल्यानें आम्हांस फार तहान लागली. आम्हीं पार्शी मित्रास, पाणी कोठें मिळेल? असें विचारलें, तेव्हां तो म्हणाला, " आतां तुम्हांला पाणी मुंबईस गेल्यावगर

मिळणार नाहीं." आम्हीं म्हटलें, "वाटेंत कल्याणास मिळणार नाहीं काय?"

"छेः! कल्याणचे लोक तो दर्यांतलें खारट पाणी पितात. तें तुम्हांला आवडणार नाहीं. तुम्ही आतां कल्याणास गेल्यावर चाय पिऊन तहान मारून घ्या. मुंबईस गेल्यावर पाणी प्या."

नेरळ स्टेशनच्या पलीकडे एक स्टेशन जाऊन बदलापूर स्टेशन लागतें. पूर्वी कल्याण जंक्शन नसून बदलापूर जंक्शन होतें; तेथें गाड्या बदलाव्या लागत म्हणून त्यास बदलापूर नांव पडलें, पुढें रेलवे कंपनीनें उतारूंस ज्यास्त लांब जावें लागून आपल्या खिशांत ज्यास्त पैसे पडावे म्हणून बदलापूर जंक्शन मोडून कल्याण जंक्शन केलें. पहिल्याचें नांव मात्र कायमचें बदलापूर राहिलें. काप गेले पण भोंके राहिलीं अशी जी आपल्यांत म्हण आहे तिचेंच हें उदाहरण. कल्याणास गाडी पोंचल्यावर लोणावळ्यास जोडलेलें दुसरें एंजिन सोडतात. घाट कर्जतेस संपत असतांहि कल्याणपर्यंत एंजिन कां आणतात व कोळशाचा निष्कारण खर्च कां करितात हें समजत नाहीं. रेल्वे कंपनी आमचा लेख वाचून कर्जतेस एंजिन सोडील अशी आशा आहे. *

रामदासस्वामींचे शिष्य कल्याण यांच्या वरूनच या गांवाचें नांव कल्याण पडलें असावें, याबद्दल लौकरच इतिहाससंशोधक मंडळीपुढें मी निबंध वाचणार आहें. पण तेथलें पाणी खारट

---

* या लेखाची प्रथमावृत्ति वाचून कंपनीनें कर्जत येथें मोठें एंजिनशेड बांधून तेथेंच दुसरीं घाटएंजिनें जोडणें व सोडणेंचें काम सुरू केलें आहे; आमच्या लेखाचा असा उपयोग झालेला पाहून आम्हांस फार आनंद वाटतो.

असल्यामुळें आम्हीं दोन दोन पैसे देऊन ( कल्याणास पैशाला दिडकी म्हणतात ) चहा विकत घेतला. पार्शी मित्रानेंहि चहा घेतला पण तो गाडी सुरू होण्यापूर्वी संडासांत गेला. चहावाल्यानें त्याचे पैसे भांडण करून आमच्याजवळून घेतले. गाडी सुरू होतांच तो संडासांतून आला व " अरे ! चहाचे पैसे द्यायचे राहले ! " असें म्हणाला. आम्हीं दिले आहेत असें ऐकून त्यानें आपला खिसा चांचपला, व रुपाया काढून आम्हांला " मोड आहे का ? " असें विचारलें. पण रुपयाची मोड आमच्याजवळ नसल्यामुळें आम्हीं " सावकास द्या पैसे " असें म्हटलें.

तो म्हणाला, " थँक यू ! " ( मी तुमचा आभारी आहें ). मी म्हणालों, " नो मेन्शन प्लीज ! " ( कसचें कसचें ! )

कल्याणच्या पलीकडे एकदोन स्टेशनें गेल्यावर मुंबरा नांवाचें स्टेशन लागलें. लंबोदरानें हा मुंबई शहरचा उंबरा असल्यानें यास मुंबरा नांव पडलें असावें असें सुचाविलें. नंतर एक लहानशी घाटी लागली. हींत दोन बोगदे आहेत. या बोगद्यांचें काम पाहून फार आश्चर्य वाटलें व शंभर वर्षांपूर्वीच्या आमच्या पूर्वजांना असल्या बोगद्यांची व भरधांव चालणाऱ्या आगगाडीची कल्पना तरी आली असेल काय ? आम्हीं पांच तासांत केलेला प्रवास त्यांस पांच दिवसांत तरी करतां येत असेल काय ? असे विचार मनांत येऊन आम्ही या सुधारणेच्या विसाव्या शतकांत जगत आहों याबद्दल धन्यता वाटून पूर्वजांची फार कींव वाटूं लागली.

ठाणें हें एका जिल्ह्याचें मुख्य ठाणें असल्यामुळें त्यास ठाणें असें नांव पडलें. ठाण्याजवळ माझी दृष्टि मैलाच्या दगडाकडे गेली,

त्यावर २१ मैलांचा आंकडा पाहून मीं लंबोदरास म्हटलें, “ काय रे लंबोदर ! आपण पुण्याहून २१ च मैल आलों ? ” लंबोदरानें ते मैलाचे दगड मुंबईपासून चढते लावले आहेत असें सांगितल्या-मुळें मी म्हणालों, “ कां बुवा ? आमची गाडी पुण्याहून सुटली असून दगड मुंबईहून कां लावले आहेत ? ” या प्रश्नास आमच्या पार्शी मित्रानें सांगितलें कीं, मुंबई अजून किती लांब राहिली तें दाखविण्याकरितां हे दगड लावले आहेत. आणखी कांहीं स्टेशनें गेल्यावर शीव स्टेशन लागलें. येथून जवळच शिवाचें देवस्थान होतें म्हणून यास शिव म्हणतात. या स्टेशनास हिंदु लोकांच्या देवाचें नांव दिल्यामुळें मुसलमान लोकांनीं रागावून तक्रार केली, तेव्हां पली-कडील एका स्टेशनास मशीद असें नांव देऊन कंपनीनें त्यांचें समाधान केलें. तेव्हां पारशी रागावले त्यांस उगे करण्यासाठीं, ठाण्याजवळ पारसीक नांवाचें स्टेशन, व सरतेशेवटीं ख्रिस्ती रागावले व त्यांच्यासाठीं सॅन्टा क्रूज स्टेशन उघडलें. मशीदच्या पलीकडील स्टेशन बोरीबंदर हें फारच प्रचंड व सर्व हिंदुस्तानांत सुंदर स्टेशन आहे. यास अनेक प्लॅटफॉर्म असून आंत विजेचे दिवे व पंखे आहेत.

या स्टेशनावर आम्हांस सलाम करून आमचा पारशी मित्र गेला आणि आम्ही १३७४ नंबरची तांबड्या घोड्याची व्हिक्टोरिया ठरवूं लागलों. आम्हांस सरदारगृहांत जावयाचें होतें. व्हिक्टोरिया-वाला म्हणाला, “ एक रुपया पडेगा, रावसाब. ” पडवळ म्हणाले, “ एक रुपया नाहीं मिलेगा, आठ आणे लेव. ” अशा तऱ्हेनें बरीच घासाघीस झाल्यावर दहा आण्यांस गाडी ठरली व हमालाचें पैसे चुकवून आम्ही निघालों. त्यानंतर काय झालें तें सांगण्यास

आतां सवड नाहीं, कारण भाजीला जाण्याची वेळ झाली आहे. त्याचप्रमाणें मुंबईचें वर्णन मी देणार होतों पण आमच्या गांवच्या लायब्ररींतील मुंबईवर्णनाचें पुस्तक गहाळ झाल्यामुळें तें आतां देणें शक्य नाहीं; शिवाय वाचकांपैकीं बहुतेकांनीं मुंबई पाहिलीच असेल आणि ज्यांनीं पाहिली नसेल त्यांची प्रत्यक्ष पहाण्याची उत्सुकता वर्णन वाचल्यानें कमी होईल म्हणून पुढेंहि कधीं तें देण्याचा विचार नाहीं.



# विमा एजंटास चकविणें

जर्मन महायुद्धाच्या वेळीं पुणें येथें सरकारनें लष्करी खर्चाचे हिशेब ठेवण्यासाठीं मोठीं थोरलीं हंगामी ऑफिसें उघडिलीं. लढाईच्या महर्गतेनें पांढरपेशा लोकांची जी दाणादाण उडाली, तींत पुण्याच्या वॉर ऑफिसांनीं त्यांस चांगला हात दिला हें प्रसिद्ध आहे. मॅट्रिक झालेल्या इसमानें समक्ष अर्ज करण्याचा अवकाश कीं, त्यास साठाची व बी. ए.स एकशेंविसाची नोकरी हटकून ठेविलेलीच. वशिल्याच्या तट्टांस तर त्याच्या दुप्पट तनखा मिळत असे, परंतु असल्या प्राण्यांत गणना होण्याइतका भाग्यवान् नसल्यानें मला साठ रुपयांचाच प्रारंभ मिळाला.

निवळ मॅट्रिकवर इतके रुपये मिळत असल्यानें छप्पन देशचे कारकून पुण्यास लोटलेले होते. मद्रासचे एन्‌माडती आप्पा, पंजाबचे धिप्पाड दाढीवाले लाला, बंगालचे भुकेबंगाल बाबू इत्यादि लोक आपापल्या देशांतून येतांना निसर्गदत्त लेण्यांशिवाय फारशीं अधिक वस्त्रें न घेतां येत. कारण कापडाची महागाई इतकी भयंकर झाली होती कीं त्या वेळीं धोतरजोडीस जी किंमत पडत असे तिच्यांत हल्लीं इरकली लुगडें मिळूं शकतें. परंतु हे बुभुक्षु लोक एक महिन्याचा पगार हातीं पडतांच नखशिखांत साहेबी पोशाकांत विराजमान होऊन व्हॅसेलिन पोमेड, ब्रिलियन्टाईन, वगैरे उपयुक्त जिनसांच्या किंमती आणखी वर चढवीत असत. मीहि एकदोन महिन्यांत अप-टु-डेट बनलों हें सांगावयास नकोच. एक लहानसें

बिऱ्हाड भाड्यानें घेऊन त्यांतील पुढल्या खोलींत टेबलखुर्च्यांचा थाट ठेविला आणि दारावर

. . . . . .

**चिमणराव विठ्ठल जोग**
मॅट्रिक ( बॉम्बे )
मिलिटरी अकाउंट ऑफिस

अशी इंग्रजी अक्षरांत पाटी लाविली. परंतु या माझ्या थाटानें दोन ब्यादी माझ्यामागें लागल्या. एक उपवर मुलींचे बाप व दुसरी विमा कंपन्यांचे एजंट ह्मणजे दलाल. या वर्षी मुलींच्या बापांस चकविण्यासाठीं ज्या यातायाती मला कराव्या लागल्या त्यांचा अनुभव आमच्या पुरुषवाचकांपैकीं जे विवाहित आहेत त्यांस पूर्वीच आला असेल; व जे अविवाहित आहेत त्यांस येणार आहेच ह्मणून त्यांचें वर्णन करून स्मरणाचें दुःख वाढविण्याच्या किंवा अपेक्षेचें सुख कमी करण्याच्या भरीस मी पडत नाहीं.

एका रविवारीं दुपारीं चार वाजतां आई चहा करीत होती व मी त्याची वाट पहात हातांत एक कादंबरी घेऊन खुर्चीवर बसलों होतों. रुपयाला एक शेर साखर व सव्वा रुपयाला एक पौंड चहाची भुकटी झाल्यानें बहुतेक कुटुंबांतून दुपारच्या चहाला छाटच मिळाला होता, तथापि आम्हां “ वॉर हापिसवाल्यां ” ना रुपयास तीन शेर साखर व बारा आणे पौंड चहा आमच्या रॅशन्सबरोबर मिळे. इतरांस ज्या सुखाचा उपभोग घेतां येत नाहीं त्याचा उपभोग आपल्याला एकट्यालाच मिळतांना सुख शतगुणित होतें—आगगाडींतील इतर उतारू स्थलसंकोचामुळें उभे राहणें, भांडणें करणें,

चेंगरणें इत्यादि हालअपेष्टा सोशीत असतां वरच्या फळीवर स्वस्थ पडून त्यांची गंमत पहात राहण्याचें स्वर्गसुख ज्यांनीं भोगिलें असेल अशा आमच्या वाचकांस माझ्या वरील सुभाषिताचें सत्य पटलेंच असेल–म्हणून दुपारीं चहा घेतांना मला फारच आनंद व अभिमान वाटे.

इतक्यांत दाराशीं एक किंचित् उतार वयाचा गृहस्थ डोक्यास पुणेरी पगडी, खांद्यावर उपरणें, अंगांत जुना झालेला काळ्या सर्जचा कोट, आणि हातांत कातड्याची हातब्याग अशा थाटानें आला व त्यानें मला लवून नमस्कार केला. त्याच्या कडे पाहून मला वाटलें कीं, हा एखाद्या मुलीचा बाप असेल म्हणून अंमळ अभिमानपूर्वक श्रीमंताप्रमाणें त्यास प्रतिनमस्कार करून समोरच्या खुर्चीवर बसण्याची मीं खूण केली, व " काय ? " असें मानेनेंच विचारलें.

खुर्चीवर बसत बसत त्यानें विचारलें, " आपण विठ्ठलराव जोगांचे चिरंजीव नाहीं का ? "

" होय. आपली अन् त्यांची ओळख होती वाटतं ?—आई आणखी एक कप आधण टाक ग ! "

" हो चांगली ओळख होती. फारच सज्जन माणूस ! त्यांची तब्येत कशी काय आहे ? "

" त्यांना वारल्याला दोन वर्षं झालीं. "

" अरेरे ! फारच वाईट झालं. असो. आपल्याला काय सिक्स्टी पे आहे नाहीं का ? आम्हांला आपल्याबद्दल आपल्या ऑफिसांतले ते खंडेराव दाभाडे सांगत होते. त्यांची न् तुमची ओळख असेलच."

यानंतर आमचें खंडेराव दाभाड्यांबद्दल बरेंच बोलणें झालें. मध्येंच आईनें, " चिमाप्पा, चहा घेऊन जा बाळ ! " अशी हांक मारली तेव्हां आंत गेलों. चहाचे दोन पेले हातांत देतां देतां तिनें, " कोण रे आहेत ते ? " असा प्रश्न मुद्रेनेंच केला.

" असेल मुलगी सांगायला आलेला ! " असें अभिमानानें व तुच्छतेनें बोलून मी पेले घेऊन बाहेर आलों व त्या गृहस्थापुढें एक पेला ठेविला. मुलीचे बाप अशा वेळीं आपल्यापुढें ठेविलेले चहाचे कप म्हणजे आपल्या योग्यतेपेक्षां आपणांस अधिक दिलेल्या मानाचे पेले आहेत असें समजून अत्यंत लीनतेनें आपण या मानाला योग्य नाहीं असें सुचविण्याचें धाडस करितात; परंतु या उर्मट गृहस्थानें तो चहा आधाशाप्रमाणें एकदांच पेला तोंडास लावून फस्त केला. त्याची धिटाई पाहून मला या अपमानाचा इतका राग आला कीं, यानें कितीहि हुंडा दिला तरी याची मुलगी साफ पतकरावयाची नाहीं असा मीं निश्चय केला; आणि त्यास म्हटलें, " बरं आहे. मिस्टर, मला आतां एंगेजमेंट आहे. तुमचं काय काम आहे तें एकदां सांगून मला मोकळा करा. "

" हो, तें आतां सांगणारच होतों. ( आपल्या बरोबरचें दप्तर सोडीत—त्यांत बहुधा मुलीची पत्रिका व फोटो असतील असें वाटलें. ) आपले मित्र खंडेराव सांगत होते कीं, आपल्याला यंदां करायचं आहे म्हणून ! "

या उर्मटाला गारद करण्याची हीच संधि आहे असें जाणून जरा ताठ होऊन मीं वरपक्षीयांचें ब्रह्मास्त्र सोडिलें, " छे बोवा, यंदा कर्तव्य नाहीं. "



दाराशीं किंचित् उतारवयाचा गृहस्थ आला.

" छे, छे ! तरुण मनुष्यांचं चुकतं तें इथेंच. यंगरास्कल्नं एका ठिकाणीं म्हटलं आहे, ' इट् इज् नेव्हर टू अर्ली टु–"

" मॅरी ! " मीं त्याचें वाक्य पूर्ण केलें.

" होय ! ॲण्ड टु इन्शुअर. रामदासांनीं देखील म्हटलं आहे, ' घटका जाती पळें जाती तास वाजे झणाणा । आयुष्याचा काळ जातो विमा कां रे उतराना ॥ ' " असें अवतरण देऊन आपल्या विनोदानें तो आपणच हसूं लागला. मला वाटलें, 'लग्न कां रे करा ना' तो म्हणेल ! पण विम्याची गोष्ट त्यानें काढिली तेव्हां हा मुलीचा बाप नसून विमा एजंट आहे असें वाटूं लागलें.

आमच्या मातोश्री दाराच्या फटींतून पहातच होत्या, त्या आपलें अस्तित्व जाणवण्याच्या उद्देशानें म्हणाल्या, " काय हो, तुम्ही मुलगी सांगायला आलां असलां तर सांगतें, पहिल्यांदां पत्रिका जुळल्याशिवाय लग्नाचं जमायचं नाहीं हो ! "

" हो, हो ! अन् मी तरी पत्रिका न् कुंडल्या दाखविल्याशिवाय कुठें यांना ' लग्न ' करायला सांगतों आहें ? अहो, विमा म्हणजे तरी एक तऱ्हेचं लग्नच ! "

" विमाचं लग्न ! अलीकडे मेलीं पोरींचीं चांगलीं चांगलीं नांवं ठेवून पुनः आमच्यासारखं कमा, विमा अशी जुन्या तऱ्हेनं हांक मारण्याचीच पद्धत पडली आहे ! विमला का तुमच्या मुलीचं नांव ?" आईसाहेबांनीं विचारलें. पण आतां तिनें येथें जास्त वेळ उभें राहून आपली व माझी शोभा करूं नये म्हणून कांहीं तरी निमित्त काढून मीं तिला घरांत जावयास लाविलें.

" या पहा आमच्या कुंडल्या !" एजंट आपल्या बॅगमधून

कंपनीचे प्रॉस्पेक्टस् काढून त्यांतलीं कोष्टकें दाखवीत हंसत म्हणाला. त्यानें आपल्या कंपनीबद्दल सर्व तऱ्हेची माहिती दिली व हो ना करतां करतां एक हजाराचा विमा उतरण्याचें वचन मजकडून घेतलें.

" आतां तुम्ही हा प्रपोजल फॉर्म भरून ठेवा; आणखी हे कांहीं प्रश्न कंपनीनें विचारले आहेत त्यांचीं उत्तरें या उलट बाजूच्या कॉलममध्यें लिहा. मी आतां सोलापुरास जाणार आहें, आल्याबरोबर हे दोन्ही फॉर्म आपण कंपनीकडे पाठवूं या. " " कशाला ? मीच हे पोस्टानें पाठवून देईन म्हणजे झालें, " मीं म्हटलें. मग पुनः कंपनीचें उत्तर येतांच भेटण्याचें कबूल करून तो पुनः मला न विसरतां फॉर्म पाठविण्याविषयीं बजावून निघून ·

हा मुलीचा बाप आहे असें समजून मी जो हरबऱ्याच्या झाडावर चढलों होतों, त्यावरून त्यानें मला खालीं ओढून आणल्याबद्दल मी संतापून गेलों होतों ! त्यांतून ही विम्याची मला नको असलेली ब्याद ! मला असे कितीतरी इसम माहीत आहेत, कीं विमा उतरून त्याचे हप्ते भरतां भरतां बेजार झालेले आहेत, पण मरत नाहींत. मी तो प्रपोजल फॉर्म भरला आणि त्यासोबत कंपनीनें पाठविलेली प्रश्नपत्रिका उत्तरांनीं भरली व कंपनीकडे पाठवून दिली. ज्यांना इन्शुरन्स एजंटची पीडा टाळावयाची असेल त्यांना माझीं उत्तरें उपयोगी पडतील असें वाटल्यावरून खालीं देत आहें:-

**प्रश्न**:-तुमचा धंदा कोणता आहे ? या धंद्यांत तुम्हीं किती वर्षें चालू आहां, तुमचा पूर्वींचा धंदा कोणता होता ? चालू धंद्यांत बदल करण्याचा तुमचा विचार आहे काय ?

**उत्तरः**–मिलिटरी अकाउंट ऑफिसांत कारकून आहें. एक वर्षापूर्वींचा धंदा विद्यार्थ्याचा होता. चालू धंद्यांत फरक करण्याचा माझा विचार आहे, मात्र कोणी तरी मला घरजांवई करून घेण्यास तयार झाला पाहिजे.

**प्रश्नः**–तुमचें वय काय आहे ? जन्म कोठें झाला ?

**उत्तरः**–वय २२ वर्षें ८ महिने १७ दिवस ५ तास ४० मिनिटें. जन्म बाळंतिणीच्या खोलींत बाजेवर झाला.

**प्रश्नः**–तुमचें वजन, उंची, छातीचा घेर ( फुगवून, न फुगवितां ) व पोटाचा घेर द्या.

**उत्तरः**–वजन ७१ पौंड; उंची ५ फूट ९॥ इंच; छातीचा घेर छाती फुगवून २४ इंच व न फुगवितां २३॥। इंच; पोटाचा घेर ४८॥ इंच.

**प्रश्नः**–तुम्ही (१) अल्कोहोलयुक्त पेयें, (२) तंबाकू, (३) अफू व (४) इतर मादक द्रव्यांचें सेवन करतां काय ? करीत असल्यास कोणत्या प्रमाणांत करितां. ?

**उत्तरः**–या सर्व द्रव्यांचें सेवन मी फारच माफक प्रमाणांत व नियमित करतों. कधींहि चुकवीत नाहीं. दररोज एक पाइन्ट व्हिस्की, पावशेर तंबाकू, पावशेर तंबाकूचा धूर, दोन तोळे अफू आणि गांजा, भांग इत्यादि मादक द्रव्यांचें सेवन प्रसंगानुसार करीत असतों.

**प्रश्नः**–पुढील कौटुंबिक कोष्टक शक्य तितक्या बिनचूक रितीनें भरून द्या.

| नांव. | जिवंत असल्यास वय. | मृत असल्यास मरतांना वय. | मरणाचें कारण. |
|---|---|---|---|
| बाप. | असते तर ५९–६–४ | ५५–४–५ | मरणं प्रकृति : शरीरिणाम् । कारण दुसरें काय ? |
| आई | ५१ सुमारें | अजून कळलें नाहीं. | मेल्यावर सांगेन. |
| बापाचा बाप | असता तर सुमारें ८० | २१ वर्षे. | आनुवंशिक राजयक्ष्मा. |
| बापाची आई. | असती तर सुमारें ७४ | १६ वर्षे. | माझ्या बापाच्या वडील भावाचे जन्मकाळीं बाळंत-रोगानें मेली. |
| आईचा बाप. | असता तर सुमारें ४९ | ४०–६–६ | हार्ट डिसीझ, अतिसार व महामृत्युंजय या रोगांच्या कॉम्प्लिकेशननें. |
| आईची आई | असती तर ४६ | ३५ वर्षे. | रक्तक्षय आणि अतिरक्त या रोगांच्या मिश्रणानें. |
| भाऊ. | नाहींत. | | न जन्मल्यामुळें मेले नाहींत. |
| बहीण. | १३ वर्षे. | ... | ... |

**प्रश्नः**–तुम्हांला कधीं अपघात झाला होता काय ? तुमच्यावर शस्त्रक्रिया करावी लागली होती काय ? ( असल्यास सविस्तर वर्णन करा ).

**उत्तरः**–एकदां लहानसा अपघात झाला होता. आखाड्यांत दांडपट्टा खेळत असतां प्रतिस्पर्ध्याचा वार लागून माझें शीर उडालें होतें. या क्षुल्लक अपघाताशिवाय गंभीर स्वरूपाचा आघात मजवर कधीं झाला नाहीं. हा अपघात शस्त्रानें झाला असल्यानें यालाच शस्त्रक्रिया म्हटलें तरी चालेल. बाकी नापिताकडून होणाऱ्या साप्ताहिक शस्त्रक्रियेशिवाय महत्त्वाची शस्त्रक्रिया मजवर झाली नाहीं.

**प्रश्नः**–आजारीपणाबद्दल वैद्यकीय दाखला मिळवून तुम्हांला कामावरून गैरहाजर रहावें लागलें होतें काय ?

**उत्तरः**–आमच्या कचेरींत रजा मिळविण्यास नेहमींच वैद्यकीय दाखला आणावा लागतो.

**प्रश्नः**—तुम्हांला एखादा चिन्ताजनक रोग झाला होता काय ? त्याचप्रमाणें पुढील रोगांपैकीं एखाद्या रोगानें आपण आजारी होतां काय ?–( अ ) अपेंडिसायटिस, रक्तक्षय, आमांत्रिक वगैरे ताप; ( ब ) वेड, अपस्मारासारखे झटके, संधिवात, उपदंश; (क) इतर प्रत्येक रोगांत किती दिवस अंथरुणांत पडून होतां ?

**उत्तरः**—-आपण विचारिलेले सगळे रोग वेळोवेळीं मला झालेले होते. अपेंडिसायटिसनें १० वर्षे ४ महिने, रक्तक्षयानें ५ वर्षे ३ महिने, आणि वगैरे तापानें ३ वर्षे ६ महिने; याप्रमाणें १९ वर्षें १ महिना अंथरुणांत पडून होतों; ( ब ) वेड आणि अपस्माराचे

झटके यांत ४ वर्षे अंथरुण सोडून देऊन कविता रचीत भटकत होतों. उपदंश म्हणजे ढेंकूण, डांस इत्यादि क्षुद्र प्राण्यांचे दंश जन्माचेच मागें लागले आहेत. या रोगांत रोगी अंथरुणांत पडून न रहातां पिसाटासारखा चुळबुळ करीत असतो हें आपल्या विमा कंपनीच्या वैद्यकीय सल्लागारांस कळावयास पाहिजे होतें; ( क ) इतर म्हणजे निद्रा या रोगानें ११ वर्षे ४ महिने ८ दिवस ८ तास पडून राहिलों होतों.

याप्रमाणें कंपनीच्या प्रश्नांचीं उत्तरें लिहून पाठविलीं; व कंपनी मला विमा उतरण्यास नालायक ठरवील व आयतीच एजंटाची ब्याद टळेल अशा अपेक्षेनें मी आपल्या युक्तीबद्दल स्वतःस शाबासकी देत बसलों; परंतु दोन तीन दिवसांत कंपनीकडून खालील-प्रमाणें मला पत्र आलें !

**अमुक तमुक लाइफ इन्शुरन्स कंपनी**, मुंबई
ता. अमुक माहे तमुक
सन १९१७

लाडके साहेब,

आपलें आमच्या कंपनींत विमा उतरण्याचें प्रपोजल व माहितीचें पत्रक हीं पावलीं. आपल्या थट्टेखोर स्वभावाचें कौतुक वाटून आपल्या उत्तराची एक प्रत आपल्या ऑफिसच्या मुख्य अधिकाऱ्याकडे व दुसरी येरवडा येथील वेडयांच्या इस्पितळाच्या अधि-

काऱ्याकडे पाठविली आहे. येरवड्याच्या इस्पितळाची हवा खाऊन आपल्या स्वभावांत गांभीर्य आल्यावर आमचा एजंट आपली भेट पुनः घेईल, कळावें.

आपला

**बिलकूल गीचमीड सहीवाला**

म्यानेजिंग डायरेक्टर.

पत्र वाचतांच एजंटास चकविल्याबद्दलचा माझा आनंद पार मावळून गेला; माझी नोकरी संभाळण्याकरितां व वेड्याचें इस्पितळ चुकविण्याकरितां मला कोण यातायात पडली ती माझी मलाच माहीत !



# लग्नसराई.

सामाजिक आणि राजकीय बाबतींत स्वतःस प्रागतिक म्हणविणाऱ्या एका वर्तमानपत्रांत खालील जाहिरात माझ्या पाहण्यांत आली:—

## वधू पाहिजे.

" कोंकणस्थ, कपि गोत्रास जुळणारी, गण राक्षस किंवा देव, मंगळ सप्तम किंवा अष्टम, वय १५।१६ पर्यंतची असावी. वराचें वय २४।२५. शिक्षण मॅट्रिकपर्यंत, इनामी उत्पन्न १०००रु. शिवाय स्कॉलरशिप दरमहा रु. २०. निदान एक हजारपर्यंत तरी खर्च करणारांनींच फक्त चौकशी करावी. मुलीचें जन्मनक्षत्र ज्येष्ठा असेल तर ( पैशाच्या बाबतींत कुलशील उत्तम असल्यास ) सवलत मिळेल.

गार्गेय

निसबत हें पत्र.

वरील जाहिरात ही अपवादविषयक नसून तिजसारख्या शेंकडों जाहिराती निरनिराळ्या वर्तमानपत्रांतून किंवा वर्तमानपत्रवजा मासिकांतून प्रसिद्ध होत आहेत. अद्यापपर्यंत दक्षिणी मुलींच्या जाहिराती इंग्रजी वर्तमानपत्रांच्या रकान्यांत देण्यांत येऊन आमच्या विवाहसंस्काराचे बाजारी धिंडवडे परप्रांतांच्या चव्हाट्यावर येऊं लागले नाहींत; परंतु बंगाल प्रांत इतर बाबतींतल्या प्रमाणेंच याहि बाबतींत आमच्या बराच पुढें गेलेला आहे. तिकडील इंग्रजी वर्तमानपत्रांत खालील मासल्याच्या जाहिराती भरपूर येत असतात.

**वॉन्टेड**–ए वेल् एज्युकेटेड, गुड्लुकिंग ब्राइड ऑफ् हाय-बॉर्न कायस्थ फॅमिली फॉर् ए यंग् कायस्थ बार् अॅट् लॉ. प्रॅक्टिस् नॉट्

लेस् दॅन् रु. ५००० पर ॲनम्. ॲप्लाय शार्प.

ए बी. सी. केअर् ऑफ्
थिस् पेपर्.

**वॉन्टेड**:—ए प्रॉमिसिंग् ब्राइड-ग्रूम फॉर ए कुलीन गर्ल् गुड-लुकिंग् ॲंड स्मार्ट. रेडी टु पे डॉवरी अपटु रु. २००० फॉर ए रिअली डिझर्विंग मॅन्. सेन्ड फोटो, हॅरॉस्कोप् ॲन्ड स्टेट टर्म्स् टु एक्स्. वाय्. झेड् केअर ऑफ् एस्. सी. घोष, नाइन्टीन, ऑल फूल् लेन, पागलपुर, ई. बी. एस्. रेल्वे.

गुजराती समाज तर वेळीं अवेळीं असल्या जाहिराती देण्यांत फारच भलतीकडे वाहवला आहे; कारण नाटकांच्या किंवा सिनेमाच्या गुजराथी भिंतजाहिरातींच्या देखील खालीं ‘ वधू माटे हॅन्डबिल जुओ,’ ( वधूकरितां हस्तपत्रिका पाहा ) अशी सूचना ठोकून दिलेली असते.

आतां हा लग्नाचा बाजार अगदींच खुला आहे असें मात्र म्हणतां येणार नाहीं. त्यांतील सौदे कडक बंधनांनीं मर्यादित केले आहेत. याबद्दल तात्त्विक चर्चा करण्याचें काम मजसारख्या खर्डेघाशाच्या हातून होणें शक्य नसल्यामुळें मी स्वानुभवाच्या गोष्टी वाचकांपुढें मांडीत आहें.

मला आपली बहीण चि. सौभाग्यकांक्षिणी चिमूताई हिचें लग्न जुळवावयाचें होतें. मुलीच्या लग्नास अवश्य असलेल्या बाबतींत नवरा ही एक असल्यामुळें योग्य वर शोधून काढणें जरूर होतें. आम्हां दक्षिणी लोकांत नवरा हा नवरीपेक्षां वयानें मोठा असावा लागत असल्यानें तो देवलस्मृतींत म्हटल्याप्रमाणें तिच्या अगोदरचें

जन्माला आलेला होता. मात्र तो कोठें आहे याचा तपास करण्याचें काम बाकी होतें. हें काम आमच्या ज्ञातिगोत्रादि निर्बंधांनीं किती सोपें करून टाकिलें आहे याची मला अद्याप जाणीव नव्हती. जातिभेदास मी पुष्कळ नांवें ठेवीत होतों परंतु बहिणीचें लग्न जुळविण्याचें वेळीं वरसंशोधनाची कामगिरी या जातिभेदानेंच कशी सोपी करून टाकिली तें आतां सांगतों. जातिभेद नसता तर दीड कोटी महाराष्ट्रीय हिंदु वर्गांत वर शोधीत मला भटकत रहावें लागलें असतें, परंतु आतां जातिभेदामुळें फक्त चित्तपावन ब्राम्हणवर्गापुरतें वरसंशोधनाचें क्षेत्र मर्यादित झालें.

आतां चित्तपावन लोकांची संख्या फक्त १,०९,००० इतकी असल्यानें माझी पायपिटी किती वांचली असेल तें एक वजा-बाकीच जाणवूं शकेल. चित्तपावनांत निम्मी संख्या बायकांची, व चि. चिमूताईचा विवाह पुरुषाशीं करावयाचा असल्यानें, ५४,५०० व्यक्तींत निवड करण्याचें काम शिल्लक राहिलें. यानंतर या निवडीचें काम गोत्रपद्धतीनें आणखी मर्यादित केलें आहे ! आमचें जोगांचें गोत्र काश्यप आहे आणि स्वगोत्रीयां-प्रमाणें शांडिल्यगोत्रीयांशीं आमचें जमत नाहीं. चित्तपावनांच्या चौदा गोत्रांपैकीं शांडिल्य व काश्यप या दोन गोत्रांवर आम्हांस बहिष्कार घालावयाचा असल्यानें या संख्येपैकीं ७,७८५ वजा गेले. बाकी राहिले ४६,७१५.

गोत्रांच्या नंतर विचार करावयाचा पत्रिकेचा. पत्रिका जमते कीं नाहीं हें पाहाणें विवाहप्रसंगीं अवश्य असतें. फलज्योतिषावर ज्यांचा विश्वास नसेल ते लोकहि पत्रिका घेऊन ठेवितात आणि

हुंडा नापसंत असल्यास कुंडली जमत नाहीं असें विरुद्ध पक्षास न दुखविणारें उत्तर देऊन मोकळे होतात. चि. चिमूताईला मंगळ नसल्यानें मंगळ्ये वर वर्ज्य करणें भाग होतें. पत्रिकेच्या १२ घरांपैकीं १,४,७,८ व १२ या पांच घरांत ज्याचा मंगळ बसलेला असेल तो मंगळ्या वर. अर्थात् एकंदर वरांपैकीं ७/१२ वर मंगळ्ये असल्यानें या ४६,७१५ तून १९,४६४ ७/१२ निरुपयोगी लोक घालवून दिले. बाकी राहिले २७,२५० ५/१२

पत्रिकेंत वधूवरांचे तीन गण दिलेले असतात. देव, मनुष्य, आणि राक्षस. या तीन गणांपैकीं देवांचें इतरांशीं जमतें; परंतु मनुष्यांचें आणि राक्षसांचें मात्र एकमेकांशीं जमत नाहीं. याचें कारण उघड आहे. मनुष्य आणि देव यांच्यांत निसर्गतः प्रेमभाव असल्यामुळें त्यांतील विवाह सौख्यविरहित होण्याचा फारसा संभव नाहीं. देव आणि राक्षस हे तुल्यबल असल्यानें देवगण्याचें प्रसंगोपात राक्षसगण्याशीं भांडण होईल इतकेंच, परंतु त्यांना एकमेकांपासून भय बाळगण्याचें मात्र बिलकूल कारण नाहीं. परंतु मनुष्य हा मात्र राक्षसाचें भक्ष्य असल्याळें राक्षसगणी मनुष्यगण्याचा केव्हां स्वाहा करील त्याचा नेम नाहीं म्हणूनच आमच्या शहाण्या आर्य पूर्वजांनीं मनुष्यगणाचा राक्षसगणाशीं विवाह वर्ज्य केला आहे. चि. चिमूताईचा मनुष्यगण असल्यानें तिचें राक्षसगणाशीं पटणार नव्हतें. सांगावयाचा मुद्दा इतकाच कीं, २७,२५० ५/१२ पैकीं आणखी १/३ वर फुकट जाऊन बाकी उरले १८१६६ १७/१८.

यापुढें पत्रिकेंतला नाडीविचार आला. आद्य, मध्य, अन्त्य अशा तीन नाड्यांपैकीं कोणती तरी एक नाडी प्रत्येकाच्या पत्रिकेंत

असते. एकनाड आल्यास वधूवरांचा विवाह होत नाहीं. आमचें विवाहशास्त्र केवळ फलज्योतिषाच्याच नव्हे तर वैद्यकाच्या देखील भक्कम पायावर कसें उभारलें आहे तें नाडीविचारावरून माझ्या लक्ष्यांत आलें. सुप्रजाविज्ञानासारखीं शास्त्रें पाश्चात्य राष्ट्रांत अलीकडे कोठें डोकावूं पाहात आहेत. परंतु आमच्या ऋषींनीं त्यांचा साद्यंत विचार करून नाडीपरीक्षा देखील विवाहशास्त्रांत घुसडल्यास हजारों वर्षें आज लोटलीं आहेत. ( आमचे हेड सुपरवायझर रा. ठोमरे हे कालच एका विद्वानाच्या व्याख्यानास जाऊन आले. ते सुद्धां असेंच सांगत होते. ) चि. चिमूताईची मध्यनाडी येत असल्यानें मध्यनाडीवाले वर विचारकक्षेबाहेर घालवावे लागले आणि आतां १८,१६६$\frac{१७}{१८}$ पैकीं राहिले १२,१११$\frac{८}{२७}$.

यांतील $\frac{८}{२७}$ मनुष्य विचारांत घेऊन उपयोगी नाहीं, कारण असला व्यंग पुरुष आपला भागिनीपति असावा असें कोणाला वाटेल ? तेव्हां बाकी राहिलेल्या १२,१११ पुरुषांपैकीं एकादा वर आमच्या चि. चिमूताईस पाहिला पाहिजे. इतक्या माणसांची चौकशी करणें ह्मणजे आकाशांतील ताऱ्यांची, दासोपंतांच्या ओंव्यांची, ब्रिटिश लष्करी अंमलदारांस मिळणाऱ्या भत्त्यांची किंवा अशाच असंख्य वस्तूंची गणती करण्यासारखें बिकट काम होय.

अरे हो ! या १२,१११ त मी स्वतः ह्मणजे नवऱ्या-मुलीचा भाऊहि आलों कीं ! मग माझें नांव वगळावयास नको कां ! त्याचप्रमाणें या संख्येंत पाळण्यांत लोळणाऱ्या लेकरांपासून अर्ध्या गोवऱ्या स्मशानांत गेलेल्या थेरड्यांपर्यंत सर्व वयांचे पुरुष आले आहेत. त्यांपैकीं २० ते ३० दरम्यानचेच लोक आम्हांस पाहिजे

आहेत. मनुष्याची वयोमर्यादा सरासरी १०० पर्यंत धरिली तर दशकमानानें त्यांचे दहा गट पडतील. यापैकीं एकाच गटांतील पुरुषांचा विचार करणें अवश्य असल्यानें वरील संख्येस १० नें भागून ती संख्या १२११ १/१० येथपर्यंत खालीं आणिली. हा १/१० अर्थात् एकबोटे आम्हांला नको. बाकीच्या १२११ लोकांच्या दारांत जोडे फाडणें फारशा अवधीचें काम नव्हतें. रोज सकाळीं एक व संध्याकाळीं एक घर याप्रमाणें फिरल्यास फक्त १ वर्षे ८ महिने ५ दिवसांत ही कामगिरी उरकण्यासारखी होती.

ही पावणेदोन वर्षांची मुदत विशेष दीर्घ आहे असें मानण्याचें कारण नाहीं. कित्येक मुलींचे बाप मुलीचें लग्न जमविण्यास खटपट सुरू करून तें जुळून येईपर्यंत आणखी तीन तीन कन्यारत्नांचे जनक होऊन गेलेले मीं पाहिले आहेत.

* * * *

माझ्या वरच्या गणितांत माझे मित्र प्रो. दिघे यांनीं तर्कशास्त्राच्या दृष्टीनें बऱ्याच चुका दाखविल्या आहेत. त्यांचें म्हणणें असें कीं, समानगोत्री लोकांत कित्येक मंगळये वर निघत असतील, एकनाड आणि विषमगण यांचा संयोग एकाच कुंडलींत झाला असेल; अशा तऱ्हेनें अतिव्याप्तीच्या दोषानें माझें गणित दूषित झालें आहे. परंतु गणितामध्यें इतर शास्त्रांच्या चुका आम्ही बिलकूल ग्राह्य धरीत नाहीं. आमचे दोन मजूर नेहमीं एका मजुराच्या दुप्पटच काम करितात, चकाट्या पिटीत बसत नाहींत. आमच्या कुरणांत सोडलेल्या गायी लहानमोठ्या कधींहि नसतात आणि त्रैराशिकाच्या प्रमाणांतच गवत खाण्याचें काम करीत असतात.

आम्हां गणित्यांचे अ, ब, क हे कधींहि आजारीबिजारी न पडतां एकमेकांच्या ठराविक प्रमाणांत भिंती बांधण्याचें काम उरकतात व कित्येक वेळां तोट्यांचीं रूपें धारण करून भरलेले हौद रिकामे करीत असतात. तात्पर्य इतकेंच कीं, गणितांत तर्कशास्त्राला जागा नाहीं.

प्रत्यक्ष व्यवहारांत देखील आमचें वर केलेलें गणितच अनुभवास उतरतें.

*   *   *   *

वाहवा ! गणितशास्त्राच्या या मौजा मारण्यांत मी निमग्न झालों असतां या समोरच्या मिरवणुकीनें माझ्या विद्यानंदांत व्यत्यय आणिला आहे. आपण जरा ही मिरवणूक पाहूं या ! हे पहा सुरनळे, हीं दारूचीं झाडें, या चंद्रज्योती आणि या पेट्रोमॅक्स बत्त्यांच्या झगझगीत माळा ! यांच्यायोगें मिरवणुकींतल्या स्त्रीपुरुषांचे चेहरे कसे स्पष्ट दिसत आहेत ते ! बाकी यांतल्या कांहीं कांहीं मंडळींना मात्र जरा अंधारांतूनच चालाल तर बरे दिसाल अशी सूचना देण्याचें माझ्या मनांत येत आहे. परंतु वाद्यांच्या या कर्णकठोर गडगडाटांत माझें स्वगत भाषण ऐकून घेतो कोण ? कारण हा पहा इंग्रजी वाद्यांचा सुस्वर बँड एकसमयावच्छेदें कितीतरी पद्यांच्या श्रवणाचा लाभ आपल्याला करून देत आहे ! ती बासपाइप पहा ' मूर्तिमंत भीति उभी ' वाजवीत आहे. काळी सनईसारखी क्लॅरिओनेट ' सुवरा स्वकुलतारक ' चे सूर काढीत आहे. बिगुलांतून गझलाचे आलाप निघत आहेत आणि कन्सर्टिनवाल्यानें ' आतां आलें मला अवसान ' वर झोड उठविली आहे. आणखी हे दोन

इसम बँडवाले कधीं झाले ? परवांच तर जमीन चोपायला आठ आणे रोजावर लावले होते, आणि आज पहा तीन रुपये रात्र दरावर ब्यांडांत सामील झाले आहेत ! यांच्या तोंडांत जरी हीं वाद्यें दिलीं जाहेत व मधून मधून हे जरी गाल फुगवून वाद्य वाजविण्याचा आव आणीत आहेत तरी त्यांच्या वाद्यांचीं फुंक मारण्याचीं भोंकेंच बंद केलेलीं असलीं पाहिजेत; कारण त्यांतून आवाज निघत नाहीं. पहा, हे पडघम आणि ढोलवाले इसम, लोखंडी गजावर दुसरा गज आपटून टिण्-टिण् करणारा पोरगा, या राक्षसी झांजा आपटणारा हा दाढीवाला, हे



बॅण्डवाला.

सगळे मिळून एकंदर पंधरा असामी आहेत. या सगळ्यांचे भरजरी काळे युनिफॉर्म पोषाक मात्र पाहून घ्या. आणखी तो, जाण्याच्या दिशेकडे पाठ आणि मिरवणुकीकडे तोंड करून

दोन्ही हात सारखे खालींवरतीं, मागेंपुढें करणारा पांढऱ्या पोषाकाचा व तुर्की टोपीचा मनुष्य त्यांचा कॅप्टन आहे. त्यानें छातीला बिल्ले लावले आहेत. त्यांतला एक गुळगुळीत ढब्बू पैसा दिसत आहे. कोठें चालेना तेव्हां भोंक पाडून छातीला लटकावून दिला असेल झालें ! या कॅप्टनच्या हातवाऱ्यांवरून कोणाची अशी कल्पना होईल कीं, याच्या अंगांत आलेलें आहे, परंतु तसला प्रकार कांहीं नसून आपल्या बॅन्ड्वाल्यांस अंगविक्षेपांनीं डायरेक्ट करण्याची त्याची बतावणी चालली आहे. बाकी एकहि जण त्याच्या आविर्भावांकडे लक्ष देत नाहीं ही गोष्ट वेगळी.



बॅण्ड-रूप.

कॅप्टनसकट सोळा बॅन्डवाल्यांना बत्तीस रुपये बिदागी तरी ठरली असली पाहिजे. शिवाय प्रत्येकास पैशापैशाची पानसुपारी व दोनदोन आण्यांचा नारळ द्यावा लागेल तो वेगळाच म्हणजे हे चौतीस रुपये चार आणे केवळ मानपानाखातर गुंडांच्या

घरांत फुकट घालवणार ! कदाचित् या वरातींतील वराला दरमहा चौतीस रुपये देखील पगार मिळत नसेल. अवघ्या दोन तासांच्या कटकटीसाठीं हे गुंड लोक साधारण ऐपतीच्या मनुष्याचा एक महिन्याचा पगार खाऊन टाकणार आणि जातीजातींतले तंटे उपस्थित झाले म्हणजे ह्यांनाच यथास्थित ठोक देणार ! कसा आहे आम्हां हिंदूंचा कोडगेपणा !

बॅन्डवाले कंटाळून आपल्या तोंडांत वाद्यांऐवजीं विड्या कोंबूं लागले कीं, या दोन ताशेवाल्यांचे कड्कड् कड्कड् झालेंच सुरूं ! जणूं या ताशांच्या कातडी पाठी म्हणजे काफरांचे देह आहेत अशी भावना धरून हे त्यांना बेतालपणें बडवीत असतात; आणि आम्ही भारतीय संगीताच्या श्रेष्ठत्वाचा पोकळ अभिमान बाळगीत आफ्रिकेंतील रानटी लोकांच्या अभिरुचीला सुद्धां शहारे आणणाऱ्या या जंगली वाद्यास आमच्या मंगलकार्यांत खुशाल धांगडधिंगा घालूं देतों. अमक्या गोमाजीचें लग्न मोठ्या कडाक्यानें झालें असें सगळ्या पुणें शहराला वाटविणें हा कदाचित् ताशा लावण्याचा उद्देश असेल.

बाकी कांहीं असलें तरी या कडकडाटामुळें आपल्या पिढीजाद म्हाताऱ्या ग्यानबा वाजंत्र्याला मात्र विश्रांति मिळते खरी ! तो पहा मुंडासें घातलेला ग्यानबा, सनई काखोटीस मारून आणि चंची सोडून कसा तंबाखू चोळीत चोळीत सावकाश मिरवणुकीबरोबर चालला आहे; आणखी हा त्याचा थोरला मुलगा रोड्या, संबळीला मुळींच दुखवावयाचें नाहीं अशा प्रेमळ भावनेनें तिला

टिपऱ्यांनीं नुसता आंजारीत गोंजारीत स्थितप्रज्ञासारखा शांतपणें जात आहे; हा साडेतीन हात लांबीचा सूर या अर्डीच हात उंचीच्या काशीनाथनें धरला आहे, पण या दमेकरी पोराच्यानें एवढा सूर कसा फुंकवणार ? जरी या वाजंत्र्यांनीं वाद्यें मनापासून वाजविलीं तरी त्यांचा बिन्दुस्वर या महावाद्यांच्या नादसागरांत कोणीकडल्या कोणीकडे लुप्त होऊन जाणार ! म्हणून त्यांचा अंगचोरपणा खपून जाण्यासारखा आहे. बाबांनो तुम्ही मिरवणुकींत उपयोगी नाहीं, केवळ पंगतीं वाजविण्याकडे इतःपर तुमचा उपयोग होणार आहे.



ग्यानबा सनईवाला.

देशी वाजंत्र्यांनीं मिरवणुकींना म्हणण्यासारखी शोभा येत नाहीं असा त्यांच्या विरुद्ध आक्षेप आहे; त्यांत थोडेसें तथ्य आहे. या ग्यानबाचें लालभडक मुंडासें, त्याच्या मुलाची गांधी टोपी आणि या सूरवाल्याची केसाळ टोपी यांत कांहींतरी एकरूपता दिसते काय ? मला वाटतें बॅन्डवाल्यांचें अनुकरण करून वाज-

त्यांनीं मोठे ताफे तयार केले आणि छानदार मराठीशाही पगड्या, बंदाचे अंगरखे व तंग तुमानी असा युनिफॉर्म घालून जर हे लोक मिरवणुकीच्या अग्रभागीं वाजवीत जातील तर मोठी शोभा दिसेल व आमच्या मंगलकार्यांत घुसून बसलेलें हें उंटाचें पिलूं बाहेर हाकललें जाईल.

हो, बरी आठवण झाली. या संघटनाच्या काळांत ब्राम्हणांच्या लग्नांतील वाजंत्रीं निराळीं, मराठ्यांचीं निराळीं असा भेद कशाला हवा ? खरें पाहतां, मराठ्यांच्या वाजंत्र्यांचें काम एका अर्थीं अधिक बरें वाटतें. कसून काम करावयाचें हें त्यांस माहीत असतें त्यांचे डफ किंवा ढोलगेवाले ज्या आवेशानें आपलें वाद्य ठोकीत असतात तो आवेश गुरव किंवा न्हावी वाजंत्र्यांत दिसत नाहीं. मराठ्यांचा महार डफवाला डफाला शत्रु समजून ठोकीत असतो तर गुरव संबळवाला, लाडक्या लेकीच्या अपराधाबद्दल बाप जसा तिला जपून जपून चापट्या देतो त्याप्रमाणें, हलक्या हातानें संबळीवर टिपऱ्यांचा प्रहार करतो. महार सनईवाल्यांचें संगीताचें ज्ञान जरी रंगभूमीवरील ताज्या नाटकांतील पदें वाजविण्याच्या इतकें आजतागाईत नसलें तरी लावण्यांच्या जुन्या चाली ते जितक्या ठसकेबाज रीतीनें वाजवितात तितक्याच अंगचोरपणानें गुरव वाजंत्री नवीन पदें फुंकतात. मुसलमानांचा इंग्रजी बॅन्ड किंवा रण-कर्कश ताशा जर ब्राम्हणांना चालतो तर महार वाजंत्री कां चालूं नयेत ? वाद्यांत देखील हें जातिभेदाचें भूत कशाला नाचावयास पाहिजे ? आतां मी वाचकांच्या पुढें ठराव मांडतों कीं—

इतःपर हिंदूंच्या मंगलकार्यांत परकीय वाद्यें वाजविलीं जाऊं नयेत.

हें तत्त्व झालें, त्याचा तपशील असाः—गुरव वाजंत्री आणि महार वाजंत्री अशा दोघांचे ताफे कामाला ठेवून त्यांजकडून आळी-पाळीनें अगर ते कबूल असल्यास मिलाफानें वाद्यें वाजवून घ्यावींत.

हा ठराव मी चि. चिमूताईच्या लग्नांत अमलांत आणणार होतों, पण आमचा पडला वधूपक्ष ! व्याह्यांनीं लगेच धाक घातला, ' तुम्ही हे महार वाजंत्री आणून आमची शोभा करण्याचा विचार केला आहे कीं काय ? या महारांना परत घालवा आणखी चांगला मिलिटरी बॅन्ड घेऊन या, त्याशिवाय मुलगा घोड्यावर बसणार नाहीं.

" नको बसायला, " मीं म्हटलें, " जांवईबुवा, घोड्यावर बसणार नाहींतच मुळीं; आम्ही मोटारींतूनच त्यांचा वरघोडा काढ-ण्याचें ठरविलें आहे. "

" हें पहा चिमणराव, तुमचा विनोद असा वेळीं अवेळीं आम्हीं चालवून घेणार नाहीं. मी साफ सांगतों जर आमच्याशीं सोयरीक करायची असेल तर हे डफवाले परत जाऊन त्याच्या ऐवजीं बॅन्डवाले आलेच पाहिजेत. नाहीं तर दुसऱ्या दहा मुलींचे बाप आतां लोटांगणें घालींत येतील आमच्या बाळासाहेबांकरितां. "

या वेळीं मीं वर मांडलेला ठराव व्याह्यांस पाठ म्हणून दाख-विला परंतु त्यांतील तत्त्व आणि तपशील हीं दोन्ही त्यांना मान्य झालीं नाहींत आणि शेवटीं बॅन्ड आणण्याची पाळी मजवर आली. त्यांतल्या त्यांत आनंदाची गोष्ट अशी कीं, माझें तत्त्व वरातीच्या वेळेपर्यंत त्यांच्या मनावर बिंबलें गेलें आणि त्यांनीं बॅन्ड आणण्याचें साफ नाकारिलें. मात्र तपशील अमान्य असल्यानें महार वाजंत्र्यास वाजविण्याची संधि त्यांनीं दिली नाहीं.

असो. आपण पुन: या मिरवणुकीकडे नजर टाकूं या. वाद्यें वाजविणारे इसम, पेट्रोमॅक्स बत्त्या वाहणाऱ्या बाया, दारूवाले आणि तांगेवाले या बाजारबुणग्यांची संख्या कमींतकमी पन्नास पंचावन तरी दिसत आहे आणि वऱ्हाडी मंडळी मात्र तीस चाळीसपेक्षां अधिक नसावी असें वाटतें. वाद्यधारी आणि वऱ्हाडी यांच्या टोळ्यांच्या मधून फुलांनीं शृंगारलेल्या मोटारींतून हें डझनभर पोरांचें लेंढार कशाला बुवा जात आहे ? पण ती पहा त्यांत खेचून बसलेली नवरानवरींची मुंडावलिविभूषित जोडी ! आपापल्या मुलांची मोटारीची हौस फेडून घेण्याकरितां पतिपत्नींच्या पहिल्याच वाहनारोहणप्रसंगीं त्यांच्या एकांतावर घाला घालणाऱ्या आंबटशोकी बायाबापड्यांच्या व्यवहारज्ञानाची तारीफ करावी तितकी थोडी आहे ! हें पोरांबाळांचें लेंढार आपल्या भोंवतीं जमलेलें बघून नवरदेवांच्या डोळ्यांपुढें कोणतीं सुखस्वप्नें पडत असतील त्यांचा अंदाज न केलेला बरा.

मिरवणुकींत इतक्या बाया आणि बुवे चालले आहेत परंतु शोभिवंत कळा एकाच्या चेहऱ्यावर दिसत आहे का ? लग्नाची मेजवानी आज दुपारीं सगळ्यांनीं झोडली आहे; पण एक वर्षभर उपासातापासांत काढलेल्या दरिद्र्यांसारखीं सगळीं माणस दिसत आहेत. कपडे तरी किती गचाळ ! या विद्यार्थ्याचा कोट धुळवड खेळण्याचे दिवशीं जो असतो तोच मिरवणुकींत ! हा जनुभाऊ ड्रायव्हर मोटार सर्व्हिसवर आहे, तो मोटारच्या लायसेन्सचा खाकी पोषाक तसाच घालून मिरवणुकीबरोबर चालला आहे, आणि हे सगळ्या ब्राम्हण कुटुंबाचे हौशी ‘ निर्वाणीचे सांगाती ’ बापुराव कुठल्याशा प्रेतयात्रेला गेले होते, त्या वेळचें उपरणें बांधलेलें तसेंच डोक्याला

ठेवून विडी फुंकीत चालले आहेत. एवंच पुरुष मंडळींनीं तर मंगल-कार्यांतील पोषाखाच्या बाबतींत कांहीं धरबंद ठेविला नाहीं.

या बायका मंडळींनीं मात्र वेण्यांऐवजीं अंबाडे, सांखळ्यांऐवजीं जोडे किंवा वहाणा आणि गळ्यांतल्या दागिन्यांच्या मोठ्या ओझ्याच्या जागीं एकदोनच ठळक माळा, असले वाढत्या दारिद्र्याचे आनुषंगिक फेरफार खेरीज करून आपली पूर्वापार वहिवाट कायम ठेविली आहे. ती बायकांच्या घोळक्याच्या मध्यभागीं एखाद्या सम्राज्ञीप्रमाणें गंभीर मुद्रा धारण करून राजहंसीप्रमाणें मंद पावलें टाकीत जाणारी वरमाय पाहिलीत काय? तिनें पांघरलेला चाकोलेट रंगाचा शेला जरी कदाचित् उसना मागून आणलेला असला तरी त्याच्या खऱ्या स्वामिनीपेक्षां हिनेंच तो अधिक शोभिवंत ऐटीनें परि-धान केला आहे. विहीण-बाईच्या नाकांतली नथ कदाचित् जपानी मोत्यांची असली तरी तशी पाणीदार मोठी नथ पेशवाईत सुद्धां क्वचित्‌च दृष्टीस पडली



वरमाय.

असेल. परंतु तो त्यांचा फाटका भांग पाहून असें खात्रीनें वाटतें कीं, पांढरपेशा बायकांनीं डोकीवरून पदर घेण्याच्या चालीचा पुनरुद्धार केला पाहिजे. विहीणबाईचा काळा रंग पाहून बायकांनीं नाटकांतल्या-सारखा सफेता वापरावा असें वाटल्याशिवाय रहावत नाहीं. वर-माईच्या किंचित् मागून आदबीनें आपली पायरी ओळखून चाल-णारी ही मुलीची आई दिसली का ? वरातीचा थाट पाहून तिचे डोळे दिपल्यासारखे दिसतात. सुरनळ्यांतील दारू जितकी उंच उडेल तितक्या प्रमाणांत वरमाईच्या तोंडावरचा तजेला आणि मुलीच्या आईच्या तोंडावरचा खजीलपणा वाढत आहे. तसेंच ही लवंगी मिरचीसारखी तिखटपणा दाखविणारी वराची बहीण बघून घ्या. मात्र एवढें नक्की वाटतें कीं या मिरवणुकीच्या थाटाला साज-तील अशी या वऱ्हाडी बायकांचीं रूपें बिलकूल नाहींत.

मिरवणुकींतील हीं काळींबेंद्रीं, रोडकीं, भिकार पोषाखाचीं माणसें पाहून मला आणखी एक ठराव समाजापुढें मांडावासा वाटतो. शनिवार—बुधवार शिवाय इतर रात्रीं नाटकमंडळ्यांना कांहीं काम नसतें. नाटकांतल्या पात्रांना जर सुरेखसे पोषाख करून मिरवणुकीबरोबर नटूनमुरडून ठुमकत चालावयास बोलावलें तर लग्नमिरवणुकींना अधिक शोभा येईल. असल्या कुब्जेऐवजीं नाट-कांतली शालू नेसलेली, भरगच्च दागिने घातलेली, तालावर चाला-वयास शिकलेली अभिनयनिपुण विहीण, पंधरा सोळा वर्षांची तिच्या तालमींत तयार होत असलेली उपवर करवली, भारदस्त गल-मिशावाला, केशरी गंध, पुणेरी पगडी-जोडा, बंदांचा अंगरखा, रेशमी धोतर, जरीकांठी उपरणें परिधान करून गंभीर चेहऱ्यानें

भारदस्त पावलें टाकीत जाणारा ढेरपोट्या व्याही; सामाजिक खेळां-




व्याही.

तल्या व्हिल-नचा पोषाख केले-ला पाणजांवई; आणि यांना शोभ-तील अशीं भिन्न-भिन्न वेष घेतलेलीं यांचीं स्त्रीपुरुष आप्त आणि नोक-रमंडळी; असा वीस पंचवीस पा-त्रांचा चित्रविचित्र तांडा नाटकमंड-ळ्यांतून मिरवणु-कीपुरता भाड्यानें आणिला तर लग्ना-स शोभा येऊन ललितकलेचा उ-द्धार केल्याचें पुण्य पदरीं पडेल. पुष्कळ नाटक मंडळ्यांची सांपत्तिक स्थिति लक्षांत आणितां एकेक जेवण आणि नारळ इतक्यावर एक संच भाड्यानें मिळण्यास हरकत पडणार नाहीं असें वाटतें.

ही मिरवणूक संपतांक्षणींच पाठोपाठ दुसरी एक मिरवणूक येतच आहे. पुष्कळ वेळां मिरवणुकींचा इतका तोबा उडतो कीं, या लग्नाची मंडळी त्यांत आणि त्या लग्नाची मंडळी यांत, असा घोटाळा होऊन ठिकाणावर पोंचेपर्यंत त्यांच्या चुकीचा उलगडा होत नाहीं. एकदां कसब्याच्या गणपतीला दोन अक्षती एकदम गेल्या होत्या— एक कुबेरांच्या घरची आणि दुसरी भणग्यांच्या येथील. भणगे मंडळी अक्षत देऊन प्रथम देवळाबाहेर पडली, तेव्हां कुबेरांच्या बॅन्ड-वाल्यांना वाटलें कीं, आपले मालक हेच आहेत, म्हणून ते भण-ग्यांच्या मंडळीस वाजतगाजत नेऊं लागले. भणग्यांचें घर येतांच वऱ्हाडानें मागल्या पावलीं आंत प्रवेश केला आणि पाठीस डोळे नसलेले बॅन्डवाले आपल्या झोकांत तुत्तड तुत्तड करीत कुबेरांच्या घरापर्यंत जाऊन तेथें, 'गॉड सेव्ह दि किंग' हें भरतवाक्य वाजविण्यास अर्धवर्तुळ करून उभे राहिले, तेव्हां त्यांच्या लक्षांत आलें कीं आपण भलत्याच वऱ्हाड्यांची सेवा केली. मग बिचारे पुनः धांवपळ करीत कसब्याच्या गणपतीपर्यंत जाऊन पोहोंचले, व खोळंबा केल्याबद्दल मालकांच्या शिव्या खाऊन त्यांना घेऊन निघाले.

आणखी गरिबांची ही फार मोठी सोय आहे. एका घोडयाच्या खाण्यांत जसें गाईचें पोट भरतें तसेंच थोरामोठ्यांच्या कार्यांत गरि-बाला आपलें कार्य साजरें करून घेतां येतें. एकादें थोरामोठ्याचें लग्न निघालें कीं, गरीब वधूवरांनीं समोरच जानोसे द्यावे; त्यांच्या अक्षतीच्या पाठोपाठ आपली अक्षत, त्यांच्या वरप्रस्थानामागून आपलें वरप्रस्थान, वरातीमागून वरात असा सारखा पिच्छा पुरवावा. त्यांचें

वाजंत्री असतात, दारूवाले असतात ते आपलेच आहेत असें सगळ्या गांवकऱ्यांना वाटवावें. वाटल्यास सगळ्या गांवाला भोजनाचें आमंत्रण द्यावें. आपल्या घरीं बैठकीची मात्र तजवीज ठेवावी. समोरच्या घरीं जेवणाची तयारी दिसतांच आपल्या निमंत्रितांना सोवळीं नेसण्यास सांगावें आणि जागेच्या संकोचामुळें समोरच्या घरीं पानें मांडण्याची व्यवस्था केली आहे अशी विनंती करावी. आपले निमंत्रित समोरच्या घरीं गेले तरी त्यांना मज्जाव होणें शक्य नाहीं. कारण वधूपक्षीयांना हीं माणसें वरपक्षांतलीं आहेत असें वाटेल, आणि वरपक्षीयांना वधूपक्षाकडलीं आहेत असें वाटेल. अशा रीतीनें त्यांची आगंतुकी उघडकीस येणार नाहीं आणि गरिबांच्या लग्नांतलि मेजवानी थाटानें साजरी होईल.

लग्नांच्या मिरवणुकींत आणि समारंभांत नुसती वऱ्हाड्यांची किंवा वाजंत्र्यांचीच चुकामूक होते असें नाहीं. क्वचित् प्रसंगीं वधूवरांच्या चुकामुकी होऊन भलत्या वराशीं वधूंचीं लग्नें लागल्याचेहि दाखले मजजवळ आहेत. एकदां अशी गम्मत झाली कीं, ज्येष्ठाचा महिना सरत आला होता. झिमझिम पाऊस पडत होता आणि शेवटच्या मुहूर्ताची गर्दी असल्यानें चार पांच रुखवती एकामागून एक चालल्या होत्या. अगदीं पहिल्या स्वारींतला नवरदेव ज्या वेळीं पहिल्या वधूगृहाशीं आला तेव्हां वाजंत्र्यांना उभें राहाण्याची सूचना चुकीनें मिळाली. वरराज परगांवचे असून लग्न पत्रव्यवहारानें जमलें होतें. त्यामुळें भावी जांवईसासऱ्यांची तोंड ओळख झालेली नव्हती. वरराज नवीन पद्धतीचे असल्यानें त्यांनीं आईबापादिकांचें लचांड जवळ बाळगिलें नव्हतें. ते घोड्यावरून उतरले व तडक

बोहल्याचा मार्ग पत्करते झाले. इकडे घटका भरत आली होती, त्यामुळें भटजीबोवांनीं मोठ्यानें मंगलाष्टकें म्हणण्यास प्रारंभ करून लग्नाचा बार उडविला ! लग्न लागून माळ पडल्यावर त्या मुलीच्या आईबापांनीं ठरविलेला पण विधीनें दुसऱ्या एक मुलीसाठीं निपजविलेला वर मिरवणुकींच्या गर्दींतून वाट काढीत दाराशीं प्राप्त झाला.

एरवीं भांडणच व्हावयाचें परंतु या वरासाठीं ठरविलेली वधू रिकामीच होती; तिच्या घरची वाट उशीर लावलेल्या नवरदेवास दाखविण्यांत आली आणि दोन्हीं लग्नें यथासांग पार पडलीं. कोणाचीच लग्नाची तयारी फुकट गेली नाहीं. चुकामुकीनें एकत्र झालेलीं हीं दोन्हीं जोडपीं हल्लीं सुखानें नांदत आहेत. लग्न हा करार नसून संस्कार आहे या हिंदु ब्रीदाला या मुलींचे आईबाप किती बरें जागरूकपणें चिकटून राहिले ?

या उगाच गप्पा नव्हेत बरें ! खऱ्या गोष्टी आहेत. एका ब्राम्हण गृहस्थानें या लग्नघाईंत आपली मुलगी एका फरारी होऊन आलेल्या, ब्राम्हण म्हणून मिरवणाऱ्या, तोतया परजातीय गुन्हेगारास कशी पिवळी करून दिली; पुढें त्या मनुष्याची तोतयेगिरी उघडकीस येऊन त्याची रवानगी तुरुंगांत कशी झाली व तो परत आल्यावर ती खरी आर्य तेजाची मुलगी त्याच्याबरोबर संसार करण्यास कशी कबूल झाली त्याची आठवण पुण्यांतल्या लोकांना ताजी आहे. निदान ते तरी मजवर गप्पिष्टपणाचा आरोप करणार नाहींत.

जरी मी भात्रबंधनांतल्या धुंडिराजासारखा गोष्टीवेल्हाळ

असलों तरी त्याच्यासारखा प्रामाणिक गप्पिष्ट आहें. मी खोट्या गप्पा कधीं मारीत नाहीं, खऱ्या थापा देतों. परंतु वेळीं अवेळीं गप्पा मारण्याचा मला इतका नाद आहे कीं, त्याचें उदाहरण दिलें तरच तुम्हांला खरी कल्पना येईल. एकदां गुंड्याभाऊ आणि मी असे दोघे मुंबईस कशाला तरी गेलों होतों. आमचा मुक्काम नातूच्या चाळींत एका ठिकाणीं झालेला होता. त्या चाळींत एका बिऱ्हाडीं मृत्यु झाल्यानें गुंड्याभाऊ आणि मी यांजवर मर्तिकाचें सामान आणण्याची कामगिरी सोंपविण्यांत आली, कारण चाळीं-तल्या बहुतेक पुरुषांस ऑफिसांत जाण्याची घाई होती.

पांढरें कापड, कामट्या, सुतळी, व मडकें विकत घेऊन आम्ही परत येत असतां वाटेंत आंग्रयाची वाडी लागली. गुंड्याभाऊ म्हणाला "चिमण्या, आत्तां आपण बिऱ्हाडीं गेलों तर सगळी प्रेत-यात्रा आटोपेपर्यंत आपल्याला चहा मिळण्याची पंचाईत पडेल. चल, आपण हॉटेलांत जाऊन चहा घेऊं."

मी म्हणालों, "त्यापेक्षां आंग्रयाच्या वाडींत म्हसकराचें बिऱ्हाड आहे तेथें आपण जाऊं आणि चहा घेऊन पुढें जाऊं."

गुंड्याभाऊचा रुकार मिळून आम्ही म्हसकराच्या बिऱ्हाडीं गेलों, त्याची स्वारी आंतून कडी लावून घेऊन अद्याप घोरत पड-लेली होती. आम्हीं बरोबर आणिलेलें सामान व्यवस्थेनें खोलीच्या बाहेर लाविलें व दारास धक्के मारून म्हसकराला दार उघडावयास लाविलें. आम्हां दोघांना पाहून त्याला किती तरी आनंद झाला! कारण, म्हटलेंच आहे:—

मित्रं प्रीतिरसायनं
नयनयोरानन्दनं चेतसः ॥

हें कांहीं खोटें नाहीं, मॅट्रिकचे परीक्षक प्रश्नपत्रिकेंत खोटें कशाला लिहितील ? म्हसकरानें तोंडच्या उद्गारांनीं आणि हाताच्या मुष्टिप्रहारांनीं आपला आनंद व्यक्त केला आणि तिघांसाठीं चहाचें आधण ठेविलें. नंतर आम्ही मुंबईस कां आलों, सिनेमा, नाटक वगैरे काय पाहिलें, काय काय जिनसा खरेदी केल्या इत्यादि विषयांवर गप्पा मारण्यांत आम्ही तिघे गर्क होऊन गेलों

हळूंहळूं खोलीपुढें गर्दी होऊं लागली. कित्येकजण तोंडांत बोटें घालीत, कित्येक आश्चर्य व भीतियुक्त चर्येनें तेथें थबकत आणि सर्वजण ' कोण रे ? ' ' कोण रे ? ' असा प्रश्न एकमेकांस करीत होते. मुंबईत कोणी कोणाची पर्वा करीत नाहीं, जो तो आपल्याच उद्योगांत निमग्न असतो, एकाच चाळींत रहाणारे शेजारी देखील एकमेकांची ओळख करून घेत नाहींत, अशीं वर्णनें मी ऐकत होतों. पण त्या सगळ्या गप्पा ! आम्ही दोन नवखे इसम म्हसकराच्या घरीं बसलेले पाहून खोलीच्या दाराशीं घोळका करून ' कोण रे ? ' अशी चांभारचौकशी करणाऱ्या लुडबुड्या मुंबईकरांचा मला फार राग आला.

इतक्यांत एक वृद्ध गृहस्थ वाट काढीत खोलींत शिरला आणि म्हसकरापुढें उभा राहून त्यानें हातानें प्रश्नचिन्हाची खूण केली.

" हे ना ? हे आमचे पुण्याचे स्नेही, दांडेकर आणखी जोग म्हणून आहेत. "

" पण गेलं आहे कोण ? तुमचं कुटुंब तर कोकणांत गेलं अन् इथें आजारी बिजारी तर कोणी नव्हतं, " म्हातारा म्हणाला.

" म्हणजे ? " म्हसकर त्रासिक आवाजांत म्हणाला.

" बाहेर येऊन पहा, " असें म्हणत वृद्ध गृहस्थानें म्हसकरास खोलीच्या दाराशीं नेलें. मीहि गंमत पाहण्यास दाराशीं जातों तों मीं आणिलेलें मर्तिकाचें सामान खोलीच्या बाहेरच्या अंगाशीं ठेविलें होतें तें दिसलें.

" अरे हो म्हसकर, मी अगदींच विसरलों. मींच हें सामान आणलें आहे. नातूच्या चाळींत डेथ् झाला........" माझें वाक्य तेथें पिकलेल्या हंशांत अर्धवटच राहून गेलें.

तात्पर्य, वेळीं अवेळीं गप्पागोष्टी करण्यांत माझा हातखंडा कसा आहे त्याचें हें उदाहरण सांगितलें. आतां मूळ मुद्याची गोष्ट चि. सौ. कां. चिमूताईच्या लग्नाची हकीकत सांगणें ही होय आणि तिजकडे मी वळतों.



# यू. किट्टे, आय. सी. एस.

चि. सौ. कां. चिमूताईच्या लग्नाच्या खटपटीकरितां मीं ऑफिसांतून दोन महिन्यांची रजा काढली. ती. बाबांचा लांब पारशी फॅशनचा सर्जचा कोट, त्यांची पगडी, त्यांचें उपरणें हीं सर्व त्यांच्या पेटींत लोळत पडलीं होतीं तीं बाहेर काढिलीं. भारदस्तपणा येण्याकरितां ० नंबरचा चष्मा वापरूं लागलों. चिमूताईचें लग्न ही माझ्या पाठीवरची फार मोठी जबाबदारी होती; कारण कै. ती. बाबांची ती शेवटची आज्ञा होती. तीन वर्षांपूर्वींची आठवण मला पक्की आहे. ती. बाबा मृत्युशय्येवर पडले होते, चिमणीस शेजारच्या बयाताईनीं जेवूं घालून निजविलें होतें, मी बाबांच्या उशाशीं बसलों होतों, ती. सौ. मातोश्रीचा आकांत चाललेला होता. तेव्हां क्षीण झालेल्या स्वरानें बाबांनीं मला हाक मारिली, " चिम्या ! "

" ओ बाबा, काय हवं ? " मीं नम्रपणें विचारलें.

" बाळ, माझ्यामागं चिमीचं कसं होईल याची मला काळजी लागली आहे. तुझ्याबद्दल काळजी वाटण्याचं बाकी राह्यलं नाहीं, कारण तुझ्या अभ्यासावरून पुढचे दिवे दिसतच आहेत. कुठें तरी कारकुनी नाहीं तर मास्तरकी मिळवून पोटापुरतं मिळवलंस कीं झालं. पण मीं चिमीच्या लग्नाकरितां शिलोत्री बँकेंत २००० रुपये ठेवले आहेत ते खर्च कर. तिला चांगलं स्थळ पहाण्याच्या कामांत कसूर करूं नको. " हे शब्द त्यांच्या तोंडून अडखळत

निघाले. मी अगदीं सद्‌गादित कीं कायसें ह्मणतात तसा झालों होतों. माझ्या एकुलत्या एका बहिणीसाठीं बाबांनीं न सांगतां देखील मी केवढाहि स्वार्थत्याग करण्यास तयार झालों असतों.

" चिमण, हें बघ, चिमणीचं लग्न झाल्याशिवाय तूं आपलं लग्न करून घेऊं नको, " पुन्हां डोळे उघडून बाबा म्हणाले.

" बाबा, हें सांगावयाला का पाहिजे ? तिच्याकरितां जीव देण्याचा प्रसंग आला तरी मी डगमगणार नाहीं ! "

" जीव दे किंवा नको देऊं पण तिच्या नांवचे रुपये तिच्या करतां खर्च कर, स्वतः वापरूं नको इतकंच माझं शेवटचं सांगणं आहे, " असें म्हणून बाबांनीं डोळे मिटले.

" फुटलं ग माझं कपाळ ! " असें आई ओरडली.

क्षणभरानें डोळे उघडून बाबा म्हणाले, " हें माझ्या उशा-खालीं बाळकरामकृत ठकीच्या लग्नाचं पुस्तक आहे, तें काळजी-पूर्वक वाच म्हणजे चिमणीच्या लग्नाच्या खटपटीला मार्ग-दर्शक होईल. आणखी ए ! उगाच रडूं नको. दोघां मुलांकडे पाहून........" असें म्हणून बाबांनीं पुनः डोळे मिटले आणि गरीब बिचारी आई श्रीमती झाली.

आतां चिमणी मोठी लग्नाला योग्य जाहली होती. जुन्या चालीच्या बायका, " हिचं सासर कुठें आहे ? " असें मुद्दाम विचारून आईस लाजवूं लागल्या. हिला स्थळें पहा, असें आईनें फरमावलें. त्यांत चिमीच्या आधीं स्वतःचें लग्न करणार नाहीं असें मीं बाबांना वचन दिलें असल्यामुळें तिचें लग्न लौकर करून

टाकण्यास मी किती उत्सुक झालों असेन तें वेगळें सांगावयास नको. एक टांचणवही आणून प्रथम तींत गोत्रावळी आणि छत्तीस गुण जमविण्याचे कायदे लिहून काढिले, आणि वहींत चि. सौ. कां. चिमूताई जोग हिच्या तीन कुंडल्या मांडून ठेविल्या—एक नव्या पंचांगाची, दुसरी ग्रहलाघवीय जुन्या पंचांगाची आणि तिसरी सायनची. यामुळें तीन कुंडल्यांपैकीं वराच्या कुंडलीशीं जी जमेल ती वरबापापुढें ठेवितां येत असे. पारशी लोकांत दोन पंचांगांमुळें कदमी आणि उदमी ( असेच कायसे ) दोन भेद झाले, तसे आपल्या समाजांत न होतां सोयीप्रमाणें तिहींपैकीं वाटेल त्या पंचांगाचा लोक उपयोग करून घेत आहेत ही अभिनंदनीय गोष्ट आहे. टांचणवहीच्या इतर पानांवर कोष्टकें आखून त्यांत नवरदेवांची माहिती नोंदविली, व जशीं जशीं नवीं स्थळें कळत गेलीं तशी तशी कोष्टकांत भर घालीत गेलों. ही टांचणवही अद्याप मजजवळ आहे, आणि तिच्यावरून अवशिष्ट स्थळें पहाण्यास वधूबापांना उपयोग होत असतो. वहीचें पहिलें पान पुढील प्रमाणें होतें:——

| वराचें नांव | चौकशीचें ठिकाण | धंदा, उत्पन्न | वय | खर्चाचा अंदाज. |
|---|---|---|---|---|
| अनंत आत्माराम उकिडवे आय. सी. एस्. | स्वत: वराकडे, रत्नागिरी | असि. कलेक्टर पगार रु. ६०० | २९ | २५००० रुपये. मुलगी चांगली असल्यास सवलत. |
| कमळाकर काशीनाथ किडमिडे बी. ए. | बापाकडे, भटजी महाराजांच्या मठा-जवळ सातारा. | एल्. एल्. बीच्या टर्म्स. उत्पन्न ० | २४ | ३००० रु. बॅरिस्टरीचा खर्च मि-ळाल्यास काळी मु. पत्करतील. |
| वामन नरहर रटाटे, मॅट्रिक नापास. | गोऱ्या रामाजवळ नासिक. मामाकडे विचारणें. | मोटार ड्रायव्हर दरमहा रु. ६० | २२ | हुंड्याची अट नाहीं. |
| रामचंद्र सदाशिव भट, एम्. ए. ( १ क्लास ) | बापाकडे चौकशी. मु. कुरधें, जि. रत्नागिरी. | शिक्षक रायपूर हायस्कूल रु. ५० | २५ | हुंडा व करणी रु. २५०० मुलगी सुस्वरूप व शिकलेली. |

वेगळाल्या पंचांगांवरून जशा तीन प्रकारच्या कुंडल्या करविल्या तसे चिमूताईचे दोन प्रकारचे फोटो काढविले. एक सुधारकांकरितां व दुसरा दुर्धारकांकरितां. पहिल्यांत कु. चिमूबाला डोळ्यांस आरशी लावून टेबलाशीं वाचीत बसलेली आहे. तिचा वांकडा भांग, कुरळे केस, बारीक कुंकुमतिलक, आंगांतला दिसतो न दिसतो असा ब्लाउज, कानांतील कुडीं, हातांत एकएक सोन्याची बांगडी, नाकांतील मुगबट आणि एकाद्या विदुषीप्रमाणें खुर्चीवर बसण्याची ऐट, यांकडे पाहून कोणासहि वाटेल कीं, ही एक नामांकित कवयित्री किंवा लघुकथालेखिका आहे असें! दुसऱ्यांत चि. सौ. कां. चिमूताई फोटोग्राफराकडे हमेष असणाऱ्या लाकडी पोकळस्तंभावर एक हात टेकून उभी आहे. तिचा सरळ भांग, ठळक कुंकुमटिळा, त्याच्याखालीं हळदीचा डाग, नाकापेक्षां जड नथ, इरकली लुगडें, पायांत सांखळ्या, हातांत भरपूर कांकणें, यांच्या योगानें ती अव्वल इंग्रजींतल्या खानदानी घराण्यांतल्या स्वकुलतारक सुतेसारखी गरीब मुलगी दिसत होती. सुधारकी फोटोंतल्या चिमूताईला फौन्टन पेनपेक्षां जड ओझें उचलण्याची सवय नाहीं असें, आणि दुसऱ्यांतल्या तिला बाधलीभर धुण्यांचें ओझें सुद्धां हास्यास्पदपणें हलकें वाटेल असें दिसत होतें.

याप्रमाणें तयारी करून मी बहिणीचें लग्न जमविण्यास निघालों. आई म्हणाली, " अप्पा, तूं अजून अजाण आहेस. गुंड्याभाऊला तरी बरोबर घेऊन जा." परंतु दुसऱ्याला श्रेय द्यावयाचें माझ्या मनांत नव्हतें. मीं आपली टांचणवही काढिली. तींत पहिलें स्थळ रत्नागिरीचें होतें व दुसरें साताऱ्याचें होतें. मीं विचार

केला कीं, प्रथम साताऱ्यास आणि तेथून पुढें कोल्हापुरमार्गें रत्नागिरीस जावें. म्हणून पत्रिका व फोटो बरोबर घेऊन एका शनिवारीं दुपारीं पुण्याहून निघून साताऱ्यास गेलों. तेथें किडमिड्यांचा शोध करून त्यांच्याच घरीं मुक्काम केला.

किडमिड्यांनीं प्रथम मला चि. चिमूताईबद्दल माहिती विचारिली. किडमिडे मंडळीचा एकंदर थाट जुन्या चालीचा दिसल्यामुळें मीं तिचा दुर्धारकी फोटो बाहेर काढिला. नंतर त्यांनीं पत्रिकेबद्दल विचारिलें असतां मीं थाप दिली, " पत्रिका आणायला विसरलों बुवा ! बाकी कमळाकरपंतांची पत्रिका जर मला दाखवाल तर फार बरें होईल." माझ्या मनांतला हेतु एवढाच कीं, ' मुला'च्या पत्रिकेस जमेल तीच पत्रिका पाकिटांतून काढून किडमिड्यांच्या हातांत द्यावी.

पुढें जेवणाचे वेळीं काशीनाथपंतांनीं माझी सगळी चौकशी केली. मी अविवाहित आहें असें कळाल्यावर त्यांनीं म्हटलें, " मग स्वतःचें लग्न अगोदर कां करून घेत नाहीं ? "

" छे ! बहिणीचें लग्न झाल्याशिवाय स्वतःचें लग्न करून घ्यायचें नाहीं असा माझा निश्चय आहे, " मीं उत्तर केलें.

" अहो, पण कन्यादान करायला तुमच्या बहिणीचे वडील हयात नाहींत, मग तुम्ही काय एखाद्या म्हाताऱ्यासारखी कडोसरीला सुपारी लावून बहिणीचं लग्न करणार कीं काय ? त्यापेक्षां आमच्या काऊला पदरांत घ्या म्हणजे तुमच्या बहिणीचं लग्न जुळवण्याच्या कामीं आम्ही कंबर कसून तुम्हांला मदत करूं. "

यावर काय उत्तर द्यावें हें माझें मला समजेना. मीं कोणत्या

प्रकारें आढेवेढे घेतले आणि नकार किती जोरानें प्रदर्शित केला तें वर्णन कितीहि जीव तोडून केलें तरी वाचणारांस खरें वाटणार नाहीं, तेव्हां त्या भानगडींत न पडतां इतकेंच सांगतों कीं, साधारण शेंकडा नव्याण्णवांत मोडणाऱ्या इसमास दाखवितां येईल इतका दृढनिश्चय मीं दाखविला. परंतु हा चिमणराव म्हणजे कांहीं भीष्म नव्हे.

काशीनाथपंतांनीं माझें सगळें बोलणें हासण्यावारीं घालविलें आणि स्वयंपाकघराकडे तोंड करून ते मोठ्यानें बोलले, " अग काऊ, कोशिंबीर घेऊन ये पाहूं वाढायला ! पानांतली संपली आहे. ये इतक्यांतच कांहीं लाजायला नको." बापाची आज्ञा ऐकून कोशिंबिरीची दगडी हातांत घेऊन काऊताई वाढावयास आली. त्या मुलीविषयीं मला त्या वेळीं काय वाटलें तें " कोशिंबीर वाढणाऱ्या कुमारीस पाहून " नांवाच्या भावसुनीतगज्जलांत मीं वर्णन केलें होतें, परंतु हें सुंदर काव्य काव्यदेवतेच्या दुर्दैवानें काऊताई यांच्या रोषास बळी पडलें.

वाढून ती परत गेल्यावर काशीनाथपंत म्हणतात, " पाहिलीत मिस्टर जोग, आमची काऊताई ! लाखांत मुलगी आहे लाखांत ! "

मलाहि तसें वाटलें आणि लग्नापूर्वी एका अर्थानें प्रत्येक पुरुषाला आपापल्या वधूविषयीं तसेंच वाटतें; लग्नांतर थोडे दिवस तिची लाखवारी कायम असते, व पुढील आयुष्यांत हळूंहळूं भूमितिश्रेढीनें ती कमी कमी होत जाते. शून्यापर्यंत आल्यावर उलट अर्थानें ती पुन्हा वाढत जाऊन आपल्या बायकोसारखी कुरूप

बायको लाखांत सांपडणार नाहीं असें वाटूं लागतें.

" हिला न्यू इंग्लिश स्कुलांत घातली आहे, कारण येथें अद्याप मुलींची शाळा नाहीं; पण तिथेंहि हिचा नंबर पहिला असतो. शिवाय गृहकृत्यांत अशी प्रवीण आहे कीं पुसूं नका. फार हुषार ! " तिची प्रशंसा करीत पंत बोलले.

" प्रत्येक बापाला आपल्या मुलीविषयीं असेंच वाटतें ! "–मी.

" त्यांत संशय नाहीं. पण इतर लोकांच्या आपापल्या मुलीं-बद्दलच्या कल्पना अतिशयोक्तिपूर्ण असतात, तसें माझें नाहीं हो ! मला आपल्या मुलीबद्दल न्याय्य आणखी योग्य असाच अभिमान आहे. ती करील आपल्या नवऱ्याला सुखीतम पुरुष ! " हें शेव-टचें वाक्य जोर येण्यासाठीं काशीनाथपंतांनीं इंग्रजींत उच्चारलें.

जेवण झाल्यावर काशीनाथपंत घरांत बराच वेळ बायकोशीं कुजबूज करून ओसरीवरील झोपाळ्यावर मी बसलों होतों तेथें बाहेर आले. ओसरींतून माजघरांत जाण्याच्या दाराआड सौ. काशी-बाई उभ्या राहून आमचें संभाषण ऐकूं लागल्या. संभाषण समग्र देऊन विनाकारण वाचकांचा वेळ घेत नाहीं. इतकेंच सांगतों कीं, काऊताईशीं माझें लग्न ठरलें. आमचें लग्न झाल्यावर चिमूताई-साठीं स्थळें पहाण्याचें व नच जमल्यास तिला स्वतःची सून करून घेण्याचें पंतांनीं कबूल केलें; म्हणूनच मी या खटाटोपांत पडलों, स्वार्थपरायणतेनें नव्हे.

परंतु आईला मात्र तसें वाटलें नाहीं. मी साताऱ्यास जाऊन स्वतःचें लग्न ठरवून आलों हें कळतांच तिनें मला शिव्यांची लाखोली वाहिली. परंतु बहिणीकरितां मीं केवढा स्वार्थत्याग केला

याची जाणीव तिला कशी होणार ? मीं तिला सांगितलें कीं, किड-मिड्यांची मुलगी मीं केली कीं, चिमूताईला ते आपली सून म्हणून पत्करणार आहेत. हें ऐकून चवताळून ती ओरडली, " मेल्या ! कांहींबाहीं सांगून माझी समजूत घालायला पहातो आहेस का ? आपण काय असं साटंलोटं करावयाला देशस्थ आहोंत का आणखी कोणी आहोंत ? मला फसवायला पहातोय मोठा ! "

*　　　*　　　*　　　*

लग्नांच्या थंड्या मोसमांत म्हणजे मार्गशीर्षांत माझें लग्न झालें. लग्नांचा खरा हंगाम वैशाखांत असतो. वैशाखाचे डोहाळे पुण्य-नगरीस लागले कीं, तिची शोभा अवर्णनीय होते आणि ज्याच्या त्याच्या तोंडीं एकच्च विषय ऐकूं येत असतो. जरा बुधवार चौकांत उभे राहिलां आणि जाणारायेणारांच्या तोंडचे शब्द ऐकण्याचा यत्न केला तर असे उद्गार कानीं पडतील:—

अहो, मुलगी उफाड्याची आहे म्हणून मोठी दिसते. बाकी त्या मुलाच्या मानानें कांहीं मोठी दिसायची नाहीं हो ! बाकी आतां कांहींतरी खुसपट काढून फेंटाळायचेंच असेल तर गोष्ट निराळी !

काय हो, गेल्या वर्षीं पुष्कळ लग्नं लागलीं. पण त्यांत गंमत अशी झाली कीं, मुलांपेक्षां मुलीकडलीं लग्नं जवळजवळ दुप्पट झालीं ! आतां यंदाचं प्रमाण काय बसतं तें पाहूं.

आरं त्यो रामा हें काय धरून बसलाया, दोनशें रुपय् घेतल्या-बिगर पोरगी देत नाहीं !

अहो, मंजुळाबाई, मी म्हणल्यें मुलगी आहे सासूच्या मुळावर आणखी सासू तर झाली आहे अर्धांगवायूनं लुळी पांगळी. मी

म्हणत्यें, सुनेच्या ग्रहबळानं एकदां बिचारीची कायमची सुटका तरी होईल. मग काय हरकत आहे करून घ्यायला ?

“ ए रामभट, एकादं स्थळ सांग ना कमी हुंड्याचं ! खाऊन पिऊन सुखी असलं म्हणजे झालं. ”

“ अरे धोंड्र. स्थळं आहेत कुठें आपल्या काणणवांत ? नुस्ता मॅट्रिक झाला कीं पांचशें रुपये छन् छन् वाजवून घ्यायला पहातो.”

हें बघा शेट, आतां लग्नसराईमंदी आमचे कमाईचे दिवस. एक पंगत वाजवली कीं पंधरा रुपय् मोजून घेतों पटापट ! आतां वैशाख आला कीं तुमची बाकी नाहीं ठेवीत. समदं व्याजासकट फेडून टाकतों बघा. वांईच दमानं घ्या.

जिकडे तिकडे स्थळें, टिपण, मुलगी, मुलगा, मुहूर्त, हुंडा, कजाग, एकनाड, बिजवर असे शब्द कानीं पडतात. सिमल्यापासून कोलंबो आणि क्वेट्यापासून रंगूनपर्यंतचे दक्षिणी लोक आपापल्या मुली बरोबर घेऊन त्यांना उजविण्यासाठीं जमा होतात. अर्थात् नवरदेव, आणि सूनमुख पहाण्यासाठीं उतावळे झालेले त्यांचे आई-बाप पुण्यास येऊन ठाणें देतात. खेडेगांवचे शाळामास्तर बीन-पगारी रजा काढून तीन रुपये रोजावर वाढप्याचें काम करण्यास गोळा होतात. भाज्या, दूध, मजुरी यांचे दर चढतात. परगांवच्या लग्नेच्छु वधूवरांच्या वडील माणसांच्या लांबलचक मुक्कामांनीं कुटुं-बवत्सल रहिवासी कंटाळून जातात; आणि त्यांची ब्याद घाल-विण्याकरितां का होईना पाहुण्यांच्या स्थलसंशोधनास अंत:करण-पूर्वक मदत करितात.

किडमिड्यांच्या घरीं चिमूताई पडण्याऐवजीं त्यांचीच मुलगी

जोगांच्या घरीं आली, याबद्दल आई रागावली, चिमूताई खट्टू झाली, गुंड्याभाऊ आणि मित्रमंडळी मला बावळट बावळट म्हणून चिडवूं लागले. तेव्हां मीं कानास खडा लावून घेतला आणि सर्वांस म्हटलें, " हें पहा, माझी एकदां चूक झाली खरी. आतां पुन्हां चिमूताईला नवरा पाहायला गेलों तर कुणीं कितीहि आग्रह करो, त्याची मुलगी मी गळ्यांत बांधून घेणार नाहीं, समजलांत ? " मीं इतक्या सरळपणानें हें वचन दिलें परंतु कोणासहि तें खरें वाटलें नाहीं; कारण तें ऐकून सर्वांची हासतां हासतां मुरकुंडी वळली. सौ. सुद्धां पदराआडून हासली असा मला संशय आला.

वरांच्या माझ्या जवळील यादींत पहिलें नांव अनंत आत्माराम उकिडवे आय. सी. एस्. यांचें होतें. मजसारख्या गरिबाला ही उडी झेपणार नाहीं असें वाटल्यानें मी प्रथम साताऱ्याचें स्थळ पहाण्यास गेलों होतों. परंतु तेथें योग अकल्पित घडून आला. चिमीला नवरा मिळविण्याऐवजीं मीं तिला भावजयच आणिली, त्यामुळें तिचा मजवर झालेला सकारण राग घालविण्याकरितां तिला आय. सी. एस. ची बायको करणें हा चांगला उपाय वाटला, आणि तो मीं आईस सांगितला. तेव्हां ती म्हणाली " नको रे बाबा, आपल्या गरिबांला हें स्थळ कसं झेपणार ? हे विलायतेला जाऊन आलेले लोक विलायतचा सगळा खर्च सासऱ्याकडून काढून घेतात. अन् अलीकडे तर हे मेले बायकांना गोऱ्या सवती आणायला शिकले आहेत ! "

" मग काय जाऊं नको म्हणतेस ? " पडल्या फळाच्या आज्ञेच्या आशेनें मी विचारलें.

" तसं नाहीं अगदींच," आई मला उत्तेजन देत म्हणाली, " सगळेच तसे असतात असं माझं म्हणणं नाहीं. पण असल्या विलायती लोकांची नीट चौकशी केली पाहिजे. त्या रावबहादुर भोळ्यांना भरावे लागले तीस हजार रुपये, तेव्हां त्यांच्या जांवयानीं मड्डम आणून ठेविली होती घरांत, तिची धिंडका बाहेर निघाली न् मग त्यांच्या मुलीला सुख लागलं "

" ती काळजी आपल्याला नको, कारण आपल्याजवळ तीस हजार रुपयेच काय पण तीस हजार कवडया देखील सांपडायच्या नाहींत. पण अशी माझ्या मेहुण्यानं पांढरी बाई आणिली तर अश्शा तिच्या झिपऱ्या ओढून तिला विलायतच्या बोटींत फेकून द्यायला हा चिमणाजी आप्पा कमी करणार नाहीं ! "

" मोठा शूर माहीत आहेस ! " माझ्या भोवतीं काल्पनिक दिवे ओवाळीत आई म्हणाली, " पण गुंडयाभाऊला घेऊन जा बरोबर म्हणजे मागच्यासारखी फाजिती होणार नाहीं. तो व्यवहारांत जरा कुशल आहे. कांहीं काळंबेरं असलं तर तेव्हांच ओळखून काढील. "

आईच्या आज्ञेप्रमाणें दोन दिवसांनीं गुंड्याभाऊला घेऊन तुकाराम बोटीनें रत्नागिरीस जाण्याला निघालो. बोटींत शनवारांतले रावसाहेब फडणीस आपल्या मुलीला घेऊन तेथेंच जाण्यास निघाले होते. मात्र आपण कोणत्या कामाला जात आहों तें ते सांगत नव्हते. दुसरे एक नाशिकचे गृहस्थहि जात होते, ते आपल्याला जैतापुरास उतरावयाचें आहे असें म्हणत होते. हे गृहस्थ उाकि-डवे यांची बारकाईनें चौकशी करीत होते, परंतु ही चौकशी आपण

सहज कुतूहलानें करीत आहों असें ते सांगत होते.

आम्हां चौघांना उकिडव्यांविषयीं बोलतांना पाहून लोअर क्लासांत बसलेले एक मोठ्या मिशा आणि पांढरा फेटावाले बुवा आमच्याकडे आले आणि पुसते झाले, "काय मंडळी, उकिडव्यांचा तपास चालला आहे ? तुम्हांला खबर नाहीं वाटतं.—"

" काय ? " आम्ही चौघे एकदम ओरडलों.

" काय काय ? खबर इतकीच कीं, तरतच त्यांचं ल ग न झा लं ! " मोठ्या मिशा आणि पांढरा फेटावाल्या गृहस्थानें आपलें वाक्य पुरें केलें.

गुंड्याभाऊ खेरीज बाकीच्या आम्हां तिघांचीं तोंडें उतरलीं. त्यानें मात्र त्याला विचारिलें, " पण काय हो, मग तुम्ही आपल्या मुलीला घेऊन रत्नागिरीला कशाला चाललां आहां ? ती तुमच्या सामानाजवळ तुपाच्या डब्यावर बसलेली तुमची मुलगीच दिसते आहे ! "

" हं, दिसती आहे खरी. दोघांचा चेहरा अगदीं एकाच घाटाचा दिसतो आहे बुवा ! " नाशिककर हांसत गुंड्याभाऊस संमतले.

आपलें बेंड उघडकीस आलेलें पाहून तो गृहस्थ गोंधळल्या-सारखा दिसला आणि, " मी तिला दाखवायला नाहीं चाललों. अरे पण तो पहा तिकीट कलेक्टर आला, मी आपल्या जागीं जाऊन बसतों. " असें म्हणून त्यानें आपल्या जागेकडे पळ काढिला.




तरतच उकिडव्यांचं ल ग न झा लं !

" पाहिलं ? कसे वस्ताद आहेत राजेश्री ! म्हणे उकिडव्यांचं लग्न झालेलं आहे, म्हणजे आम्हांला तें खरं वाटावं आणखी आम्हीं त्याच्या मार्गांत येऊं नये, म्हणून थापा द्यायचा यत्न चालला होता, " गुंड्याभाऊ म्हणाला.

" एव्हरीथिंग इज फेअर इन लव्ह अँन्ड वॉर, या इंग्रजी म्हणींत देशपरत्वें फरक करून एव्हरीथिंग इज फेअर इन मॅरेज सेटूलमेंट अँड इलेक्शान, असं हिंदुस्थानांत म्हणायला हरकत नाहीं," असें जैतापुरला जाण्यास निघालेले गृहस्थ म्हणाले.

" म्हणूनच हे राजेश्री जैतापुरला जाण्याची थाप देत आहेत, बरं कां ? " गुंड्याभाऊ माझ्या कानांत पुटपुटला.

मुंबई बंदरची हद्द संपेपर्यंत मी बोटींत बसून राहिलों आणि बोट ' लागते ' म्हणतात ती कशी याचें नवल करीत होतों. इतक्यांत मोकळ्या दर्यांत बोट येऊन आडवे उभे झोके खाऊं लागली, तेव्हां मी घट्ट डोळे मिटून पडलों. थोड्याच वेळांत खांदेरी—उंदेरीच्या मधून ती जाऊं लागल्यावर जिकडे तिकडे ओकाबोकी सुरू झाली. मीहि तीस थोडाबहुत तोंडभार लाविला. शेवटीं संध्याकाळीं रत्नागिरी आली. बोटींतून पडावांत आणि पडावांतून खलाशांच्या खांद्यावर बसून आम्ही किनाऱ्यावर उतरलों. पृथ्वी सूर्याभोवतीं फिरत आहे असें आम्हीं भूगोलांत पाठ केलें होतें, परंतु सूर्याऐवजीं ती आतां माझ्याभोवतीं गरगर फिरूं लागली होती. रात्रीं विश्रांति घेऊन सकाळीं जागा झालों तेव्हां सर्व स्थिरस्थावर झाल्याचें माझ्या नजरेस आलें.

सकाळीं आठ वाजतां चि. चिमूताईचा सुधारक वेषांतला

फोटो व तिच्या तिन्ही कुंडल्या घेऊन आणि भारदस्त पोषाक करून मी, गुंड्याभाऊ आणि रत्नागिरीस आम्ही ज्यांच्या घरीं उतरलों होतों ते भार्गवराव असे तिघे उकिडव्यांच्या बंगल्यावर जाण्यास निघालों. न गच्छेद् ब्राम्हणत्रयम् असें निमित्त काढून भार्गवराव बंगल्याच्या फाटकापासून माघारे गेले आम्ही बंगल्याच्या मधल्या दालनांत गेलों तों आगबोटींतले तिन्ही मित्र तेथें आधीं-पासून विराजमान झालेले दिसले ! नाशिककर गृहस्थांस मीं नमस्कार करून पुसलें, “ काय महाराज, तुमचं जैतापुर इथेंच झालं वाटतं ? ”

आपल्या नारिंगी पगडीच्या झिरमळ्या हलवीत फक्त हास-ण्यापलीकडे त्यांनीं कांहीं उत्तर दिलें नाहीं.

नंतर मोठ्या मिशा आणि पांढरा फेटावाल्या गृहस्थांस नमस्कार करून मीं विचारिलें, “ काय हो, उकिडव्यांचं लग्न झालं असं तुम्ही म्हणत होतां ना ? ”

“ असं ऐकलं होतं बुवा ! पण त्यांना फरीवार लग्न करायचं असेल, नाहीं तर त्यांची पहिली बायको मैयत झाली असेल,” त्यानें उत्तर दिलें.

इतक्यांत इंग्रजी पद्धतीचा पायजमा सूट घातलेले उकिडवे साहेब चिरूट फुंकीत हॉलांत प्राप्त होऊन सर्वांशीं स्मितहास्य करीत हस्तांदोलन करून मध्यभागीं खुर्चीवर विराजमान झाले. “ काय साहेब, इथें कुणीकडे” ? त्यांनीं रावसाहेब फडणिसांस विचारलें, कारण फडणिसांचा रुबाब त्यांना पहिली विचारपूस मिळावी असाच होता.

" साहेब, मी पुण्याचा फडणीस-रावसाहेब फडणीस "

" ओ येस्. तुम्हीं होतें लिहिलें एक पत्र विषयीं तुमच्या मुलीच्या. नाहीं काय ? " साहेब इंग्रजींत म्हणाले, " आणि आहेत हे सर्व लोक आलेले याच कामा करतां ? "

" आम्हीहि आपापल्या मुलींकरितां आलों आहों साहेब. आणखी आपल्याला ज्याची मुलगी पसंद पडेल तिच्याशीं लग्न करावं-" पांढरा रुमालवाला म्हणाला.

" साहेब, माझी मुलगी अठरा वर्षांची आहे-" नाशिककर म्हणाले.

" आणखी माझी एकुणीसची आहे-" रावसाहेब म्हणाले.

" माझी मॅट्रिक फेल आहे पण यंदां पुनः बसली आहे, " नाशिककरांनीं सांगितलें.

" माझी तर इंटरला बसली आहे, शिवाय मॅट्रिकमध्यें तिला संस्कृत प्राइझ मिळालं होतं. हार्मोनियम, शिवणकाम, पेंटिंग, सगळ्यांवर तिची मास्टरी आहे. कोणतीहि नवी कला पिकप् करण्यांत हातखंडा आहे, " रावसाहेब उभे राहून दोन्ही हात जोडून म्हणाले. आपण आपल्या जिल्ह्याच्या असिस्टंट कलेक्टरपुढें बोलत नसून दुसऱ्या एका जिल्ह्याच्या असिस्टंट कलेक्टरपुढें खासगी गोष्ट बोलत आहों, ही गोष्ट ते विसरले होते.

" साहेब, " पांढरा फेटावाला लांब मिशांचा बुवा हात जोडून म्हणतो, " आतां माझं तरी ऐका. माझी मुलगी मॅट्रिक फेल नाहीं कीं इंटर पास नाहीं, आणखी कांहीं नाहीं. बापजी, मुलींना ही केळवणी काय उपयोगाची आहे? असिष्टण कलेक्टरची बायको होऊन तिला काय मास्तरणीची नोकरी धरायची आहे

थोडीच ? पण माझी गंगी–"

"माझी चिमणी"–मीं बोलण्याचा यत्न केला, परंतु त्या बुवानें आवाज अधिक चढवून माझा आवाज त्यांत बुडवून टाकिला व म्हटलें, "माझा गंगीला बेतापुरतं लिहायवाचायला येतं, पण शिवणटिपण, सांजी काढणं, भरतकाम, यांत तिनं बक्षिसं मिळविलीं आहेत. रसोई तर अशी नामी करते कीं, एकदां तिच्या हातचं जेवलेला माणूस हयातभर तिची आठवण काढील. म्हैशीची धार तर अशी बेटी चलाखीनीं काढते कीं, पांच शेर दूध देणाऱ्या म्हैशींनीं तिचा हात कासेला लागला कीं, पाव पाव मण दूध दिलेलं आहे. आतां बोला !" असा कन्यागुणगौरव करून इतरांना आव्हान देत बुवा चोहोंकडे ऐटीनें पाहूं लागले.

"काय हो, असिष्टण कलेक्टरची बायको होऊन शेवटीं म्हशीची धारच काढायची असली तर त्यापेक्षां एखाद्या डेअरीवाल्या ब्राह्मणाला कां नाहीं मुलगी देत ?" गुंड्याभाऊनें त्यास विचारिलें.

"माझी बहीण–" मीं पुनः बोलण्याचा यत्न केला.

परंतु "माझ्या मुलीनं एखाद्या आय. सी. एस. च्या नाहींतर आय. एम. एस. च्या किंवा संस्थानिकाच्या घराला शोभा द्यावी आणि युरोपियन समाजांत तिला बरोबर अभिमानानं घेऊन जातां यावं असं कल्चरल ( सांस्कारिक ) शिक्षण मीं तिला दिलं आहे," या रावसाहेबांच्या भाषणानें पुनः मला गप्प बसावें लागलें.

उकिडवे साहेबांनीं इतका वेळ तोंडांत चिरूट धरून ठेविला असल्यामुळें त्यांस आपल्या श्वशुरपदावर नजर ठेवणाऱ्या गृह-

स्थांच्या चढाओढींत भाग घेतां आला नाहीं; परंतु चिरूट विझत आल्यावर तो बाजूस ठेवून ते आतां बोलूं लागले, " सद्गृहस्थ हो, माझ्या वैवाहिक सुखाची तुमच्यासारख्या तिऱ्हाइतांनीं इतकी आस्था बाळगावी हे मजवर आपले थोर उपकार आहेत. तुमचे सर्वांचे अभिप्राय ऐकून मलाहि दोन शब्द बोलावेसे वाटतात. मला असं वाटतं कीं, पाश्चात्य देशांतल्याप्रमाणें बेजबाबदार वयोमर्यादेपर्यंत मुली न वाढवतां लहानपणींच त्यांचीं लग्न करावीं. मला फारशी ग्रोन् अप ( वाढलेली ) मुलगी नको आहे—"

"साहेब माझी मुलगी फक्त सोळा वर्षांची आहे," नाशिककरांनीं मध्येंच सांगितलें.

" आणखी माझी पंधरा वर्षांची आहे," रावसाहेब म्हणाले.

" पण मघाशींच म्हणालां होतां ना कीं ही एकोणीस वर्षांची आहे असं ? " गुड्याभाऊनें विचारलें.

"ती चांद्र वर्षमानानं एकोणीसची असली तरी सौर वर्षाप्रमाणं पंधराची आहे," रावसाहेबांनीं स्पष्टीकरण केलें.

" माझी गंगी मोठ्ठाड दिसते पण वयानीं चौदापेक्षां लहानच आहे. आमच्या काठेवाडचीं जनावरं आकारांनीं मोठ्ठींच दिसतात," मोठ्या मिशावाला म्हणाला.

" आणखी माझी चिमूताई—" मी बोलूं लागलों; तोंच उकिडवेसाहेब पुढें म्हणाले, " शिक्षण हा बायकांच्या बाबतींत फारसा महत्त्वाचा मुद्दा मी समजत नाहीं. माझ्या पोझिशनच्या माणसाच्या बायकोचं शिक्षणावांचून कांहीं अडत नाहीं."

पांढऱ्या फेटेवाल्याच्या मिशा स्फुरण पावूं लागून त्यांच्या

जंजाळांतून पुढील उद्गार बाहेर पडले, "म्हणूनच माझ्या गंगीला मीं शिकवलं नाहीं. त्यांतून आमच्या राजकोटास दक्षणी शिकायची गोठवण आहेच कुठें मुळीं ?"

" माझ्या बहिणीला सुद्धां—" मीं चौथ्यांदा बोलण्याचा यत्न केला; परंतु मजकडे लक्ष न देतां उकिडवे पुनः बोलूं लागले, " त्याचप्रमाणं गृहशिक्षणाची देखील विशेष गरज माझ्या भावी पत्नीला नाहीं. कारण सिव्हिल सर्व्हंटाला चारपांच नोकर ठेवायची ऐपत असते. तेव्हां शिक्षणाकडे मी सहानुभूतीनें पहाणार नाहीं. साधारणपणें स्वरूपाकडे लक्ष पुरवून वधू पसंत करायचं मीं ठरविलं आहे. "

" साहेब, माझ्यावरून माझ्या मुलीच्या स्वरूपाची कल्पना तुम्हांला होईलच. तूर्त हा फोटो पहा म्हणजे तिच्या सौंदर्याची खात्री होईल "—रावसाहेब.

" माझी मुलगी मजसारखी बिलकूल नसून आईच्या वळणावर गेलेली आहे, असं आश्वासन मीं आपल्याला देतों, " नाशिककर म्हणाले.

उकिडवे यांस स्वरूपाचें फारसें आकर्षण वाटलें नाहीं. चित्रपट मंडळ्या निघाल्यापासून पैसेवाल्या लोकांच्या सुंदर स्त्रिया आणि मुली यांच्या गृहवासावर जबरदस्त घाला पडला आहे, व म्हणून आपल्याला कांहीं अगदीं हजारांतली मुलगी नको असें त्यांचें म्हणणें पडलें.

आपली गंगी शंभरांतली आहे असें काठेवाडी गृहस्थांनीं सांगितलें.

" माझी चिमूताई तर दहा जणींसारखीच आहे ! " चार वेळां अपूर्ण वाक्यें बोलल्यानंतर हें एकच पूर्ण वाक्य बोलण्याची मला संधि मिळाली.

" कृपा करून नका अडथळूं मला बोलण्यांत, " असें इंग्रजींत बजावून उकिडवे म्हणाले, " अलीकडे असं फॅड् निघालं आहे कीं, हुंडा म्हणजे फार वाईट चाल आहे. विशेषतः या मताचे अनुयायी मुलींचे बाप आणखी ज्यांचीं लग्नं अजून लांब आहेत असे विद्यार्थी हेच असतात. हुंडा कां नको तर तो मुलींच्या बापांना जाचक असतो, त्यांना पिळून काढतो, आणखी पुष्कळ रॅट्—मी म्हणतों, मुलगे आपल्या बापाला जाचक कां नाहीं वाटत ? फरक इतकाच कीं, पूर्वींच्या मुसलमान ॲड्व्हेंचरर्सप्रमाणें मुली बापाला एकदम लुटतात, आणि इंग्रजांप्रमाणें मुलगे बापाला हळूंहळूं शोषून घेतात. माझंच उदाहरण घ्याना ? माझ्या बापाला लागलं काढावं कर्ज पंचवीस हजाराचं माझ्या शिक्षणाकरतां ! "

" पण मिस्टर उकिडवे, मुलाकडून हे पैसे बाप परत घेऊं शकतो तसे मुलीकडून थोडेच परत मिळताहेत ? " गुंड्याभाऊनें म्हटलें.

" ओ रॅट् ! तो रामाचा काळ आतां राह्यला नाहीं. माझंच उदाहरण घ्याना ! बापानं माझ्याकरतां घरदार गहाण टाकून मला आय. सी. एस. केलं पण मी नाहीं त्यांला पाठवीत एक फार्दिंग देखील ! मला सहाशें रुपये पुरले तर पाठवीन ना ! तें जाऊं द्या. सांगायचा मुद्दा असा कीं, आपल्या मुलाला रहायला बंगला असावा, चार नोकरचाकर घरीं राबावे, मोटारींतून हिंडायला मिळावं, मुलखावर सत्ता असावी, कसली ददात नसावी असं माझ्या फाद-

रला वाटत होतं, म्हणून त्यांनीं सॅक्रिफाइस करून माझ्या करतां पंचवीस हजार रुपये खर्च केले ! माझ्या फादरचं हें करणं तुम्हांला बरोबर वाटतं कीं नाहीं ? "

" अलबत ! " रावसाहेब उद्‌गारले.

" केव्हांहि ! " नाशिककर ओरडले.

" खरी वात ! " पांढरा फेटावाले म्हणाले.

" अगदीं बरोबर, अगदीं असंच ! " मीं रुकार दिला.

" त्याचप्रमाणें आपली मुलगी थाटांत आणि डामडौलांत रहावी, तिला कसलीहि काळजी नसावी, तिला काम पडूं नये, या उच्च कन्याप्रेमाच्या भरांतच तुम्ही मला आपापली मुलगी देऊं करायला आलां आहां ना ? " वकिली थाटानें उकिडव्यांनीं प्रश्न केला.

" होय् ! " सर्वजण एकदम ओरडले.

" तर मग माझ्या वडलांचं अनुकरण करून तुम्हींहि तितकेच रुपये मुलीच्या भावी सौख्याकरितां आणि सिव्हिलियनचा सासरा म्हणून मिरवायच्या आपल्या स्वतःच्या हौसेकरतां खर्च करण्याला कां तयार होऊं नये ? " उकिडव्यांचा हा तडकातडफी प्रश्न ऐकून आम्ही सगळे आ वासून आश्चर्यानें त्यांच्या तोंडाकडे पाहूं लागलों. त्यांच्या तर्कटशास्त्राला समर्पक उत्तर आम्हांला सुचेना. आश्चर्याचा भर ओसरल्यावर मी म्हणालों, " माझ्या बहिणीकरितां वडिलांनीं फक्त दोनच हजार रुपये ठेविले आहेत. "

" मी तीन हजारांला तयार आहें. पैकीं हजार रुपये वाटलं तर आगाऊ घ्या, बाकीचे हप्त्याहप्त्यांनीं फेडून टाकीन, " लांब मिशांतून शब्द निघाले.

" सर, मी गरीब आहें; पण माझ्या एकुलत्या एका मुली-करतां माझ्या जवळचे सगळे पैसे खर्च करायला मागें घेणार नाहीं. माझ्या वाइफच्या सिकनेसमध्यें मीं चारपांच हजार खर्च केले. शिकस्त दहा हजारपर्यंत माझी मजल; पण आपल्याला मिळेल आदर्श बायको ! " रावसाहेबांनीं पुनः उभें राहून उपरण्यांत गुंडाळलेले हात जोडून नम्रपणें विनविलें.

" आणखी मींसुद्धां माझ्या मुलीवरून पंचवीस हजार रुपये ओंवाळून टाकले असते हो, पण काय करावं ? " नाशिकचे गृहस्थ काकुळतीस येऊन बोलूं लागले, " पण जेव्हां जेव्हां थोडेबहुत पैसे मजजवळ सांठत तेव्हां तेव्हां माझंच लग्न करायची वेळ येई. "

" कारण ? इतक्या बायका मेल्या कीं काय ? "

" नाहीं हो. पण पुत्रसंतति नाहीं ह्मणून चार लग्नं केलीं, शेवटीं मुलगा नाहीं तो नाहींच. एवंच माझ्याजवळ पैसा बिलकूल नाहीं खरा, पण उकिडवे महाराज ! तुम्हांला चार सास्वांचा लाभ मिळेल ! "

" अरे बापरे ! सासू हें एक अवश्यक संकट ह्मणून पाश्चात्य देशांत समजूत आहे. मग या चार सास्वा ह्मणजे चौपट संकट बळेनं ओढून कोण घेतो" ?—उकिडवे.

" पण आपल्या देशांत सासू हें संकट नसून जिवंत घबाड आहे म्हणाना ? बाळंतपण, आजारीपण, मंगलकार्य कांहीं असलं तरी आपल्याला मनुष्यबळाची कधींहि अडचण पडणार नाहीं. दर वर्षीं आपल्या घरीं बाळंतपण झालं तरी मुलीची

एकादी आई तरी हजर राहीलच. ‘ मुलीला मोळा लावायला आई आहे कां नाहीं ? ’ असं सगळींजणं विचारतात, माझ्या मुलीला तर चार आया आहेत महाराज ! ’ असें नाशिककरांचें भाषण चालू असतांच बंगल्याच्या दाराशीं धडाधड सामान येऊन पडत असल्याचा आवाज माझ्या कानीं येत होता आणि मधूनमधून युरोपियन स्त्रीचा शब्दहि ऐकल्याचा मला भास होत होता. नाशिककरांचें भाषण संपतांसंपतां पारशी तऱ्हेचें निळें पातळ नेसलेली एक युरोपियन तरुणी आंत लगबगीनें आली. तिला पहातांच रा. उकिडवे घाबऱ्याघाबऱ्या उठले व तिला चूप रहाण्याची निष्फळ खूण करूं लागले. आम्हांस वाटलें, ही एखाद्या ऑफिसरची बायको सहज उकिडव्यांला भेटावयास आली असेल.

परंतु तिनें जो प्रकार मांडिला त्यावरून आम्ही चकित होऊन गेलों. “ ओ डियर अनंटा,” तिनें एकदम त्यांच्या मानेला विळखा घालून इंग्रजींत म्हटलें, “ मला चुकवायचा यत्न केलास काय ? पण माझें प्रेम बघ कसें दृढ आहे तें ? मी तुझा पत्ता काढीत काढीत इंग्लंडांतून हिंदुस्थानांतल्या या लहानशा बिळापर्यंत आल्यें कीं नाहीं ? ” उकिडव्यांच्या चेहऱ्यावर आपल्या आगमनानें संतोषाचें प्रतिबिंब उठलेलें न दिसतां त्रासाचें चिन्ह दिसून आल्यानें किंचित् थांबून ती रागानें म्हणाली, “ काय ? माझ्या येण्यानें माझ्या प्रिय आनंटाला आनंद होत नाहीं काय ? आनंटा, तुझ्या करतां मीं आपल्या आईबापांना सोडलें, माहेर सोडलें, आणखी जॉनी क्रोकरसारख्या सुहृदांचा धिक्कार केला, आणि तूं असा मला येथें पाहून थंडपणा कां दाखवीत आहेस ?........तूं

माझी थट्टा करीत आहेस, होय ना ?" असें म्हणत तिनें स्वतः-पासून आपल्याला सोडवूं पाहणाऱ्या आनंदाचा बळेंच मुका घेतला. तेव्हां त्यांचें तोंड लाजेनें अगदीं गोरेमोरें झालें.

त्यांनीं तिला दूर ढकललें आणि आम्हांस सांगितलें, " गरीब बिचारी ! हिचं डोकं फिरलं आहे हिचा नवरा मेला आणि मलाच ती नवरा समजत आहे. वॉर्डरची नजर चुकवून ल्युनॅटिक असायलम् मधून आली वाटतं. शिपॉय !-"

त्या बाईला मराठी येत नव्हतें; परंतु वॉर्डर ( रखवालदार ) आणि ल्युनॅटिक असायलम् ( वेड्यांचें इस्पितळ ) हे इंग्रजी शब्द ऐकतांच तिच्या ध्यानांत त्यांच्या बोलण्याचा मतलब आला व ती ओरडली, " काय ? मी वेडी आहें असें तूं आपल्या मित्रांना सांगतोस काय ? अरे विश्वासघातक्या ! हे तुझे सगळे मित्रच आहेत वाटतें ! ऐका तुम्ही तरी ऐका. मी याची विवाहित बायको आहें. गेल्या वर्षीं आम्ही ऑक्सफर्डला असतां आमचें लग्न झालें. हें पहा या बॅगवर माझें मिसेस लीलावती यू. किड्वे नांव आहे."

मिस्टर यू. किड्वे अगदीं खजील झालेले दिसत होते. मिसेस लीलावतीचें बोलणें संपतांच ते पुनः म्हणाले, " अरेरे पिटी पिटी ! मीं हिच्याशीं लग्न लावलं आहे, असा हिला भ्रम झाला आहे. गरीब बिचारी !"

मिसेस लीलावती ही रावसाहेब फडणिसांकडे पाहून म्हणाली, " तुम्ही सन्मान्य म्हातारे गृहस्थ दिसतां. तुम्ही सगळे सारख्या पिसांचे पक्षी नसाल अशी आशा आहे. बोला तुम्ही याचे मित्र आहां काय ?" याचा मित्र असणें हा एक घोर अपराध आहे

असें ती समजत असल्याचें तिच्या चर्येवरून स्पष्ट दिसत होतें. त्यामुळें घाबरून जाऊन रावसाहेबांनीं आपला आशय इंग्रजींत व्यक्त केला, " नाहीं मॅडम्, मी आपली मुलगी यांना लग्नांत देऊं करावयास आलों आहें. मला आपलें अस्तित्व माहीत नव्हतें. "

" अस्सें, " दांतओठ खात ती म्हणाली, " मी जिवंत असतांना हा दुसरी बायको करतो काय ? ( नाशिककरांस ) आणखी तुम्ही हो इथें कशाला आलां आहां ? "

आपणहि आपली मुलगी देऊं करण्यास आलों असल्याचें नाशिककरांनीं सांगितलें. ती एकदम खवळून जाऊन ओरडली; " बरोबर आहे ! तुम्ही हिंदुस्थानचे एतद्देशीय स्वभावतःच बहु-पत्नीक असतां असें मीं याच्याशीं लग्न करण्यापूर्वी आई मला सांगत होती त्याचा प्रत्यय आला. एकूण आनंटा माझ्या घरांत झनाना उघडणार आहे काय ? आणखी तुम्ही त्याचे साथीदार ! दम धरा, मी तुम्हांला झनाना उघडावयास शिकविस्सें ! " असें म्हणून समोरच भिंतीस खुंटीवरून एक पिस्तुल लटकत होतें— सिव्हिलियनच्या घरांत तें तसें असावें यांत नवल नाहीं—तें काढून हातांत धरून तिनें प्रथम मोठ्या मिशांच्या सफेद फेटेवाल्यावर रोखलें व सर्वांस दटाविलें, " माझ्या नवऱ्याला मुली देत आहेत ! लुच्चे; हरामखोर ! चला; व्हा चालते इथून, नाहीं तर एकेकाचें डोकें फोडून मेंदू काढल्यें बाहेर जर असलाच तर ! "

तिचें बोलणें पुरें होण्याच्या आंत सगळ्यांनीं यःपलाय सजी-वतें करण्यास प्रारंभ केला होता. मिस्टर उकिडवे मात्र, " अहो तें पिस्तुल भरलेलें नाहीं, भिऊं नका. ती वेडी आहे, तिच्या बोल-

ण्याकडे लक्ष देऊं नका," अशीं आश्वासनें देत आम्हांला पोहोंच-
वावयास फाटकापर्यंत मागोमाग धावत आले; परंतु आम्ही त्यांच्याच




चला व्हा चालते इथून, नाहींतर एकेकांचें डोकें

बोलण्याकडे लक्ष न देतां मिसेस उकिडव्यांच्या पासून शक्य तितकें
दूर जाण्याचा यत्न करीत होतों. सर्वांच्या पुढें रावसाहेब एका

हातानें उपरणेंपगडी सांवरीत आणि दुसऱ्यानें विजारीचा पट्टा



फोडून मेंदू काढत्यें बाहेर जर असलाच तर !

वर सरकावीत धावत होते. त्यांच्या मागून नाशिककर पगडीच्या झिरमळ्या वायूंत फडकावीत आणि शिल्लक राहिलेला एकच

लाल पुणेरी जोडा संभाळीत फरफटत पळत होते. काठेवाडी गृहस्थ आपल्या देशांतील सुप्रसिद्ध तुरंगमाप्रमाणें उड्या मारीत चालले होते; व आम्हांविषयीं म्हणाल तर अपमान सांगावा मनांत ही म्हण आठवून मी मौन स्वीकारीत आहें. रावसाहेब फाटकाच्या बाहेर पडले तरी जीव घेऊन पळत होते. त्यांनीं येतांना सारवट ( दमणी ) भाड्यानें आणिली होती. सारवटवाल्यास वाटलें हा बामण भाडें चुकवून पळत आहे, म्हणून त्यानें त्यांच्या मागोमाग बैल पिटाळले. काठेवाडी गृहस्थ आम्हांस म्हणाले, " तरी मीं आगबोट सुटण्याच्या अगोदरच तुम्हांला नाहीं सांगितलं कीं, उकिडव्यांचं लग्न झालं आहे म्हणून ? " आम्ही दहा मिनिटांतच सड्यावरून वरल्या आळींत आमच्या बिऱ्हाडीं येऊन धापा टाकीत बसलों. वडिलांच्या मृत्युसमयीं त्यांना मीं वचन दिलें होतें कीं, चिमूताईकरितां जीव देण्याचा प्रसंग आला तरी मी डगमगणार नाहीं, तें अंशतः तरी पूर्ण झालें यांत मला समाधान वाटत होतें.

" नकोरे बाबा, हीं विलायती धेंडें आणखी यांच्या भानगडी. यापेक्षां गरिबाकडे मुलगी दिली तर सुखानें मीठभाकरी खाईल; पण गोऱ्या सवतीच्या गुलामगिरींत खितपणें कपाळीं नको, " गुंड्याभाऊ म्हणाला.

मलाहि त्याचें म्हणणें पटलें.

---

# माझे दत्तक वडील.



सकाळची रम्य वेळ होती. दिवस हिवाळ्याचे होते आणि मी रत्नागिरीच्या बंदरावर फेरफटका करण्यास गेलों होतों. कोंकणांत हिवाळ्याचे दिवस किती आल्हादकारक वाटतात ! फार थंडी नाहीं आणि उष्मा तर मुळींच नाहीं. रत्नागिरीचें बंदर चढण्याउतरण्यास जरी अवघड असलें तरी तेथीऊ देखावा फारच नामी आहे. समुद्राकडे तोंड करून उभें राहून पाहिलेला उजवीकडील तो अजगरासारखा पसरलेला किल्लयाचा डोंगर, समोर क्षितिजापर्यंत पाणीच पाणी आणि त्यावर अंतरा अंतरावर तरंगणाऱ्या गलबतांचीं परीटघडीचीं शिडें, मागील बाजूस माडांची घनदाट राई आणि डाव्या बाजूस विशेष सांगण्यासारखें कांहीं नाहीं, असा तो सुंदर देखावा जन्मांत मी विसरणार नाहीं. रात्रभर निशापाणी करून लालभडक झालेल्या भगवान् सूर्यनारायणानें आपली पत्नी सृष्टिदेवी हिचीं दोन्हीं थोबाडें रंगविलेलीं होती. समुद्रकांठीं वाळूंत एका बिळांतून दुसऱ्या बिळांत सुर्कन् पळणारे कर्ले आपल्याला पकडावयास येणाऱ्या कावळ्यांशीं किंवा कुत्र्यांशीं पकडापकडीचा खेळ खेळत होते. झालें इतकें वर्णन पुरें झालें; नाहींतर लघुकथेचें तंत्र बिघडावयाचें, म्हणून मुद्याच्या गोष्टीकडे वळतों.

जरी मला पुण्यास नोकरी होती, तरी मी दरसाल या महिन्यांत रत्नागिरीस येत असें, व माझ्या वडिलोपार्जित इस्टेटीपैकीं माझ्या वांट्याला जें नारळाचें झाड व फणसाच्या झाडाची जी

खांदी आली होती त्यांचें वार्षिक उत्पन्न एक रुपया पांच आणे पांच पै घेऊन जात असें. हें उत्पन्न मिळविण्यास माझ्या वडिलांस आठ वर्षें कोर्टांत झगडून नऊशें रुपये खर्चावे लागले. मग मी सालिना पंधरावीस रुपये खर्चून रत्नागिरीस येऊन भावाबंदांशीं तंडून हे हक्काचे, हट्टाचे व मानाचे पैसे घेऊन जात होतों यांत वावगें काय झालें ? तसें न करीन तर वडिलांच्या नांवास बट्टा लागणार नाहीं काय ? मीं हे यंदाच्या वांटणीचे पैसे कालच वसूल केले होते व आज संध्याकाळच्या बोटीनें निघून परत पुण्यास जाणार होतों. बंदरावरची गंमत घटकाभर पाहून परत फिरलों व वरल्या आळींत पोचलों, तोंच एक पन्नाशीच्या सुमाराचा वृद्ध गृहस्थ घाईघाईनें मजकडे येत आहे असें पाहून थबकलों. तो गृहस्थ धांवतच जवळ आला व त्यानें माझ्या अंगाभोंवतीं दोन्ही हात टाकून मला कवटाळलें.

" अहो हें काय आजोबा ? मला कोण म्हणून समजतां ? मी कांहीं तुमचा नातूपणतू नाहीं बरं. सोडा मला, नाहीं तर आतां भोंवतालीं घोळका जमा होईल तमासगिरांचा."

" बाळ नको रे असा म्हाताऱ्याला झिडकारूं. तोच तूं—अगदीं हुबेहुब. काडीइतका फरक नाहीं."

" अहो भटजीबुवा, कबूल आहे सगळं. तोच मी आहें, हुबेहुब काल दिसत होतों तसाच आजहि दिसतों आहें, कालचा हा चिमणाजी विठ्ठल—"

" काय चिमण तुझें नांव ? मग तर ठेपी जमलेंच. मलासुद्धां दृष्टान्तांत गुरुराजांनीं हेंच नांव सांगितलें होतें. चिमण चिमण !




त्यानें माझ्या भोंवतीं दोन्ही हात टाकून मला कवटाळलें.

ये रे माझ्या चिमण्या बाळा ! ” असे उद्गार काढीत म्हातारबुवांनीं मला अधिकच आंवळलें.

“ अहो शास्त्रीबुवा, तुम्ही सड्यावरच्या वेड्याच्या इस्पितळां-तून रखवालदारांच्या हातावर तुरी देऊन तर नाहींना आलां? चला तिकडेच तुमची परत रवानगी करतों.”

“ अरे बाळा, मी कोणाच्या हातावर तुरी देऊन आलों नाहीं पण तूं मात्र माझ्या हातावर तुरी देऊन वीस वर्षें पळाला होतास. पण सुदैव माझें, काल रात्रीं गुरुराजांनीं दृष्टान्त देऊन सांगितलें कीं, ‘ तुझा बाळ उद्यां सकाळीं तुला भेटलाच पाहिजे.’ मीं म्हटलें ‘ पण त्याला ओळखणार कसा ? ’ तेव्हां गुरुराजांनीं स्वप्नांत तुझें दर्शन घडविलें आणखी ते अदृश्य झाले. स्वप्नांत पाहिलेली मनोहर मूर्ति पण चल माझ्या घरीं. इथें रस्त्यांत आतां हे तमासगीर जमा होतील. हें कोंकण आहे बाबा, इथले लोक आहेत कुचाळ ! चिटोळ्यांचा मुलूख आहे हा.”

या वेड्याच्या डोक्यांत आहे तरी काय हें पहावयाच्या उद्दे-शानें मी त्याच्याबरोबर त्याच्या घराकडे जाण्यास निघालों. दहापांच घरें गेल्यावर त्याच्या घराच्या गडग्यांत शिरलों. आंत गेल्याबरोबर तेथील थाट पाहून मी थक्क झालों. दोन तुडुंब भरलेल्या विहिरींस माळांचे रहाट लावले होते, आणि एकास बैल व दुसऱ्यास रेडा जुंपला होता. विहिरींच्या पाटाच्या पाण्यावर माड, सुपारी, कलमी आंबे, फणस, काजू असे वृक्ष; चिकू, कॉफी, केळीं, कागदीं लिंबें अशीं झाडें; फुलझाडें, वेली, भाज्या यांची जोपासना होत होती. घरापुढील मांडवावर वाळवणें घालण्याचे कामीं दोन मोलकरणी

राबत होत्या. दळणकांडणाचें काम दुसऱ्या दोघी मोलकरणी करीत होत्या आणि एका गोठ्यांत पांचसहा गुरें बांधलेलीं होतीं. बागेच्या मध्यभागीं मुंबई पद्धतीचा दुमजली सुरेख कौलारू बंगला होता.

"ही पहा माझी बाग नि समोरचें माझें गरिबाचें खोपटें," म्हातारबुवांनीं सांगितलें. कोंकणच्या श्रीमंत लोकांचा पोषाक व अठराविश्वे दरिद्र्यांचा पोषाक सारखेच असतात म्हणून मला त्यांच्या बोलण्याचें मुळींच आश्चर्य वाटलें नाहीं. त्यांनीं मला बंगल्यांत नेलें. बंगल्याच्या ओसरीवरच आम्ही झोंपाळ्यावर बसलों. ओसरीवरून माडीवर जाण्याचा जिना होता त्याला कुलूप लावलेलें होतें, त्यामुळें दिवाणखान्याचा थाट मला पहावयास मिळाला नाहीं, तरी ओसरीवरील गाद्या, लोड, तक्ये, देवादिकांच्या तसबिरी व इतर फोटो, पोतींचीं तबकें, चित्रें ठेविलेलें काचेचें कपाट वगैरे थाटावरून या म्हाताऱ्याच्या श्रीमंतीची बरीच कल्पना आली.

म्हाताऱ्यानें रामा गड्यास हाक मारून बोलाविलें आणि माजघरांत टांगलेल्या केळवंडींतील थोडीं केळीं आणि एक पपनस घेऊन येण्यास सांगितलें.

रामाः–" पन आन्ना–"

रामास पुरतें न बोलूं देतां म्हातारा त्यास गप्प करून म्हणाला, " होय, मालकांचेच पाहुणे आहेत हे, जा. जास्त बोलूं नको. " रामा कांहीं तरी पुटपुटत गेला, तेव्हां म्हातारा मला म्हणाला, " पाहिलेत हे कोंकणचे गडी कसे उद्धट असतात ? यांना अहो जाहो कसें तें ठाऊकच नाहीं. बाकी मलाहि हा साधेपणा आवडतो. मला आण्णासाहेब म्हणूं नका,

नुसतें ' आण्णा ' म्हणा अशी मीं त्यांना ताकीद देऊन ठेविली आहे. नाहीं तर तुमच्या देशावर ! जो उठला तो ' साहेब ! ' तात्यासाहेब, बापूसाहेब, भाऊसाहेब--मग हातांत उलटी अंबारी का असेना ? ( ओरडून ) अहो बाईसाहेब, जरा बाहेर या."

वेणी घातलेली, मोठें कुंकू, नाकांत सोन्याचे मणी गुंफलेली नथ, गुडघे झाकतील इतकेंच रुंद लुगडें अशी बाई माजघरांतून दारांत येऊन उभी राहिली. तिला उद्देशून म्हातारा म्हणाला, " हे पाहिलेत का हो आपले चिरंजीव ? झालें कीं नाहीं माझें स्वप्न खरें ? तूं मला खुळा समजलीस, स्वप्न लटकें म्हणालीस, पण स्वप्नांत पाहिलेलीच मूर्ति ! नांव सुद्धां गुरुराजांनींच सांगितलेलें ' चिमणाजी ' ! बाळ चिमण ! आपल्या आयशीच्या पायां पड. "

या वेडपट थेरड्याच्या कलानेंच जरा घेऊं या असा विचार करून मी त्या बाईच्या पायां पडलों. " बरें आहे, मी थोडा चहा ठेवतों, " असें म्हणून ती आंत निघून गेल्यावर म्हातारा झोंपाळ्यावरून उठला व भिंतीवरचा एक फोटो काढून मला दाखवीत म्हणाला, " चिमणराया, पहा पहा हीं गोजिरवाणीं बाळें ! एकाहून एक सरस रत्नेंच होतीं, पण काळाला नाहीं तीं पाहवलीं ! इन्फ्लुएंझाच्या साथींत आठ दिवसांत एकामागून एक गेलीं; आणखी आम्हांला म्हाताऱ्यांना निसंतान करून सोडिलें ! ( स्फुंदत ) पण जाऊं द्या तें. आम्हीं मुलांकरितां शोक करीत एक वर्ष काढलें तेव्हां कालच आमचे गुरुराज--"

" म्हणजे कोण बुवा ? " मीं चौकसलें.

" माझे गुरु म्हणजे राजापूरचे पासोडेमहाराज. सत्पुरुष

आहेत, तेच माझी करुणा ऐकून द्रवले. त्यांनीं मला पहांटे दृष्टान्त दिला. त्यांची ती सहा महिन्यांत अंघोळ न केलेली, तोंडांत गांजाची चिलीम धारण केलेली, आंगावर मळक्या पासोडीशिवाय चिंधूकहि नसलेली, बाह्यात्कारीं भ्रमिष्ट दिसणारी मूर्ति माझ्यापुढें प्रकट झाली आणि त्यांनीं सांगितलें, बेटा आण्णा ! कल फजर ऊठके गाड्याको हात लगावो और रस्तेमें जाव, तुमारे नजरको जो आदमी पहेला आवेगा वोही तुम आपना लडका समझो. आगले जनममें वो तेरा लडका था. ' मीं म्हटलें, ' गुरुवर्य, पण रस्त्यांत दहाजण भेटतील. कोणता मी आपला मुलगा समजूं ? ' तेव्हां त्यांनीं माझ्यासमोर तुझी मूर्ति प्रगट केली. मी पुढें बोलणार तो जागा झालों. "

इतक्यांत आण्णांच्या कुटुंबानें चहा, केळीं, पपनसाच्या फोडी वगैरे उपाहार आणि मुखशुद्धीकरितां ओली सुपारी आणिली. त्यांचा समाचार घेत असतां आण्णांनीं आपल्या जमीनजुमल्याची कल्पना मला करून दिली. आण्णांच्या जवळ बरीच माया होती. तो बंगला, ती बाग, रत्नागिरी व संगमेश्वर तालुक्यांतील भातशेतें, दरमहा तीनशें रुपये भाडें आणणारें मुंबईचें लहानसें घर, शिवाय वीस हजारांच्या ' परमेश्वरी ' नोटा—आणखी पांच हजारांचें युद्धकर्ज. असलें घबाड आयतेंच पदरांत पडत असल्यावर कोणता शहाणा माणूस आण्णांच्या दृष्टान्तावर अविश्वास ठेवील ? पासोडेमहाराजांचे उपकार आण्णांच्या ऐवजीं माझ्यावर मात्र पुष्कळ झाले यांत संदेह नाहीं.

" पण आण्णा, माझे वडील हयात नाहींत, मला दुसरा भाऊहि नाहीं, तेव्हां मला तुमचा दत्तक होतां येणार नाहीं बरें

का ! " मीं म्हटलें.

" अरे, दत्तक नको न् फित्तक नको. तीं सगळीं थोतांडें आहेत. दत्तकाचें कलम केल्यानें का खरें प्रेम होत असतें ? फक्त तूं आमच्यावर आईबापांप्रमाणें माया कर म्हणजे माझी सगळी माया तुलाच मिळेल, बरें, आतां तूं उतरला आहेस कोठें ? ( ऐकून ) वरच्या आळींतले जोग ते तुझे कोण लागतात ? "

मीं आण्णांना माझी सगळी हकीकत सांगितली. मी पुण्यास नोकरींत असतों असें ऐकल्यावर ते म्हणाले, " अरे चिमणा ! साठ टिकल्यांकरितां खर्डेघाशी करण्याचें आतां तुला कारण नाहीं, परंतु मला जरा दम्याची व्यथा असल्यानें एवढा पावसाळा आम्ही दोघें पुण्यास काढूं, स्वतंत्र बिऱ्हाडच करणार होतों पण आतां तूं आहेसच. घरीं तुझी आयशी आहे ना ? तुला उद्यां सोमवारीं कामावर रुजू व्हायचें असेल तर तूं आज रात्रीच्या बोटीनें जा. मी इथल्या कामाची व्यवस्था लावून बुधवारीं निघून येतों. "

यानंतर कांहीं किरकोळ बोलणें होऊन मी निघालों. रविवारीं संध्याकाळीं रत्नागिरीहून निघून सोमवारीं दुपारीं पाऊण वाजतां पुण्यास पोचलों. वाटेनें बोटींत व आगगाडींत माझा सर्व वेळ त्या भोळ्या आण्णाच्या अवाढव्य इष्टेटीची तजवीज करण्यांत गेला. ऑफिसांत जाण्यास उशीर झाल्यानें एका टॉमीचीं दुरुत्तरें सहन करावीं लागलीं. " हरकत नाहीं लालतोंड्या, " मी ( मनांत ) म्हणालों, " तो थेरडा कोंकण्या मला आपली इस्टेट

देणारच आहे मग कोण येतो तुझ्यासारख्या माकडांची चाकरी करायला ? ”

संध्याकाळीं घरीं गेल्यावर आईला सगळी हकीकत सांगितली तेव्हां ती म्हणाली, “ संभाळ हो बाबा ! नाहींतर तो कोणी लफंगाबिफंगा असायचा—असल्या मसलतींत आपल्यासारख्या साध्या माणसांनीं पडूं नये.”

“ अग पण आई, मी का या मसलतींत पडलों आहें ? त्या आण्णाच्या गुरुरायांनींच मला हिच्यांत पाडलं आहे. ठीक आहे. या महागाईच्या दिवसांत हातभार लावला संसाराला आपल्या दैवानं ! ”

गुरुवारीं सकाळीं आण्णा व त्यांच्या पत्नी ( त्यांना माई म्हणावयाचें ) यांस स्टेशनवरून आणिलें. आण्णांनीं आमच्या आई-साहेबांस आडव्यातिडव्या गप्पा मारून खूप खूश केलें; माईनीं आईला आपली बहीण मानिलें, व आण्णा हे माझे चुलते आहेत असें सर्वांना मीं सांगावें म्हणजे लोकांना दृष्टान्ताची कर्मकथा सांगावयास नको असें ठरलें. आण्णांच्या बरोबर त्यांच्या कपड्यांच्या व दागदागिन्यांच्या ट्रंका होत्या, पण त्यांच्या किल्ल्या कोठेंतरी हरवल्या त्यामुळें त्यांना अंघोळीनंतर बदलावयाला चिरगुटेंहि नव्हतीं. म्हणून मी लगेच बुधवारांत जाऊन एक धोतरजोडी व इरकली लुगडें घेऊन आलों.

पहिल्या दिवशीं आण्णा व माई नवीन असल्यामुळें त्यांची बरदास्त उत्तमच ठेवण्यांत आली होती. दुसऱ्या दिवशीं सकाळीं आमचा गवळी आला, तेव्हां आम्ही दूध किती घेतों तें आण्णांनीं

विचारिलें. सौ.(माझें नुकतेंच लग्न झालें होतें) म्हणाली 'एक शेर'. आण्णा उद्गारले, "बस् एकच शेर ! अरे तें कांहीं नको आतां. तुम्ही अडीच शेर दूध सुरू करा. मलाच तर शेरभर दूध पोळी-बरोबर खावयास लागतें. रे गवळी, सकाळीं अडीच नि रात्रीं दोन शेर आणीत जा हो. ( मला इंग्रजींत ) पैशाची काळजी नको."

मी—"छे, छे, आण्णा असें कसें होईल ! पैशाचं काय मोठंसं ! लागेल तितकं दूध घेऊं ( मनांत ) खा थेरड्या, माझ्या बापाचं काय जातं नुस्तं दूध पिऊन पोट फुगून मेलास तरी !"

आण्णा आल्यापासून आमच्या रहाणींत पुष्कळ सुधारणा झाली. जेवतांना दोन कोशिंबिरी, एक फळभाजी, एक पालेभाजी, भाकरीऐवजीं पोळी, पोळीला तूपसाखर, सकाळ–दुपार लिप्टनच्या पिवळ्या डब्यांतील चहा व बरोबर बिस्किटें अगर शिरा असा थाट सुरू झाला. आण्णांच्या डोकीवरचा पांढरा मास्तरशाही रुमाल जाऊन पुणेरी झिरमिळ्यांची पगडी, आंगांतील बंडी व चेकचा कोट जाऊन शर्ट व सर्जचा कोट, पंचा जाऊन लांबरुंद धोतर व वहाणांऐवजीं लाल पुणेरी जोडा असा पेहराव आला. माईंचें सुती लुगडें जाऊन इरकली लुगडें व त्यांच्या पूर्वींच्या अनवाणी पायांत गादीचे जोडे आले हा सगळ्या वेषांतराचा खर्च तूर्त मला सोसावा लागला पण याचा दसपट वचपा काढल्याशिवाय मी रहाणार होतों थोडाच !

आण्णा व माई हीं दररोज संध्याकाळीं तांगा करून फिरावयास जात; सिनेमाचा प्रत्येक नवीन कार्यक्रम, प्रत्येक मंडळीचें

नवीन नाटक, प्रत्येकास रोजचें डॉक्टरचें औषध व पथ्याकरितां फळें किंवा डब्यांतील विलायती खाद्यें यांचा सपाटा सुरू झाला. आण्णांनीं आपल्या ट्रंकेच्या कुलुपाच्या किल्लया पाठवून देण्याबद्दल रत्नागिरीच्या कारकुनास दहा पत्रें लिहिलीं पण त्यानें दाद दिली नाहीं, त्यामुळें खर्चासाठीं मला सेविंग्ज् बँकेंतले माझे १२० रुपये काढून आणावे लागले.

आण्णांच्या प्रकृतीला पुण्याची हवा चांगली मानवली. पहिल्यानें दोन पोळ्याहि जात नसत, त्या आतां पांचसहा पोळ्या पचून पुन्हा फिरावयास जाण्याच्या आधीं उपहार लागूं लागला. माईहि नवऱ्याशीं पोळ्या अधिक खाण्याच्या बाबतींत पैज लावून जेवीत असत.

या जोडप्याचा बकासुरी आहार पाहून गुंड्याभाऊस देखील आपली प्रकृति क्षीण होत चालली आहे असें वाटूं लागलें. तेव्हां त्यानें मला सुचविलें कीं, मीं आण्णांस लंघनमीमांसेचें पुस्तक वाचावयास द्यावें. ज्यांच्या घरीं पाहुण्यांचा सुळसुळाट असतो अशा घरवाल्यांनीं या पुस्तकाची प्रत अवश्य संग्रहीं ठेवावी. मात्र आण्णासारखे खमंग पाहुणे त्यास बिलकूल दाद देणार नाहींत. तें पुस्तक वाचून आण्णा म्हणाले, ' अरे चिमण, अगदींच टाकाऊ पुस्तक आहे हें ! लंघनाची चिकित्सा जर त्यांत वर्णन केली आहे इतकी बिनचूक असती तर हिंदुस्थानांत इतकी रोगराई वाढली नसती. कारण या देशांतले शेंकडा ऐंशीं लोक दररोजच लंघन करीत असतात ! ''

“आण्णा, हे लोक नुसते उपाशी राहतात. पुस्तकांतल्या नियमांप्रमाणें लंघन करीत नाहींत.''



त्या जोडप्याचा बकासुरी आहार.

"अरे मरो रे तुझें लंघन! आम्हांला 'उल्लंघनमीमांसा' असली तर देस एखादी! म्हणे पोट दुखलं तर उपास करावा नि बस्ती घ्यावा! तें कांहीं नाहीं. पोट दुखलें तर बचक बचक सुंठसाखर नि तूप घ्यावीं नि बेष लाडू करून खावे. मधुमेह झाला तर रोज गुळाच्या आठ पोळ्या अच्छेर तुपाशीं खाव्या नि शंभर नमस्कार घालून पचवाव्या. डोकें दुखत असलें तर चांगला अच्छेर मावा साखरेंत परतून खावा कीं साफ! बद्धकोष्ठ झालें तर चारपांच बेसनाचे लाडू खावे नि वर एक गल्लास कोल्डड्रिंक प्यावें. कालच त्या कॅंपांतल्या ट्रेचर कंपनींत कोल्डड्रिंक घेऊन आलों. वा:! काय त्याची खुमारी सांगूं तुला?"

हळूहळूं दोन महिने संपले. माझें सेव्हिंग्ज् बॅंकखातें खलास झालें. पगारहि दोनदांचा संपलाच होता, पण अद्याप आण्णांच्या किल्ल्या येईनात; तेव्हां त्यांनीं पांचशें रुपये रजिस्टरनें तावडतोब पाठवून देण्याविषयीं रत्नागिरीच्या आपल्या कारकुनास लिहिलें व ते येईपर्यंत खर्चास मीं सासऱ्याकडून दोनशें रुपये उसने आणिले. आण्णांचे पांचशें रुपये येतांच सौ. ला सुरेख लुगडें मिळणार होतें. बिचारीला लढाईच्या महागाईनें चिटांवरच समाधान मानून घ्यावें लागत होतें.

पंधरा दिवस होऊन गेले तरी रजिस्टर येईना. पोस्टांत चौकशी केली पण व्यर्थ. तेव्हां मीं आण्णांस सुचविलें कीं, तुम्ही आतां ट्रंकांस दुसऱ्या चाव्या लावून पहा; मी चावीवाल्याला बोलावतों. पण व्यर्थ. चिक्कू म्हातारा पत्रें व तारांत पैसे घालवीत होता पण तेथच्या तेथें दुसऱ्या चाव्या विकत घ्यावयाला त्याचा धीर होईना.

पावसाळा संपला, आगबोटी चालू झाल्या तेव्हां माझ्या श्वशु-रांनीं मला सल्ला दिला कीं, मीं प्रत्यक्ष रत्नागिरीस जाऊन त्या म्हाताऱ्याच्या कारकुनास भेटावें व त्याच्याकडून पैसे आणावे. ही हकीकत मीं आण्णांना सांगितली तेव्हां ते बरेच आढेवेढे घेऊं लागले. " तुला रजा मिळणार नाहीं, पधरा दिवसांनीं मीच जाईन, तुला कारकुंडा दादच देणार नाहीं " इत्यादि. तेव्हां आईनेंहि मला बाजूस नेऊन म्हाताऱ्याला न कळवितां रत्नागिरीस जाण्यास सांगितलें व त्याप्रमाणें खोटी आजारचिठ्ठी ऑफिसांत पाठवून रत्नागिरीस गेलों. संध्याकाळीं तेथें भावाबंदांकडे उतरलों व त्यांस आण्णांचा वृत्तांत सांगितला. आण्णा फाटक नांवाचा श्रीमंत गृहस्थ रत्नागिरींत असून आपल्याला त्याची कांहीं माहिती नस-ल्याबद्दल त्यांनीं आश्चर्य प्रगट केलें.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं मी आण्णांच्या बागेंतील बंगल्यांत गेलों. पूर्वीं मी येथें आलों होतों तेव्हां बंगल्याच्या माडीस कुलूप होतें, परंतु या वेळीं आण्णा पुण्यास असून ती उघडी असल्यानें मला नवल वाटलें. चिक्कू मालकाची संपात्ति इतरांच्या चैनीसाठींच असते. मी ओसरीवर गेलों व पहातों तों झोंपाळ्यावर तीन सुरेख मुलें बसलेलीं. ही भुताटकी तर नाहीं ना असें मला वाटलें, कारण ज्या मुलांचा फोटो दाखवून " हीं माझीं गोजिरवाणीं बाळें इन्फ्लु-एंझाच्या साथींत गेलीं, " असें आण्णा म्हणाले होते तींच हीं मुलें. पोषाखहि तेच होते. सगळ्यांत मोठ्या मुलानें झोंका थांबवून मला कोण पाहिजे असें विचारिलें; मीं भीतभीत उलट मुलासच त्याचें नांव विचारिलें.

" माझं नांव प्रभाकल बालक्रिष्न नाडकलनी. "

मी घर चुकलों कीं काय असें वाटून इकडे तिकडे बघूं लागलों तों एक तरुण बाई तेथें घरांतून आली व काय, कोणाकडे आलां आहां, असें मला विचारूं लागली.

" फाटकांचं ना हें घर ? "

" नाहीं बाई. हें आमचं—नाडकर्ण्यांचं घर आहे. फाटक तर इथं नाहींत जवळपास कोणी. "

मजकरितां केळीं व पपनस आणण्यासाठीं आण्णांनीं ज्याला पाठविलें होतें तो रामा गडी तेथें कांहीं कामांकरितां आला व माझेकडे पहातांच " काय पाव्हणे कसा काय ? " असें त्यानें विचारिलें.

" ठीक आहे. पण ते आण्णा कुठें आहेत रे ? "

" तो आण्णा बामण ? कुठें पळाला त्याचा कांहींच पत्ता नाय्. "

" म्हणजे ते आण्णा या बंगल्याचे मालक नव्हते ? "

" अवं कसले मालक ? वैनीबाईस्नी पुसा म्हणजे त्या सांगतील सगला." रामाच्या उपदेशाप्रमाणें नाडकर्णीण वहिनींना मीं आण्णांबद्दल माहिती विचारिली.

" तो आण्णा शिफारस घेऊन इकडे नोकरी मागायला आला त्याला आम्हीं कारकून म्हणून ठेवलें. मध्यें आम्ही लग्नाकार्याकरितां मालवणास गेलों ते त्याच्या आंगावर घर टाकून गेलों. कोणाला तरी माहीत हा थेरडा असा लबाड असेल म्हणून ! मेला आम्ही परत यायच्या आंत इथून पसार झाला न् बरोबर

घरांतली दहावीस चांदीचीं भांडीं न् कपडेय् पळवलीन्--तुम्हांला काय त्यांनीं आपणच घराचे मालक आहों, म्हणून सांगितलीन् ? काय बाई तरी धारिष्ट्य ! ”

“ आई, आणखी माझा गडवा पण पलवला ग त्यांनीं, ” तो मोठा मुलगा म्हणाला.

आतां स्वतःची फजिती त्या बाईपुढें काय सांगावयाची ? त्या म्हाताऱ्याची झडती घेऊन तुमचीं भांडीं परत करतों असें सांगून मी निघालों. संध्याकाळच्या बोटीनें रत्नागिरी बंदर सोडलें. काय पाजी माणसानें मला बनविलें ! आतां कसली इस्टेट-- पण चारपांचशें रुपयांच्या उधाऱ्या मात्र करून बसलों ! मी माझ्या मित्रांत उपहासविषय होणार ! पुण्यास घरांत पाऊल टाक-तांच त्या थेरड्याच्या बत्तिशीपैकीं शिल्लक राहिलेले दांत न पाडीन तर नांवाचा चिमणराव विठ्ठलच नाहीं. असे सुडाचे विचार घोळवीत रात्र व सकाळ घालवून दुसऱ्या दिवशीं दुपारीं पुण्यास पोंचलों.

तांग्यांतून उतरतांच, ‘कुठें आहेत ते आण्णा ?’ असें म्हणत मी घरांत शिरलों.

“ अरे असं झालं तरी काय रागावयाला ? ” असें आईनें विचारलें.

“ पण आधीं तीं थेरडा--थेरडी--”

“ अरे तीं गेलीं रत्नागिरीला. तूंच तिथून त्यांना तार केली होतीस ना झटपट निघून या म्हणून ? ”

“ मीं--मीं तार केली ? अगदीं पक्का लफंगा दिसतो आहे, पण मीं रत्नागिरीला गेल्याचं त्यांना सांगितलं कुणीं ? ”

" अरे तुझ्या बायकोनं; भोळी बिचारी ! आपला बेत तिला माहीत नव्हता. तिनं त्या म्हातारीजवळ सहज सांगितलं. मग चार तासांनीं, तुझी तार आली आहे, आपण रत्नागिरीस जातों, असं सांगून तीं दोघं तिनाच्या गाडीनं गेलीं. दोन ट्रंका बरोबर नेल्या आणखी दोन वर आहेत. "

" पाहूं बरं त्यांत काय आहे–चोराच्या हातची लंगोटी. " असें म्हणून मी वर गेलों व हत्यारांनीं कुलपें फोडीत फोडीत आईस सर्व हकीकत सांगितली. कुलुपें फोडून ट्रंका उघडून पहातों तों आंत दगड व विटकरींशिवाय कांहीं नव्हतें !

दुसऱ्या दिवशीं टपालानें पत्र आलें. त्यांत पुढील मजकूर होताः—

" चि० चिमणराव यांस आण्णा फाटक याचे प्रेमपूर्वक आशीर्वाद. आपण आमचा चार महिने उत्कृष्ट पाहुणचार केलात याबद्दल आम्ही आपल्याला दुवा देतों. राहिलेल्या आयुष्यांत आपली आठवण व्हावी म्हणून आपल्या कुटुंबाच्या पाटल्या बरोबर आणिल्या आहेत. तसेंच आपल्या कापडवाल्याकडून ६० रुपयांचें कापड आणलें आहे, त्याचे पैसे फेडणें आपल्यावरच आहे. आमच्या अफाट इस्टेटीपैकीं दगडाविटांनीं भरलेल्या दोन ट्रंका आपल्याला वारसा म्हणून ठेविल्या आहेत त्यांचा स्वीकार करावा. आपण स्वतःचें घर बांधाल तेव्हां त्यांचा अवश्य उपयोग करावा. आपल्या मातुश्रींस नमस्कार व चि० सौ० सूनबाईस आशीर्वाद. तुमच्यासारखें दुसरे भोळें सावज मिळेपर्यंतची तरतूद तूर्त झाली आहे,

तरी आमच्या योगक्षेमाची काळजी करूं नये. कळावें, हे आशीर्वाद

आपला

**आण्णा फाटक"**

* × * × *

गेल्या चार महिन्यांतील देणीं फेडण्यासाठीं वाचकांनीं मला पर्स अर्पण करावी अशी विनंति आहे. नाहीं तर तरुणांचे मूर्ख-पणाचे प्रकार निस्तरणारा परमेश्वर जो सासरा तो माझा पाठीराखा आहेच.



# वरसंशोधन.



उकिडव्यांच्या स्थळाची वासलात लागली, तेव्हां अनायासें रत्नागिरीला आलोंच होतों, तेव्हां म्हटलें, आमच्या यादींतील चवथें स्थळ रामचंद्र सदाशिव भट एम्. ए ( पहिला वर्ग ), शिक्षक रायपूर हायस्कूल, पगार रुपये पन्नास, याचा तपास जवळच कुर्ध्यास करून टाकूं. तीन नंबरचें स्थळ रटाटे. त्याला ६० रुपये पगार मिळत होता; परंतु तो होता मोटार ड्रायव्हर. आम्हां पांढरपेशांत अशी प्रवृत्ति आहे कीं, अधिक पगारवाल्या अंगमेहनतीच्या धंदेवाल्यास मुलगी देण्यापेक्षां कारकून—मास्तरादि लिबरल ( हतबल ) शिक्षण घेतलेला जरी कमी पैसेवाला असला तरी त्यास अधिक पसंत करावयाचें. ५०० रुपये पगारवाला वीव्हिंग मास्तर आणि ५० रुपयेवाला स्कूलमास्तर यांत आम्ही दुसऱ्यास अधिक पसंत करितों.

मीहि तीस अपवाद नव्हतों. मोटार ड्रायव्हरास मी बहीण द्यावयास कधींच कबूल झालों नसतों. रत्नागिरीस असतांना कुळंबी लोकांचें याच अर्थाचें एक गाणेंहि ऐकिलें:—

नवरा केला मोटारवाला ।
दिडकी नाहीं खायाला ॥

भटांचें स्थळ पहाण्यासाठीं गुंड्याभाऊ आणि मी दुसऱ्या दिवशीं पायीं पायीं कुर्ध्यास गेलों. जातांना आम्हांस परत येणारी पुष्कळ मंडळी भेटली. त्यांत कित्येक जणांच्या पोषाकांवरून ते लोक कोंकणचे

रहिवासी नसावे असें वाटत होतें. सर्व लोक कुध्र्याच्या भटांचें स्थळ पाहून परत येत होते असें त्यांच्या तोंडच्या, 'मुलगा बरा आहे हो, पण सासू फार जहांबाज दिसते,' 'हुंड्याची उडी फार मोठी दिसते,' 'एकनाड येते, काय करावें ? आधीं कळतें तर तशी व्यवस्था करून आलों असतों,' इत्यादि उद्गारांवरून आणि त्यांच्या त्या आमच्याकडे फेंकलेल्या संशयपिशाचानें पछाडलेल्या दृष्टिक्षेपांवरून उघड दिसत होतें. गांवांत शिरतांच कित्येक टवाळांनीं, 'ही आली कुध्र्यावर महंमद गझनीची एकशें सहासष्टावी स्वारी !' असें आमचें स्वागत केलें. आम्हीं भटांच्या वाड्याची चौकशी केली.

"भटांचा 'वाडा' हो कशास हवा तुम्हांला"? एका तरुणानें विचारलें.

"आम्हांला त्यांना भेटावयाचें आहे," मीं म्हटलें.

"पण त्यांच्या वाड्यांत तर आतां कोणी नाहीं." तो म्हणाला.

"म्हणजे ? कुठें गेली त्यांच्या वाड्यांतली मंडळी"?

"चरायला," तो शांतपणें म्हणाला. "हें कांहीं तुमचं पुणं नाहीं वाड्यांत माणसं रहायला ! इथें गुरं बांधण्याच्या जागेला 'वाडा' म्हणतात. काय समजलेत ? भट त्या घरांत राहतात, मांडवाच्या एका अंगाला आंब आहे तिथें, काय समजलेत ?"

"समजलों काय सांगितलंत तें," असें गुंड्याभाऊ उत्तरला. मग आम्ही दोघे भटांच्या घरीं जाऊन पडवीच्या बाहेर मांडवाखालीं उभे राहिलों तोंच, "कोण आहे तं बाहेर ?" असा खेंक-

सण्याचा आवाज आंतून आला.

" आम्ही आहों गरीब पांथस्थ," गुंडयाभाऊ हात जोडून लीनतेनें म्हणाला.

" चला, व्हा चालते. भिक्षाबिक्षा कांहीं मिळायची नाहीं, " हे शब्द आंतून खेकसले गेले.

" आम्ही भिक्षेला आलों नाहीं महाराज ! आम्ही मुलगी सांगायला आलों आहों, मी मुलीचा भाऊ आहें. " मीं दीनवाणीनें याचिलें.

" तर मग असे पडवीच्या दोन पायऱ्या चढा, भिक्षेकऱ्यांनीं मांडवाच्या अलीकडे यायचें नाहीं आणि मुलीच्या बापांभावांनीं पहिल्यानें पडवीच्या दोन पायऱ्यांवर उभें रहायचें–" अशी आज्ञा आंतून आली.

आम्ही पडवीच्या दोन पायऱ्या चढलों. पडवींतील दृश्य नजरेस पडून आमचा थरकांप झाला ! बाळकरामानें वर्णन केलेल्या फाटकी सत्रंजी आणि तुटकी खुर्चीवाल्या वरबापाची आठवण झाली. रा. सदूभाऊ भट--कोंकणांतील पद्धतीप्रमाणें गांवांत त्यास ' सदू भट ' ह्मणत, परंतु आतां ते सदूभाऊ उर्फ भाऊसाहेब झाले होते--एका छोट्या गादीवर तक्क्यास टेंकून विडी फुंकीत बसले होते. जवळच भिंतीस चिरंजीवांचा फोटो टांगला होता. तिघे वधूपिते अगर त्यांचे प्रतिनिधी त्यांच्यापुढें उभे राहून आपापल्या परीनें कांहींतरी बोलणें करीत होते. आमचे पांढरे फेटावाले काठेवाडी मित्र एक भली लांबलचक पत्रिका उघडून उभे होतेच. आम्ही दुसऱ्या पायरीवर उभे राहिलेलों पाहून भाऊ-



वरपिता आणि लाचार वरसंशोधक.

साहेब पुन्हा गरजले, " हें पहा रावसाहेब, तीन हजार रुपये खर्चायची तयारी असली तर तिसरी पायरी चढा. नाहीं तर दुसरें स्थळ पहाण्यास जा. उगाच आपला वेळ फुकट दवडूं नको. "

पडवीची प्रत्येक पायरी एकेक हजाराची असावी असें मला वाटलें. तीन हजार रुपये जरी आमच्या खिशांत नव्हते तरी आम्ही तसेच लोंचटासारखे भाऊसाहेबांपुढें जाऊन उभे राहिलों.

" बसा मंडळी, उभे का ?" सर्व उभ्या राहिलेल्या लाचारांस उद्देशून गुंड्याभाऊनें म्हटलें. भाऊसाहेबांची इच्छा सर्वांनीं आपल्यापुढें उभे रहावें अशी होती; कारण ते रत्नागिरीस एका ऑफिसांत कारकून होते व आपले वरीष्ठ आपल्याला टेबलापुढें जसे तासतास उभे करितात तसे आपण लोकांस आपल्या पुढें उभें ठेविण्याची त्यांची महत्त्वाकांक्षा सफळ होण्यास हल्लींसारखी पुनः संधि कधीं येणार होती ? अर्थात् आपले व्याही होऊं पाहणारे चारपांच गृहस्थ आपल्यासमोर खालीं बसलें हें त्यास आवडलें नाहीं. " काय हो, आपण कोठून आलेत ? " समोर बसलेल्या खादीचा पोषाक केलेल्या एका विद्यार्थीवजा तरुणास त्यांनीं विचारलें.

त्यानें एका पगडीवाल्याकडे बोट दाखवून आपण त्यांच्या बरोबर आलों आहों असें सांगितलें. पगडीवाला कांहीं बोलणार तोंच त्यांनीं एक तिरस्कारयुक्त नजर त्याच्याकडे फेकिली व आमच्या काठेवाडी मित्राकडे पहात विचारलें, " आणखी आपण कोठचे ? "

" मी, भाईसाहेब, राजकोटचा. आज चार पेढ्या काठीयावाडमध्यें गेल्या, पण मुलगी इकडे दक्षणेंत देऊन जुन्या संबंधाचं पुन: उज्जीवन करायचं असं मीं ठरवलं आहे. मुद्दाम राजकोटपासून इथें रत्नागिरीपर्यंत तुमच्या मुलासाठीं आलों बापजी."

उकिडव्यांच्या स्थलाकरितां हे भाईसाहेब इतकें लांब आले असून सदूभाऊस उगाच थाप देत होते. खरोखरच भटांचें स्थळ फारसें स्पृहणीय नव्हतें; परंतु उकिडव्यांकडील खेप निष्फळ झालेल्या निराश वधूपित्यांचा तो एक आधारस्तंभ होता. यावरून मला माझ्या लहानपणची एक आठवण झाली. एकदां आमच्या पुण्यास ' पर्वती प्रासादिक संगीत मंडळी ' आली होती. तेव्हां दुसरी मंडळी गांवांत नसल्यानें कांहीं दिवस नटांना पोटभर खाऊं मिळत होतें. इतक्यांत गंधर्व संगीत मंडळीचा मोर्चा पुण्यावर फिरून पर्वती प्रासादिकांचें धाबें दणाणलें. कांहीं दिवस आडवारीं नाटकें करून पाहिलीं, स्त्रियांस व विद्यार्थ्यांस निम्मे दर करून घड्याळ बक्षीस देण्याची जाहिरात दिली; परंतु दिवाबत्तीचें भाडें वसूल होण्याइतकींहि तिकिटें खपेनात. शेवटीं हुशार म्यानेजरांनीं युक्ति लढवून गंधर्व मंडळीच्या खेळांच्याच रात्रीं, परंतु एक तास उशिरां आपल्या खेळांचा प्रारंभ ठेविला.

आणि ही युक्ति सफळ झाली. गंधर्व मंडळीचीं तिकिटें बंद होऊन शेंकडों प्रेक्षकांस फोटो काढण्यासारखे चेहरे घेऊन घरीं परत जाण्याची आणि ' इतक्यांत दोन वाजले ? ' असें स्वागत मिळण्याची पाळी येई. परंतु पर्वती प्रासादिकांचा खेळ एक तास उशिरां सुरू होण्याचा प्रघात पडल्यापासून हे विन्मुख झालेले

दिदृक्षु त्या मंडळीस उदार आश्रय देऊन घरीं परत गेल्यावर, " आज गंधर्वाचा आवाज चांगला होता, " इत्यादि गप्पा मारून आपली फजिती झाकूं शकूं लागले.

\+ + +

आपल्या मुलाकरितां इतक्या लांबलांबून लोक येत आहेत असें ऐकून भाऊसाहेबांना अभिमान वाटला आणि त्याचा एक मोठा थोरला भपकारा त्यांनीं विडींतून धुराच्या रूपानें अढ्याकडे सोडून दिला. " तर मग हें पहा मास्तर," विडीचें थोटूक गादीवर घाशीत ते म्हणतात, " मी स्पष्ट सांगून ठेवतों. काय तुमची तीन हजार छन् छन् खर्चायची ऐपत आहे का ? हो, उगाच वायफळ बोलून तुमचा व्हॅल्युएबल टाइम खर्चण्याची आम्हांस इच्छा नाहीं हो."

" तर मग भाईसाहेब, मींहि स्पष्ट विचारतों घुस्सा करूं नका, " काठेवाडी गृहस्थ बोलला, " स्थळ तितकं चांगलं असलं तर तीन हजार खुषीनीं खर्चील. आपल्या चिरंजिवांना पगार काय आहे ? माफीसह विचारतों. "

हा सडेतोड सवाल ऐकून भाऊसाहेबांचें तोंड किंचित् उतरलें. पण तसेंच उसनें अवसान आणून ते बोलूं लागले, " तसा पगार म्हणाल तर फार नाहीं; परंतु पुढल्या प्रास्पेक्टसकरितां तो रायपुरास चिकटून राहिला आहे. तो एम्. ए. मधें संस्कृत घेऊन फर्स्ट क्लासांत आला असल्यानी त्याच्यापुढें फार चांगला चान्स आहे. तोच सांगेल काय तं. काय ? अरे रामभाऊ, इकडे येस जरा टोपी घालून ! " शेवटचें वाक्य ते ओरडून म्हणाले.

पाव मिनिटांत रामभाऊंची स्वारी येथें आली. त्यांचा तो फिक्कट,

खप्पड चेहरा, डोळ्यांचा निस्तेजपणा लपविणारा सहा नंबरचा चष्मा, मोजून घेतां येण्यासारख्या बरगड्या व ओठांमधून आमच्या सारख्या नवख्या इसमांकडे कुतूहलपूर्वक डोकावणारी दांतांची पिवळट जोडी, यांच्या योगानें विचित्र दिसणारा अवतार पाहून तीन हजारांस हा सवदा बराच महाग आहे असें आम्हां सर्वांस वाटलें.

" रे रामभाऊ, तुझा पगार नि प्रास्पेक्टसची माहिती सांग बरं पाहुणे मंडळींना. मला कांहीं तं नीट सांगतां येत नाहीं, बस खालीं न लाजतां, " भाऊसाहेब दुसरी विडी पेटवीत म्हणाले.

रामभाऊ खालीं मान घालून लाजत लाजत आमच्यासमोर बसले व म्हणाले, " हल्लीं मला पन्नास देतात, पण दोनतीन महिन्यांत साठ होणार आहेत. पण दोनतीन वर्षांत रायपुरास छत्तीसगड कॉलेज सुरू करण्याची स्कीम आहे. तिथें संस्कृत प्रोफेसरच्या जागीं माझा पहिला हक्क लागू होईल. "

" पण तें तर अजून स्थापन व्हायचं आहे. " पगडीवाला गृहस्थ उद्गारला.

" नि तें नाहीं जमलं तरी दुसरा चान्स आहे, " उजव्या हाताच्या तर्जनीनें सत्रंजीच्या धुळींत वर्तुळें काढीत रामभाऊंनीं सांगितलें.

नाटकांत कधींकधीं अनेकजण एकदम एकच वाक्य बोलतात त्याप्रमाणें सर्व वधूप्रतिनिधींनीं, " तो कोणता ? " असें एकदम ओरडून विचारिलें.

" उमरावतीच्या किंग एडवर्ड कॉलेजांतले संस्कृतचे प्रोफेसर बृहस्पतवार रिटायर व्हायचे आहेत. त्यांच्याबद्दल माझीच नेमणुक

प्रॉव्हिन्शल ग्रेडमध्यें होईल अशी माझी खात्री आहे. ”

पगडीवाल्यांनीं ते केव्हां रिटायर होणार आहेत असें विचारिलें.

“ आणखी सहासात वर्षांत होतील रिटायर. सध्यां त्यांचं अठ्ठेचाळीसावं वर्ष चालू आहे. आपण रिटायर होतांना तुमचीच शिफारस करूं असं त्यांनीं कबूल केलं आहे, ” रामभाऊंनीं सांगितलें.

“ ही माझ्या मुलीची जन्मोत्री मी ठेवून देतों. मुलाच्या जन्मोत्रीबरोबर जुळत असली तर पहा. मी उद्यां तपास करायला येईल, ” असें सांगून काठेवाडी गृहस्थान आपल्या मुलीची छापील पत्रिका समोर टाकून देऊन तेथून पळ काढिला. सहासात वर्षांनीं मिळणारा रामभाऊचा प्रोफेसरीचा योग त्याला फारसा आकर्षक वाटत नव्हता असें त्याच्या चर्येवरून व उर्मट चालीवरून दिसलें.

तो गेल्यावर मीं भाऊसाहेबांना विचारिलें, “ आपला पत्रिकेवर विश्वास आहे वाटतं ? ”

“ आहे साधारण, ” ते म्हणाले, “ त्यांतून अलिकडे पहा. आपल्या ब्राम्हण वर्गाची स्थिति फारच खालावली आहे. काय ? आपल्या मुलांना स्वतःच्या हिमतीवर आयुष्यांत मार्ग काढणं फारच दुरापास्त झालं आहे. तेव्हां म्हटलं निदान ग्रहांचं बळ तरी कांहीं उपयोगी पडलं तर पहावं. रामभाऊचा बुध चांगला म्हणून तो सगळ्या परिक्षांत वर आला, पण द्रव्ययोग मध्यम म्हणून नोकरीचं जमत नाहीं. काय ? तव्हां मीं ठरवलं कीं, जिच्या कुंडलींत द्रव्ययोग उत्तम असेल अशीच मुलगी सून करून

घ्यायची, म्हणजे तिचे ग्रह तरी नवऱ्याच्या दैवाला पुढें रेटीत नेतील. काय समजलेत ? " आपल्या या नामी युक्तीच्या अभिनंदनार्थ त्यांनीं एक खूप मोठा झुरका मारून पडवींत धूरच धूर करून सोडिला.

" रामभाऊ चहा घेऊन जा ! " आमच्या नऊ मैलांच्या वाटचालीनें थकल्या भागल्या जिवांना आनंद देणारा असा निरोप घरांतून आल्यानें रामभाऊ घरांत गेले व लगेच दोन पंचपात्रीं चहा घेऊन परत आले. आम्ही चौघे, भाऊसाहेब पांचवे व रामभाऊ सहावे. इतक्यांना दोन पंचपात्रीं कशीं पुरतील ? कदाचित् मागून आणखी चहा येईल असें मला वाटलें. भाऊसाहेबांनीं एक पंचपात्र घेऊन पाहुण्यांच्या अगोदरच तें रिकामें करून टाकिलें. रामभाऊंनींहि आपल्या हातांतलें पंचपात्र भुरके मारीत संपविलें.

यांच्या जवळ कदाचित् दोनच भांडीं असतील, तीं आतां विसळून त्यांत आम्हांस चहा येईल अशी जरा मला आशा वाटली तरी पाहुण्यांच्या अगोदर चहा घेणें हें चांगल्या चालीरीतीचें लक्षण मला वाटलें नाहीं.

चहा प्याल्यावर मिशांना लागलेला ओलावा फडक्यानें पुसून दुसरी विडी पेटवीत भाऊसाहेब त्या पगडीवाल्याकडे कृपादृष्टीनें पहात म्हणाले, " माफ करा पण आपण गोवंडे नाहीं का ? "

" होय मी गोवंडे. " पगडीवाला भाऊसाहेबांच्या वर्तनानें बराच रागावलेला होता. राग गिळण्याचा ( कारण चहाच्या बाबतींत निराशा झाल्यानें तो तरी बिचारा दुसरें काय गिळणार ? ) यत्न करीत तो म्हणाला, " भट ! आपण दोघे एकाच ऑफिसांत

बारा वर्षं बरोबर राहिलों असून तुम्ही मला ओळखलं नाहीं का ?"

"अहो, त्या वेळीं आमची नजर आपल्या पुढ्यांत नेहमीं जमिनीकडे लागलेली असे. त्यामुळें आपले क्रोम लेदरचे बूट जितके आमच्या परिचयाचे झाले होते तितका आपल्या चेहऱ्याचा परिचय आम्हांला झाला नाहीं. लक्ष्मण सीतेला म्हणतो, 'केयूरे न जानामि पैंजणं तु जानामि नित्यं पादाभिवन्दनात्.' तसंच आम्हां हाताखालच्या कारकुनांचं असतं. होः होः होः! हा झाला विनोद!" फूः करून भाऊसाहेब पगडीवाल्यास म्हणतात, "आतां प्रस्तुत विषयाकडे वळूं. आपण कुठें या कुग्रामांत पायधूळ झाडलीत ?"

"यांच्या प्रमाणेंच !" आमचेकडे बोट करून पगडी-वाल्यानें सांगितलें.

चहा न मिळाल्यानें झालेली निराशा दूर करण्याकरितां मी भाऊसाहेबांच्या जुडग्यांतली एक विडी काढून त्यांच्याच आग-पेटींतलि काडीनें पेटवूं लागलों. हा अतिप्रसंग न आवडून माझ्याकडे तिरव्या नजरेनें पहात त्यांनीं खोंच मारिली, "अलीकडे शिष्टाचार कसा पाळावा आणि कसा नाहीं हें शहरांतल्या लोकांना कळेनासं झालं आहे."

"आणखी खेडयांत तरी काय कळतं आहे ? दुसरीकडचे लोक पांचपांच कोस वाट तुडवून घटकाभर बसायला आले तरी त्यांना चहापाणी न देतां खुशाल त्यांच्यासमोर चहाचे डोस मार-तात !" गुंडयाभाऊच्या या टोमण्यानें भाऊसाहेब बरेच थिजले व विषय बदलण्याकरितां त्यांनीं गोवंडयांच्या जवळची पत्रिका मागितली; परंतु गोवंडयांनीं ती आणिली नव्हती म्हणा कीं आणिली

असून ही सोयरीक त्यांना नापसंत असल्यानें दाखवावयाची नव्हती म्हणा, त्यांनीं पत्रिका आणावयास आपण विसरलों असा जबाब दिला.

भाऊसाहेब म्हणाले, "ताकाला जाऊन भांडं विसरायचं किंबहुना जेवायला जाऊन तोंड विसरायचं अशी परिस्थिति आपल्या देशाची आजकाल झाली आहे. पत्रिका पाहिल्याशिवाय आम्हांला कांहीं एक कर्तव्य नाहीं. एक वेळ सर्टिफिकिटाशिवाय नोकरीचा अर्ज चालेल पण पत्रिकेशिवाय लग्न जमायचं नाहीं, काय समजलेत?"

रामभाऊंस पाहिल्यापासून त्या स्थळाचा नाद सोडण्याचा आमचा निश्चय झाला, म्हणून आम्हीं पुन: येण्याचें खोटें वचन देऊन परतचा मार्ग धरिला. गोवंडेहि आमच्या सोबतीनें परत निघाले व आमच्या बऱ्याच गप्पा झाल्या. सदूभाऊ (आतां त्याला भाऊसाहेब म्हणण्याचें कांहीं कारण उरलें नव्हतें) हा रत्नागिरीस एका ऑफिसांत कारकून होता व त्याच ऑफिसांत गोवंडे हे त्याच्यावर हेडक्लार्क होते. गोवंडे स्वभावानें जितके कडक तितकाच सदू कामांत गबाळ्या होता. या कारणानें गोवंडे त्यास वारंवार चापीत आणि घटका घटका टेबलापुढें उभा करून ठेवीत. वरबाप होतांच सदूभाऊस त्याचा वचपा काढण्याची संधि येऊन त्यानें गोवंड्यांकडे मुद्दाम लक्ष न देतां त्यांस तासभर तिष्ठत ठेविलें; त्यांच्या देखत त्यांस न देतां चहा प्राशन केला व त्यांची ओळखच नसल्यासारखी बेपर्वाई दाखविली. मुलाचा बाप होण्यांत असा फायदा आहे!

रत्नागिरीहून आम्ही पुण्यास आलों. येतांक्षणीं बरींचशीं पत्रें

टेबलावर पडलेलीं दिसलीं. गांवोगांवच्या मित्रमंडळीकडे स्थळांची चौकशी करण्यासाठीं मीं पाठविलेल्या पत्रांचीं तीं उत्तरें होतीं. कोठें मंगळ आहे, तर कोठें गुण पटत नाहींत; कोठें मुलगी मोठी आहे तर कोठें फार लहान आहे; कित्येक ठिकाणीं तर मुलीला भंडाऱ्यास मुलाच्या आत्याबाईकडे पहाण्यास पाठवून मग बोलणें करा, तर कोठें मुलाच्या एल्एल्. बी. चा खर्च द्या, अशा प्रकारचीं उत्तरें होतीं. मी पत्रें पहात आहें इतक्यांत भिकंभट दशपुत्र्यांनीं मला एक नवीन स्थळ सांगितलें.

नवरामुलगा ग्वाल्हेरकडे जहागीरदार होता. आईबाप कोणी नाहींत. वार्षिक उत्पन्न सुमारें आठ–दहा हजारांचें असावें. वय असेल अठ्ठावीस ते बत्तीस-पर्यंतचें. बिजवरपणाचा नुस्ता टिळा लागलेला आहे. येथें पुण्यास कॉलेज रोडवर बंगला भाड्यानें घेऊन तेथें मुली पहाण्यास येऊन राहिला आहे. हुंड्यापांड्याची अट नाहीं; पण मुलगी चांगली व उफाड्याची पाहिजे.

दुसरेंहि एक स्थळ प्रथम वराचें होतें. उपनांव भातखंडे. 'मुलगा' बारामतीच्या शाळेंत मास्तर होता. तो अवघ्या विसाव्या वर्षीं बी. ए. झाला, तेव्हांपासून त्यास पुष्कळ मुली सांगून येत असत. या अपूर्व यशामुळें तो हरभऱ्याच्या झाडावर इतका वरपर्यंत चढला कीं, सुस्वरूप आणि बळकट, निदान इंग्रजी सहा यत्ता झालेली मुलगी पाहिजे, तिला काशिदा, गायनवादन येत असून शिवाय शेणसडाहि करितां आला पाहिजे, दोन्हीकडचा खर्च करून सालंकृत कन्यादान करणारा तिचा बाप असला पाहिजे. त्यास एका मुली शिवाय इतर अपत्यें नसलीं पाहिजेत;

अशा अनेक अटी तो घालावयाचा. जोंपर्यंत तो एल्एल्. बी. च्या वर्गांत होता तोंपर्यंत त्याच्या कर्तृत्वाचें व दैवशालित्वाचें प्रमाण अनिश्चित असल्यानें त्याला पुष्कळ चांगल्या मुली सांगून येत. परंतु एकादींचें शिक्षण आपल्या अपेक्षेपेक्षां कमी आहे, तर दुसरींचें नाक डोळ्यांशीं बरोबर ९० अंशाचा कोन करीत नाहीं, तर आणखी एकादींचे डोळे कपाळाच्या रुंदीच्या मानानें किंचित् बारीक आहेत व त्यांत घाऱ्या किंवा निळया रंगाची छटा बरीच कमी आहे; अशा अनेक खोड्या काढून त्यानें तीसचाळीस मुली नापसंत केल्या.

एल्एल्. बींत दोनचार गोते खाऊन स्वारी बारामतीच्या हायस्कुलांत मास्तर होऊन राहिली तरी तेथून दर मार्चांत व ऑक्टोबरांत मुंबईची वारी करण्यास जाई; तोंपर्यंत तिचा भाव फारसा उतरला नाहीं. परंतु पुढें तिनें एल्एल्. बी चा नाद सोडला, कायद्याची पुस्तकें विकून टाकिलीं, व एस. टी. सी. ( मास्तरकी ) च्या परिक्षेस बसण्यास प्रारंभ केला. तेव्हां मात्र लग्नाच्या बाजारांत तिची किंमत उतरली.

वयाच्या २१ व्या पासून २६ व्या वर्षापर्यंत भातखंड्यांनीं सुमारें शंभर सव्वाशें मुलींच्या बापांचा मनोभंग केला.

* * * *

सहज ओघांत आलें म्हणून लिहून ठेवितों. इंग्रजी गोष्टींत किंवा नाटकांत जिम्, एडी किंवा गिल्बर्ट या कथानायकांचा अगर ईलेन, किटी किंवा पॉलीन या नायिकांचा हृदयभंग होऊं शकतो. आपल्याकडील कथालेखक इंग्रजांचें आंधळें अनुकरण करून,

" प्रभाकराच्या भीष्मप्रतिज्ञेमुळें प्रभावतीच्या नाजूक अंतःकरणास धक्का बसून ती वेडी झाली, " अथवा " पद्माकर आणि पद्मावती यांच्या आगामी विवाहाची कुंकुमपत्रिका पाहतांच भग्नहृदय पद्मिनीचा हतभागी आत्मा तिच्या सुकुमार नश्वर देहाचा त्याग करून गेला ! " असले प्रसंग वर्णितात. परंतु ते आपल्या चालीरीतींशीं फारसे जुळत नाहींत. त्या ऐवजीं असें वर्णन केलें तर प्रचलित हिंदु परिस्थितीशीं त्याचा विरोध भासणार नाहीं:—

" प्रभाकराच्या भीष्मप्रतिज्ञेमुळें प्रभावतीचे वडील वृद्ध तात्यासाहेब यांच्या अंतःकरणास धक्का बसून त्यांच्या हृदयाची क्रिया बंद झाली व तींतच त्यांचा अंत झाला, " किंवा " पद्माकर आणि पद्मावती यांच्या विवाहाची कुंकुमपत्रिका पाहातांच पद्मिनिच्या वडिलांची फार निराशा होऊन ते दुसरीं स्थळें पहाण्यांत निमग्न झाले. " आपल्या पौर्वात्य पद्धतींत कांहीं कमी रोमान्स नाहीं पण इंग्रजी चालीरीतींशिवाय इतरत्र मनोवेधक असें कांहीं सांपडावयाचेंच नाहीं असा आमच्या लेखकवर्गाच्या मनावर घट्ट पगडा बसलेला आहे तो सुटणार कसा ?

रा. भातखंडे यांचा भाव उतरल्यापासून अगदीं गरजू किंवा अडलेल्या वधूबापांशिवाय इतर कोणी त्यांच्या वाटेस जाईनासें झालें. त्यांच्या पसंतीच्या धारवाडी कांट्यास आतां पासंग लागूं लागला. इंग्रजी सहावीऐवजीं चारपांच यत्ता झालेली व नाकींडोळीं बरी असलेलीं मुलगी चालूं शकेल असें ते म्हणूं लागले. सत्ताविसाव्या वर्षीं ते हरबऱ्याच्या झाडावरून खालीं जमिनीवर उतरले.

सालंकृत कन्यादानाची अट काढून टाकण्यांत आली कारण आपण शिकवण्या करून जरूर ते दागिने केले आहेत असें ते म्हणूं लागले.

२८ वें वर्ष लागलें. शिकलेल्या मुली फार उधळ्या व स्त्री-कर्तव्यें पार पाडण्यास नालायक असतात, त्यांतून लहान गांवांत रहाण्याचा त्या कंटाळा करितात, असें त्यांचें मत बनलें; आणि त्यांना तर बारामतींत जन्म कंठावयाचा ! घरीं गाय म्हैस ठेविली तर शेणगोठा करण्याला या शिकलेल्या गौरींची काय शक्ति आहे ? आपण तर गौरीपेक्षां गवरीला जास्त मान देणारे खेडवळ, तेव्हां अगदीं अक्षरओळख नसली तरी चालेल, पण मुलगी चांगली मोठी आणि देखणी पाहिजे येथपर्यंत मजल आली. या वर्षीं फक्त दहाच मुली सांगून आल्या.

२९ वें ( नवरदेवाच्या भाषेंत नऊविसावें ) वर्ष लागलें. ‘ मुलगा ’ तिशींत गेला. आतां मुलगी मोठी पाहिजे एवढीं एकच अट राहिली. या सबंध वर्षांत एकच मुलगी ( मुलगी कसली ? बाईच ती ! ) त्याला सांगून आली

तिला पाहिल्यानंतर कांहीं महिनेपयत त्याला विरक्तीचा आनंद उपभोगावयास मिळाला होता.

झालें, आणखी चारपांच वर्षें गेलीं परंतु आमच्या भातखंड्यांना जें एकोणतिसावें वर्ष चालल होतें तें कांहीं केल्या ३० वें होईना. एकादा ग्रह ज्याप्रमाणें वक्री जातो त्याप्रमाणें भातखंड्यांचें वय २८ वें किंवा २७ वें देखील होई; परंतु तें मार्गी लागून ३० वें होण्याचें साफ नाकारी ! लग्न झाल्याशिवाय त मार्गी लागणार

नाहीं असें गांवकरी बोलूं लागले.

गांवांतल्या लोकांनीं मात्र त्यांना २४-२५ वर्षें झालीं आहेत अशी कंडी पिकविली. त्यांना मुली सांगून येण्याचें तर बंद होऊन गेलें. उलट तेच युक्तीप्रयुक्तीनें मुलींस मागण्या घालूं लागले. सुनेला अशी वांकवीन आणि विहिणीला तशी जेरीस आणीन अशा महत्त्वाकांक्षा लयाला गेलेली भातखंडे मास्तरांची आई कथापुराणांना जाऊन तेथें आलेल्या उपवर मुलींच्या आयांची मनधरणी करून, "माझा राजा काय वाईट आहे? चांगली सोन्यासारखी मुलगी गांवांतल्या गांवांत राहील. आमच्या राजाचा न् हिचा चांगला जोडा जमेल!" अशा याचना करूं लागली होती. शाळेला उन्हाळ्याची सुटी पडल्यावर भातखंडे आईला घेऊन पुण्यास येऊन राहिले होते. भातखंड्यांच्या मातोश्रींनें चिमणीस बेलबागेंत पाहून आईजवळ वरच्यासारखे उद्गार काढिले.

पण मुली पहातां पहातां मध्यवयांत आलेल्या असल्या प्रथम वराला चिमी देण्याला मी तयार नव्हतों. वरपक्षीय उर्मट शब्द-प्रयोग वापरावयाचा म्हणजे भातखंड्यांचा विचार देखील करणें मला 'कर्तव्य' नव्हतें. त्यापेक्षां लहानपणींच ज्याची बायको मेलेली आहे असा बावीस वर्षांचा बिजवर अधिक बरा असें ठरवून मी ग्वाल्हेरकडल्या जहागीरदाराकडे त्याच्या भाड्यानें घेतलेल्या बंगल्यावर गेलों.

तेथें गेल्यावर नोकरानें मला झोपाळ्यावर बसण्यास सांगून कारभारी साहेबांस माझ्या आगमनाची वर्दी दिली. कारभारी साहे-

बांनीं प्रेमानें माझें स्वागत करून आपल्या घरीं येण्याची तकलीफ मीं कां घेतली असें पुशिलें. मुलगी पहाण्यास श्रीमंत कोणाच्या घरीं जात नाहींत. कारभारी साहेब व त्यांची पत्नी यांनीं मुलीची प्राथमिक पहाणी करावयाची व त्यांची पसंती असल्यास मीं जहा-गीरदार साहेबांच्या बंगल्यावर यावयाचें. याप्रमाणें तहाच्या अटी मान्य करून एकदां श्रीमंतांच्याकडे नजर टाकण्याची इच्छा मीं प्रदर्शिली. 'श्रीमंतांची आज्ञा घेऊन कळवितों,' असें सांगून कार-भारी साहेब माडीवर जाऊन आले व मला म्हणाले, 'स्वारी झोपली आहे, काल नाटकाला गेली होती. पण हळूंच येऊन पाहून घ्या.'

पावलें न वाजवितां आम्ही माडीवर गेलों. श्रीमंत अंगावरून रेशीमकांठी उपरणें पांघरून घोरत होते. त्यांचा देह स्थूल वाटला, पण त्यांचें स्वरूप मुळींच दृष्टीस पडलें नाहीं. त्यांस ओझरतें पाहून कारभारीसाहेबांस मुलगी पहाण्याला येण्याचें आमंत्रण देऊन परत घरीं आलों.

कारभारी व त्यांची पत्नी यांनीं चिमीस पसंत केलें व श्रीमं-तांनीं पहाण्याकरितां बंगल्यावर घेऊन येण्यास सांगितलें. आईला तें पसत पडलें नाहीं. 'मुलीच्याच घरीं पहावयास आलें पाहिजे अशी जुनी रीत आहे. मुलीनें कसलें वराच्या घरीं जावयाचें?' एवढा अर्थ निष्पन्न होणारीं शेंपन्नास वाक्यें तिनें एकाद्या कसलेल्या वक्त्याप्रमाणें निरनिराळ्या शब्दांनीं उच्चारिलीं. अशिक्षित स्त्रियाहि वक्तृत्वांत बृहस्पतीला सुद्धां हार जात नाहींत. पण सत्तेपुढें शहाणपण चालत नसल्यानें ग्वाल्हेरच्या श्रीमंत लोकांच्या चालीस मान देऊन आम्हीं मुलीस घेऊन जाण्याचें कबूल केलें.

दुसऱ्या दिवशीं शेजारच्या गुलाबबाईस सोबत घेऊन चिमूताईस मीं बंगल्यावर नेलें. आम्हांला माडीवर नेऊन खुर्च्यांवर बसविलें. चिमणीचें पांचवीचें रीडर बरोबर होतेंच. त्यांतल्या १२३ व्या पानांतल्या धड्याच्या प्रत्येक ओळीचें बाळबोध लिप्यंतर तिच्याखालीं मीं पेन्सिलीनें लिहून ठेविलें होतें. " चिमणे ! काढ कोणता तरी धडा, " असें म्हटलें कीं, तिनें नेमका तोच धडा काढावयाचा अशी आमची शक्कल होती. थोड्या वेळांत श्रीमंत स्वतःच लंगडत आले व समोरच्या खुर्चीवर बसले. मीं नमस्कार करून विचारलें, " कारभारीसाहेब घरांत नाहींत वाटतं ? "

" ब....ब....ब....बरं आहे. काल जरा ड....ड....ड....डोकं दुखत होतं. " श्रीमंत तोतरे होते असें दिसलें.

" आपला अभ्यास किती झाला आहे ? " मीं विचारिलें.

" ब....ब....ब....बिलकुल बेताचा झाला आहे. कमी नाहीं आणि जास्ती नाहीं, " श्रीमंतांनीं सांगितलें.

त्यांच्या उत्तराची गंमत वाटून मीं विचारिलें, " बेताचा म्हणजे किती ? "

" झा–झाला असेल त–त–तीस इंचपर्यंत. पण किरसानीला पुरेल इतका झाला आहे, " मीं पावसाची चौकशी केली असें वाटणाऱ्या श्रीमंतांनीं उत्तर दिलें.

स्वारी तोतरी असून शिवाय बहिरी असावी असा मीं अंदाज केला आणि चिमूताईकडे वळून थट्टेनें म्हटलें, " काय चिमूताई ! हा लंगडा, बहिरा, तोतरा नवरा आहे का पसंत ? तूं म्हणालीस कीं, जरा देवाला किंवा सिनेमाला जाऊन येऊं का ? तर 'ना–ना–

नाहीं ज—ज—जायचं ब—ब—बस्स ! ' असं यांनीं उत्तर द्यायच्या आंत तूं परतहि येशील. शिवाय बहिरा असल्यानीं तूं कितीहि शिव्या दिल्यास तरी त्याला ऐकूं जायचं नाहीं. मारायला धावला तरी हा तैमूरलंगडा तुझा पाठलाग करूं शकणार नाहीं. "

ही शिफारस पसंत न पडून चिमणीनें रागावून माझ्याकडे पाहिलें पण कांहीं बोलली नाहीं. " गुलू, चल इकडे जरा, " असें म्हणून ती व गुलाब सज्ज्यांत गेल्या व तेथें कांहीं वेळ त्यांचें खलबत चाललें.

दोन्ही मुली इतका वेळ समोर बसल्या होत्या तरी श्रीमंत त्यांच्याकडे बघत नव्हते. त्यांची नज़र समोरच्या एका तसबिरीकडे होती. माझ्याशीं बोलतांना ती भिंतीवरील घड्याळाकडे खिळलेली असे. श्रीमंतांचा हा विनय मला फार आवडला. त्यांच्याकडे कांहीं वेळ मी कौतुकानें पहात होतों, तोंच कारभारीसाहेबांनीं जिन्याच्या दारानें प्रवेश केला, तेव्हां श्रीमंत मजकडे पहात रागानें ओरडले, " ब ब-बाबा, इ—इ—इ—इतका वेळ कुठें जाऊन राहिलां होतां ?"

कारभारीसाहेब जरा घोटाळल्यासारखे दिसले; पण कांहीं कुशल प्रश्न विचारून त्यांनीं मुलीला आणावयास सांगितलें. मीं त्या दोघींना सज्ज्यांतून आंत बोलाविलें. आंत येताना चिमूताईनें कडकलक्ष्मीचा अवतार धारण केला होता. केस पिंजारून ठेविले होते, कुंकू कपाळावर मळवटासारखें पसरून ठेविलें होतें, आणि पदर खूप लांब काढिला होता. तोंडाची पोष्टाची पेटी केली होती, आणि एकंदरीनें वेडसरपणाचें सोंग तिनें बेमालूम पांघरलें होतें. आंत येऊन त्या दोघी खुर्च्यांवर बसल्या.




चिमूताईनें कडकलक्ष्मीचा अवतार धारण केला होता.

तिचा अवतार पाहून कारभारीसाहेब चकित झाले. काल तर ही मुलगी चांगली दिसत होती आणि आज ही असें काय करीत आहे ? असें त्यांस वाटलें असावें. परंतु तसें कांहीं न बोलतां त्यांनीं विचारलें, " कोणची मुलगी पहायची ही का ती ? "

" ही. तिचं लग्न झालं आहे, " मीं सांगितलें.

" मुली, तुझं नांव काय बरं ? " त्यांनीं श्रीमंतांस खुणावून त्यांचें ध्यान खेचून चिमणीस विचारलें. श्रीमंतांनीं मघांच्या तसबिरीकडे नजर लाविली.

चिमणी न समजल्यासारखें करून प्रश्न विचारणाराकडे 'आ' करून पहात बसली.

" तुला भावंडं काय आहेत ? " कारभारी साहेबांनीं दुसरा प्रश्न केला.

याचें उत्तर शब्दांत न देतां माझ्या खांद्याला बोट लावून तिनें खुणेनें दिलें.

" वडील काय करतात ? "

" देवाच्या इथें गेले," तिनें उत्तर दिलें.

" अरे वाः हिला बोलतां येत आहे ! " कारभारी साहेब उद्गारले, " तुला वाचतां येतं कां ? "

" हो ! इंग्रजी, मराठी, संस्कृत सगळं येतं आहे, " असें गुलाबनें सांगितलें.

" तर मग वाच पाहूं," कारभारीसाहेबांनीं आज्ञापिलें. चिमूताई रीडर काढूं लागली; परंतु कारभारीसाहेब म्हणाले, " तें ओळखीचं बूक नको. हें घे मी देतों तें, " असें म्हणून त्यांनीं एक

सचित्र इंग्रजी पुस्तक तिच्या हातीं दिलें.

चिमणीनें तें अक्षरांचीं डोकीं खालीं रहातील अशा तऱ्हेनें उलटें धरलें व न समजणाऱ्या वेड्याप्रमाणें कांहीं वेळ त्याच्याकडे पाहून ती किंकाळली, “ इश्शऽऽ, हें तर मेलं उलटं छापलं आहे!”

चिमणीनें बळेंच वेड पांघरलें आहे कीं तिला उन्मादाची लहर आली हें मला उमगेना. मी रागानें म्हणालों, “ चिमे ! पुस्तक उलटं धरलं आहेस अन् म्हणे तें उलटं छापलं आहे. सरळ धर असं ! ” असें म्हणून मीं तें सरळ करून तिच्या हातीं दिलें. लगेच तिनें वेड्यासारखें हास्य केलें व पुस्तक फेकून म्हणाली, “ इश्श ! मला कुठं शिकवलं ल्यहायला ! ”

“ बरं जाऊं दे, तुला गृहकृत्यं कोणतीं येतात तें तरी सांग ” कारभारीसाहेब म्हणाले.

“ सगळीं गृहकृत्यं येतात, चहा पितां येतो, आईनं वाढलं म्हणजे जेवतां येतं आणखी आंथरूण घातलं म्हणजे निजतां येतं ! ” चिमणीन हासत हासत उत्तर दिलें.

“ चिमे ! आज तुला झालं आहे तरी काय असे वेडे चाळे करायला ? ” मीं रागानें तिला विचारिलें.

“ काल तर ही किती शांत, सुशील वाटली म्हणून हिला इथं बोलावलं, पण पहातों तों निराळाच प्रकार ! ” कारभारीसाहेब साश्चर्य क्रोधानें म्हणाले.

गुलाब तोंडाला पदर लावून फिदीफिदी हासत होती.

या सगळ्या प्रकारानें थक्क झाल्यासारखें होऊन श्रीमंत ‘आ’ वासून मध्यें तसबिरीकडे तर मध्यें घड्याळाकडे बघत होते.

" मी सांगूं याचं कारण ? " कारभारीसाहेबांनीं विचारिलें.

" सांगा पाहूं आपल्याला काय वाटतं !" गुलाबनें आवाहिलें.

" मला वाटतं काल दाखविलेली मुलगी वेगळी असावी. एक मुलगी दाखवावयाची आणखी पसंत पडली कीं, लग्नाला दुसरंच एक ध्यान पिवळं करून आणखी त्याचं तोंड दिसूं नये म्हणून मोठमोठ्या मुंडावळ्यांनीं झांकून तें वराच्या गळ्यांत बांधायचं, अशी बदमाशगिरी बहुत मुलींचे बाप करीत असतात. इतकं करूनहि ते मात्र साधू आणि मुलांचे बाप काय ते काफर असा जगाचा न्याय आहे " ते रागानें लालबुंद होऊन ओरडले.

" तसा कांहीं प्रकार इथें झाला नाहीं. पण या अलीकडच्या पोरी —" मी बोलूं लागलों, परंतु गुलाब मध्येंच बोलली, " मग काय या असल्या बहिऱ्या, तोतऱ्या, तिरळ्या ध्यानाबरोबर आयुष्य कंठायचं चिमणीनीं कबूल करावं असं तुम्हांला वाटतं का ? "

" गुलाब ! हा असला पति जरी एकाद्या मुलीच्या दैवीं आला तरी तो तिचं दैवत हें प्रत्येक हिंदु मुलीनं लक्षांत ठेवलं पाहिजे....कारभारीसाहेब, या मूर्ख मुलीकडे लक्ष देऊं नका. त्यांना मुळींच पोंच नसतो, " मीं बजाविलें. परंतु तेवढ्यांत त्या दोघी जिना उतरून खालीं गेल्या आणि टांग्यांत बसून, " आप्पा आम्ही जातों, " असें सांगून चालत्या झाल्या. या मूर्ख पोरींनीं एवढ्या मोठ्या जहागिरदारापुढें माझा पाणउतारा केला म्हणून मी फार खजील झालों. झाल्या प्रकाराबद्दल श्रीमंतांची आणि कारभाऱ्यांची माफी मागून मी घरीं गेलों. तेथें त्या दोन द्वाड पोरी

आपल्या पराक्रमाचें वर्णन तिखटमीठ लावून आईस व इतर बायकांस सांगत होत्या. तें ऐकून इतर बायकांत जरी हशा पिकत होता, तरी आईस व म्हाताऱ्या जिजाकाकूंस त्यांचें करणें आवडलें नाहीं.

" अग मुले ! किती झालं तरी वरपक्ष म्हणजे तांब्याचं भांडं आणखीन् वधूपक्ष म्हणजे मातीचं भांडं. मातीचं भांडं तांब्याच्या भांडयाशीं किती भांडलं तरी भंगायची पाळी आली तर ती मातीच्या-वरच यायची ! मुलीच्या जातीनीं असा उर्मटपणा करूं नये," आईनें समजाविलें.

"अहो मावशी, आत्तांच्या मुली अशा चवचाल झाल्या आहेत कीं कांहीं बोलायची सोय नाहीं. आम्ही कशा गरीब गाईसारख्या ! मुली बस म्हटलं कीं बसत होतों, चालून दाखीव म्हटलं कीं चालून दाखवीत होतों. परवां त्या सहस्रबुद्ध्यांच्या यमीला पहायला आले होते त्यांनीं विचारलं, 'मुली, चहाला फोडणी कसली देतात?' तर मग गप बसायचं कीं नाहीं, नाहींतर ' देत नाहींत ' म्हणून सांगायचं कीं नाहीं–" जिजाकाकू बोलूं लागल्या.

" होऽऽऽ" लांब सूर काढून आईनें अनुमोदन दिलें.

" होऽओ ! तर ती मेली काय म्हणते, ' चहाला देतात राकेलची फोडणी आणखी तुमच्यासारखे चावट पाहुणे आले म्हंजे त्यांच्या तोंडांत ओततात ! ' काय तरी बाई अलीकडच्या पोरी चहाटळ झाल्या आहेत ! " जिजाकाकूंनीं बोलण पुरें केलें.

या आख्यायिकेनें गुलाब व चिमणी फार खूष होऊन फीमेल हायस्कुलांतल्या इतर मुलींप्रमाणें बाहेरून आंत श्वास घेत घशां-

तून सेकंदसेकंद टिकणारे व सेकंदासेकंदाचें मध्यें अंतर असलेले आवाज काढीत हंसूं लागल्या. " काय ग जिजाकाकू, त्या मुलींनीं चहावर बुइट् केली म्हणून ती चहाटळ वाटतं ? " गुलाबनें विचारलें.

" मला नाहीं ग बाई समजत ती वीट का धोंडा, पण एवढं मात्र खरं कीं आज चिमणीचा जहागीरदारीण व्हायचा योग तुम्हीं दवडलात. म्हणतात ना तशांतली गत—दैव देतं नि कर्म नेतं. "

खरोखरच या द्वाड पोरट्यांनीं चेष्टा करून माझा जहागीरदाराचा शालक होण्याचा योग दवडला. त्यांतल्या त्यांत मृच्छकटिकांतील राजशालक हा शकार असल्यानें हेवा करण्याजोगा नव्हता, परंतु शकारत्व राजाकडे आणि शालकत्व माझ्याकडे अशी वांटणी उपेक्षणीय नव्हती. बरें जरा लुळा, लंगडा नवरा असल म्हणून काय झालें ? त्याला माझ्याप्रमाणें तंगड्या तोडीत दररोज दोन मैलांची रखडपट्टी करण्याचें कारण नव्हतें. जरा बहिरा असला म्हणून काय बिघडलें ? त्याला कांहीं वरीष्ठ अमलदाराचे हुकूम ऐकावयाचे होते थोडेच ? जरी तो तोतरा असला तरी त्याला काय मास्तरकी किंवा वकीली करावयाची होती ?

बोलावयाचें काम करावयास कारभारी—कारकून होतेच आणि आमची चिमणी बायको होऊन घरांत आल्यावर त्याला बोलावयास मिळण्याची संधि मिळणें हें कपिलाषष्ठीसारखेंच दुरापास्त होतें. आतां राहिला तिरळेपणा. हा दोष किरकोळ आहे. मला 'अ' कडे पहावयाचें असल्यास मी 'अ' कडे डोळे करतों व मला 'अ' दिसतो. मला पूर्वेकडे पहावयाचें असल्यास मी पूर्वेकडे डोळे करितों व

मला पूर्व दिसते. जहागीरदारसाहेबांना 'अ' कडे पहावयाचें असेल तर ते बकडे बघतील व त्यांस ' अ ' दिसेल. त्यांना पूर्वेकडे पहावयाचें असल्यास ते उत्तरेकडे डोळे करतील व त्यांना पूर्व दिसेल. सारांश साध्य एक असलें म्हणजे साधनांची भिन्नता आड येण्याचें कारण नाहीं.

परंतु या युक्तिवादाचा कांहीं उपयोग नव्हता. श्रीमंतांचें लग्न ठरलें. ग्वाल्हेरच्या या नवरदेवाचें लग्न धारवाडच्या मुलीशीं पुणें येथें झालें. लग्नानंतर कळालें कीं, कारभारीसाहेब हे ग्वाल्हेर लाइट रेल्वेवर स्टेशनमास्तर आणि श्रीमंत हे त्यांचे चिरंजीव होते.

याप्रमाणें स्थळांची यादी संपुष्टांत आल्यानें उद्यां भिकंभटां-कडून नवीन माहिती आणण्याचा मीं बेत केला. दुसऱ्या दिवशीं चि. मोरूस ओसरीवर खेळवीत होतों. शिशुकौतुकांत मी गर्क झालों आहें तोंच, ' अहो चिमणराव आप्पा ! हें काय मांडलं आहे तुम्हीं ? ' असे अनोळखी शब्द ऐकूं आले. शिशुकौतुकाच्या नंदनवनांतून भूलोकावर उतरून शब्द उच्चारणाऱ्या व्यक्तीकडे पहातों तर ती स्वारी आमच्या घराजवळच कोठेंतरी रहाणारी बाबूराव धेंडसे यांची होती. सहासहा बोटें लांब वाढविलेले व मुद्दाम विंचरून विखरून टाकिलेले केस, मोठाले निस्तेज डोळे, खप्पड गाल, काटकिळी देहयष्टि, अंगांत मल-मलीचा सदरा, पौराणिक नाटकांतील पात्रांच्याप्रमाणें नेसलेलें धोतर, पायांत मद्रासी चपल्या असा त्याचा अवतार पाहून व " हें काय मांडलं आहे तुम्हीं ? " असा मजसारख्या तिऱ्हाइ-ताला केलेला प्रश्न ऐकून याला वेड तर नाहीं लागलें ? अशी शंका मला वाटली.

" काय हो, मीं काय मांडलं आहे न् तुम्ही काय विचारतां ? तुमचा माझा कांहीं संबंध ? " मीं त्यास म्हणालों.

"अहो, जरा वर चला, सांगतों," असें त्यानें म्हटल्यावरून चि. मोरूस त्याच्या आईजवळ देऊन त्याला घेऊन मी माडीवर गेलों. तेथें जातांच तो मला काकुळतीनें म्हणतो, " अहो चिमणाजी आप्पा, आपल्या बहिणीचं लग्न करून ती कोणत्या तरी मूर्खाच्या, हृदयशून्य पाषाणाच्या, गद्यमय गर्दभाच्या गळ्यांत बांधायचा कां बरं विचार केला आहेत ? अहो, मी तिच्या मनोमय, मनोहर मूर्तीचं या काव्यमय हृदयमंदिरांत आज अडीच महिने जतन करून ठेवलं होतं हो ! सुभद्रा दुर्योधनाला देऊन प्रेमी अर्जुनाला चुरमुरे खात बसवण्याचा बेत करणाऱ्या बळरामदादाची कृति कां बरं करायला लागलांत ? कोणीतरी श्रीकृष्ण या निराशाजनक परिस्थितींत माझ्या मदतीला आल्याशिवाय रहाणार नाहीं."

" पण चिमणीवर तुमचं प्रेम अडीच महिन्यांचंच आहेना ? त्याची दृढता कायम राहील असं समजायला तुमच्याजवळ काय पुरावा आहे. ? "

" अहो आप्पा, मीं तुमच्या चिमणीवर अडीच महिन्यांत अकरा गझलं, वीस सुनीतं आणखी आठ पदं अशीं एकंदर एकूण-चाळीस भावगीतं लिहिलीं आहेत ! "

त्याच्या बोलण्याचा मला फार राग आला. " काय हो, आमच्या बहिणीवर कविता ल्यहायचा तुम्हांला काय अधिकार ? " मीं त्यास दरडाविलें.

" अहो ' अधिकार काय ? ' म्हणून काय विचारतां ?

प्रेमानें अधिकार ।
दिधला प्रेमानें अधिकार ॥
कमलावरतीं प्रेम कराया नलगे परवाना
भृंगा, तेवी कविला रचण्या बालेवरि कवना........"

"वाहवा हो शहाणे, म्हणजे काय लोकांच्या मुली जाऊं लागल्या दारावरून कीं खुशाल तुम्ही त्यांच्यावर कविता रचणार कीं काय ?" मीं ओरडून त्यास विचारिलें.

"अलबत रचणारच. चिमणराव, मी जरी पैशानं गरीब असलों तरी माझ्या भावनेची श्रीमंती कुबेराला सुद्धां दिपवील अशी आहे. माझे तुम्ही मेव्हणे व्हा, म्हणजे मी तुमचा उतराई होईन. तुमच्यावर, तुमच्या मुलावर आणखी त्याच्या आईवर एकेक सुंदर भावगीत असं रचीन कीं, तें सर्व महाराष्ट्र गुणगुणत राहील. तुमच्या बहिणीला मी फुलाप्रमाणें वागवीन आणि तुम्हांला आमच्या नवग्रहमंडळाचा येता काव्यसंग्रह समर्पण करीन. निदान त्याचा प्रकाशनसमारंभ तुमच्या अध्यक्षतेखालीं करीन."

"पण तुमची गृहस्थिति कशी काय आहे ? दोन वेळ दोघांना पुरेसं खायला मिळेल इतकं तरी तुमचं उत्पन्न आहे का ? तुमच्या गृहस्थितिचं वर्णन करा पाहूं."

"अहो, आम्ही दोघें काव्यानंदांत निमग्न झाल्यावर भाकरी-सारख्या पार्थिव पदार्थाचं स्मरण तरी त्या सविकल्प समाधींत, त्या उन्मनस्क उन्मादांत, त्या गूढ गुंजारवांत आम्हांला होईल असं तुम्हांला वाटतं काय ? तुम्हांला सांगतों मि. जोग ! माझी गृह-स्थिति मी काय वर्णन करूं ? आम्हां प्रेमाच्या फकिरांचं अलम्




नवग्रहमंडळाच्या कार्यालयांत तरंगत गेला.

दुनिया हेंच घर आहे. माझ्या प्रेमदेवतेचा मला लाभ करून द्या कीं, आम्ही दोघें या बाह्य जगताला लाथ मारून दारिद्र्याच्या खडकावर नंदनवन निर्माण करून–" कवि आपले नेत्र अधिकाधिक विस्फारीत आवेशानें बोलत असतां मला त्याच्या अतिप्रसंगाचा इतका राग आला कीं, त्याची मानगुटी धरून उचलून मीं त्यास खिडकींतून बाहेर झुगारलें.

सुदैवानें त्याचें शरीर इतकें पोखरलेलें होतें कीं तो दगडासारखा धपकन् खालीं न पडतां एकाद्या पिसाप्रमाणें किंवा म्हातारीप्रमाणें हेलकावे खात रस्त्यावर आला व गुंजारव करीत नवग्रहमंडळाच्या कार्यालयांत तरंगत गेला.

जुन्नरच्या कर्वे वकिलांचा मुलगा लग्नाचा आहे, बी. एस्सी. होऊन एल्एल्. बी. च्या टर्मा भरीत आहे, घरची शेती आहे; इत्यादि माहिती भिकंभटांनीं दिली. तेव्हां मी जुन्नरला जाण्यासाठीं सकाळीं पिठलेंभात खाऊन ऑफिसांत आजारचिठ्ठी पाठवून शनवारवाड्यासमोर तिकडे जाणाऱ्या मोटारींत बसलों. शेजारीं जुन्नरलाच जाणारी दुसरी मोटार होती. वेळ जाण्यासाठीं मी तींतलीं माणसें मोजीत होतों व आश्चर्याची गोष्ट ही कीं, आमचे जुने मित्र काठेवाडी गृहस्थ आपल्या कन्येसह तींत विराजमान झालेलेच होते !

" नमस्कार हो मिस्टर ! " मीं त्यांस ओळख दिली.

" जयजय भाईसाहेब ! तुम्ही कुठें उपडलांत ? " त्यांनीं विचारिलें.

" मी जरा जुन्नरला जातों आहें. एक इन्शुरन्स केस मिळती

आहे, पहावी खटपट करून ! आपण ? " मीं पुशिलें.

" मीहि तिथेंच जातों आहें. हुंडी पटली तर पहायची आहे. क़ुदरती बनाव आहे भाईसाहेब. पण आपण आपला प्रयत्न करीत असावं. आमच्या राजकोटकरतां ही पुणेंप्रांताची हवा पुष्कळ थंड आहे, बापजी ! त्यांतल्या त्यांत शिरडीचा रस आणि अंजिराची मौज कांहीं और आहे ! " काठेवाडी गृहस्थानें हवापाण्याचा विषय काढून कांहीं वेळ घालविला. आमच्या मोटारींत उतारूंचें भरताड आधीं झाल्यानें आम्ही आगाऊ निघालों.

ही काठेवाडी मोहीम जुन्नरास कन्यांच्या स्थळावरच निघाली असली पाहिजे असा मीं तर्क केला. आमची स्वारी आधाडीनें निघाली. यायोगें चढाओढींत आपण यशस्वी होऊं अशी मला खात्री वाटली. सारखा मी काठेवाड्याची गाडी तर मागून येत नाहीं ना ? असें वळून वळून पहात, परंतु ती येत नसल्यानें आनंदांत, होतों.

चाकण सोडल्यावर आमच्या मोटारच्या इंजनानें दीर्घ श्वास टाकून रस्त्यांतच मुक़ाम केला. सारथी खालीं उतरला. त्यानें इंजन-मंजूषा उघडली. हा स्क्रू ओढला, तो नट् घट्ट केला, थोडें पाणी ओतलें. मंजूषा बंद केली आणि मोटार सुरू करण्याची किल्ली जोराजोरानें फिरविली. इतक्यांत काठेवाडयाची गाडी मागाहून येऊन उतारूंच्या ' हुर्यो'च्या जयघोषांत पुढें गेली. " जयजय हो भाईसाहेब ! " असें ओरडून काठेवाडयानें मला खिजविण्यास कमी केलें नाहीं. आमच्या घामाघूम झालेल्या सारथ्यानें किल्लीचे शेंदोनशें वेढे दिल्यावर मोटारच्या अंगांत कांपरें भरलें. तेव्हां ' ठीक आहे' असें पुटपुटून सारथी आंत आला व पुन्हां आमची गाडी चालू झाली.

खेडास काठेवाडी रथ उतारूंच्या चढण्याउतरण्यासाठीं उभा होता; परंतु आमच्या मोटारींत सगळे थेटचे उतारू असल्यानें आम्ही खेडास थांबलों नाहीं. काठेवाडी गृहस्थाच्या मोटारीस ओलांडून आमची गाडी जात असतां मींहि "जयजय हो भाईसाहेब!" असें ओरडून त्यास फजीत केलें.

आमची गाडी नारायणगांवास चहाच्या दुकानासमोर उभी राहिली. सारथी उतरला व दुसऱ्या बऱ्याच गाड्यांचे सारथी मिळून ते गप्पा, विड्या व चहा यांचा फन्ना उडविण्यांत गर्क झाले. कांहीं वेळानें काठेवाडी मित्राची गाडी आली, थांबली व तिच्यांतला सारथीहि उतरून आपल्या व्यवसायबंधूंत मिसळला. आतां या काठेवाड्याची व आमची अशा गाड्या जुन्नरास बरोबरच पोंचतील किंवा कदाचित् त्याची गाडी अगोदर पोंचून तो कर्वे वकिलांच्याकडे आधीं जाऊन आपली हुंडी पटवून घेईल अशा भयानें त्याच्या प्रयाणास खोळंबा करण्याच्या योजनेंत मी निमग्न झालों.

बरोबर! सांपडली युक्ति! मीं मिस्कीलपणें हास्य करून खिशांतून चाकू बाहेर काढिला, व चित्रपटांतील खलनायकाप्रमाणें त्याची धार तपासून पाहिली. नंतर त्याचें पातें मागील बाजूस राहील अशा बेतानें त्याची मूठ हातांत धरून काठेवाडी गृहस्थाशीं बोलण्याच्या निमित्तानें त्याच्या मोटारीच्या अंगाशीं उभा राहून हळूंच पातीचें टोंक एका धावेंत खुपसलें. नंतर परत येऊन आपल्या जागीं बसलों.

आमचा सारथी आला.

काठेवाडी मोटारीचा पण सारथी आला. दोन्ही मोटारी एकदम सुरू झाल्या. शत्रु खात्रीनें पुढें जाणार अशी मला भीति वाटूं लागली. तोंच फट्दिशीं बार होऊन माझी योजना फलद्रूप झाली. काठेवाडी मोटारीस मीं पाडलेल्या छिद्राचें पंक्चरांत रूपांतर होऊन धावेंतील हवा नाहींशी झाली. म्हटलेंच आहे, ‘ छिद्रेष्वनर्था बहुलीभवन्ति. ’

मी गांवांत शिरलों. एका घरावर ‘ कर्वे ’ या नांवाची पाटी पाहून घरांत शिरलों. तेथें ओसरीवरील झोपाळ्यावर वकीलसाहेब बसले होते. मला पहातांच माझें स्वागत करून त्यांनीं आपल्या स्वतःच्या आसनावर जागा दिली, आणि माझ्याशीं इतक्या साधे व सरळपणानें बोलूं लागले कीं, मला वाटलें येथें कांहीं तरी काळेंबेरें असलें पाहिजे. हा कांहीं लग्नाच्या मुलाचा बाप दिसत नाहीं. पण म्हटलें, असेल. उडदांतहि एकादा पांढरा दाणा सांपडतो. मी कोण, कुठला, पुण्याचें हवापाणी कसें आहे इत्यादि चौकशी केल्यावर आमचें सहचहापान संपून सहधूम्रपान सुरू झालें. तेव्हां त्यांनीं मला जुन्नरास येण्याचें कारण विचारिलें.

“ आपला मुलगा आहे ना ? ”

“ होय. ”

“ मग त्याच्याकरतां आलों. ”

“ कां बरं ? त्याच्याकरतां येण्याचं कारण ? ”

“ काय हें वेड पांघरणं ? ” मीं त्यास उत्तर दिलें, “ कारण दुसरं काय असायचं ? माझी बहीण लग्नाची आहे. तिचं जमलं तर पहायचं. ”

" अरेरे ! मग विनाकारण आपल्याला हेलपाटा पडला. माझ्या मुलाचं लग्न यंदां करण्याचा विचार नाहीं. "

आला वळणावर ! " पुढल्या वर्षीं करायचं असलं तरी हरकत नाहीं. आपण कुंडली पहा, मुलगी पहा, हुंडापांडा ठरवा. मग वर्षभर थांबायला माझ्याकडून हरकत नाहीं. वाग्निश्चय करून टाकूं," मी म्हणालों.

" अंऽहं. पुढल्याहि वर्षीं लग्न करायचा विचार नाहीं. अजून मुलगा लहान आहे."

" केवढा आहे ? " मीं विचारिलें.

" मधू ! अरे मध्या ! जरा इकडे ये पाहूं ! " अशी वडिलांची हांक ऐकून आमच्या अभविष्यत् मेहुण्याची स्वारी शुकाचार्यांच्या पोषाखांत आली. मारवाड्यांच्या प्रमाणें त्याचे ते भुरके काकपक्ष त्याच्या काळ्या कानशिलांवर वाऱ्यानें डुलत होते. अंगावर बोटभर चिंधी नसली तरी दागिन्यांची रेलचेल होती. कानांत डूल, गळ्यांत कंठी, कमरेस चांदीचा कडदोरा, पायांत सांखळ्या, अशी मूर्ति एका हातांत चाबूक व दुसऱ्या हातांत दोरी धरून उंबऱ्यावरून धावत आली. त्या दोरीच्या टोंकास कांहीं तरी जड पदार्थ असावा व तो उंबऱ्याच्या पलीकडे राहिला असावा म्हणून मधोबांनीं त्या पदार्थास चाबूक मारून " हाइक् ! क् क्च्यॅ ! क्च्यॅ ! " असा हुकूम दिला, व दोरी खेंचली. दोरीच्या दुसऱ्या टोंकास एक लांकडी बैल होता व त्याच्या चार चक्ररूप पायांपैकीं एक निखळून गेलेला होता. बैल ओसरीवर येतांच मध्याच्या वडिलांनीं त्यास, " मध्या ! इकडे उभा रहा, हरामखोरा ! हे पाहुणे

आपली मुलगी तुला देत आहेत. करतोस का तिच्याशीं लगीन ?"
असें विचारिलें.

मध्या उत्तर देणार इतक्यांत त्याच्या नाकपुडीपुढें एक मोठा फुगा उत्पन्न झाला.

" चल नीघ गाढवा ! नाक नाहीं साफ ठेवतां येत न् लग्न कसलं करायचं तुझं ? " अशा शब्दांनीं वकीलसाहेबांनीं त्याला घालवून दिलें व मला म्हटलें, " हा पाहिला, मिस्टर जोग, माझा मुलगा ? आतां असं करा, तुमच्या बहिणीचं लग्न होऊन तिला जर मुलगी झाली तर आणखी पंधरावीस वर्षांनीं तुम्ही आपल्या भाचीकरतां हें स्थळ पहायला या. "

" कर्वे वकील ते आपणच नव्हे काय ? " मीं संतापून त्यांस विचारिलें. त्यांनीं सांगितलें, " मी कर्वे आहें पण कर्वे वकील नाहीं. तुम्हीं अगोदरच मी कोण याची चौकशी करायला पाहिजे होती. तुम्ही शहरचे लोक अगदीं हे असेच असतां. या समोरल्या बोळानीं वर जाऊन पिंपळाचं झाड दिसेल तिथें कावेच्या रंगाचा दरवाजा आहे. त्या वाड्यांत कर्वे वकील रहातात. तिथें तुम्ही जा."

मी फजितीनें चडफडत तेथून निघून समोरल्या बोळानें पिंपळाच्या झाडाजवळील कावेच्या रंगाच्या दरवाजाच्या वाड्यांत रहाणाऱ्या कर्वे वकिलांकडे गेलों. तेथें पहातों तर आमच्या राशीस बसलेले काठेवाडी गृहस्थ पानतंबाखू चघळीत गप्पा छाटीत बसले होते ! मला हवे होते ते कर्वे वकील आणि त्यांच्या शेजारीं एक म्हातारासा मनुष्य असे दोघे टोप्या घालून बसले होते. मी तेथें जातांच विजयी स्वरांत, " जयजय भाईसाहेब, आम्हीं हरीफाई

जितली ! " असे शब्द ऐकूं आले. ते ऐकून निराशेनें मी मट्-कन् खालीं बसून उद्गारलों, " ती कशी काय ? इथें पोंचून अर्धा तासय् पुरता यांना झाला नाहीं अन् इतक्यांत तुमची सोयरीक जमली कीं काय ? "

" अरे भाईसाहेब, मीं म्हटलं ना कीं कुदरती बनाव आहे म्हणून, त्याचा हा मासला. मी चार वर्षांत काठियावाड, गुजराथ, माळवा, वऱ्हाड, कोंकण आणखी देश फिरून फिरून दमलों; पण जिथें जमायचं होतं तेंच स्थळ नेमकं वगळलं ! शेवटीं इथें आलों. यांना सांगितलं कीं, बापजी, ही मुलगी आहे, हा मुलीचा बाप आहे, ही जन्मोत्री आणखी खर्चाचा वधारेंत वधारे अंदाज हा इतका ! सरळ वात. हेहि म्हणाले, 'हा मुलगा आहे, जिच्या हाताखालीं नांदायचं ती ही मुलाची आई, पत्रिका पहायचं कारण नाहीं, आणखी खर्चाचं मान वाढवायला नको. पांच रुपयांत लग्न लावा. आणखी बाकीची रकम मुलाच्या एल्एल्. बी.च्या खर्चाला द्या.' सरळ जबाब. जमली सोयरीक. सोय पाहील तो सोयरा अन् धाय धाय रडवील तो धायरा "

याप्रमाणें या काठेवाडी भाईसाहेबांनीं मला खो दिलाच. शेवटीं मी लगेच मोटारनें पुण्यास परत निघालों. मोटारींत दोन कोंकणस्थ वधूबाप आपापल्या वरयाद्या काढून आपल्याला नको असणारीं किंवा आपल्याशीं न पटणारीं स्थळें एकमेकांस सांगत होते. एका स्थळाबद्दल दुसऱ्यानें एकच स्थळ सांगावयाचें असा धारवाडी कांटा लावून काम चाललें होतें. मला त्यांच्या शेजारीं जागा मिळाली असल्यानें दोघांचें बोलणें स्पष्ट ऐकूं येत

होतें व त्यांच्या माहितीचा फायदा फुकटंफाकटी लाटण्याच्या हेतूनें आपल्या खिशांतून टांचणवही काढून त्यांचीं स्थळें टिपून घेऊं लागलों. तें लक्षांत येऊन त्यांतला एक गृहस्थ किंचित हासून पण रागानें मला म्हणतो, "मिस्टर, धिस् इज नॉट् फेअर. हें चांगलं नव्हे बरं कां ? तुम्हांला वाटलं तर आमच्याशीं सहकार्य करा. बट् प्रे डोन्ट इन्फ्रिंज ऑन अवर कॉपीराइट. आमच्या कॉपीराइटची चोरी करूं नका."

"ह्यः ह्यः !" खोटें हासून मी उत्तरलों, "मी कांहीं तुमचीं स्थळं उतरीत नाहीं. मी आपल्या दुकाणचा हिशोब लिहितों आहें. मला सोणाराला तुमचीं ब्राह्मनांचीं स्थळं काय चाटायचीं आहेत ? खोटं वाटत असलं तर हें बघा." मीं आपली टांचणवही दाखविली; परंतु माझें मोडी अक्षर असलें दिव्य कीं, स्वयमपि लिखितं स्वयं न वाचयति, अशी माझी स्थिति होई. तेथें दुसऱ्याचा काय पाड लागणार ! त्यांनीं आपलें काम मोटारतळ येईपर्यंत चालविलें. त्यांच्या स्थळांतील दहा पांच मला बरीं वाटलीं. ही यादी माझी शेवटचीच होणार होती, कारण तींत आमचे भावी मेहुणे रा. आत्माराम रघुनाथ साने यांचें नांव होतें. रा. साने हे मुंबईस जनरलच्या ऑफिसांत ८० (अक्षरीं ऐशीं) रुपये पगारावर क्लार्क होते. त्यांचीं वडीलमातुश्री पनवेलीस होतीं. स्वतःचें घर, दहावीस माड, इतर कांहीं झाडें, रहाट, रहाटास जुंपण्याचा रेडा वगैरे स्थावर जंगम इष्टेट बरी होती. या सावजावर हल्ला चढविण्याचा मीं बेत केला.



सेकंड क्लासच्या उतारूचें कल्पनाचित्र.

# माझा सेकंड क्लासनें प्रवास.

सेकंड क्लासचा प्रवास हें माझ्या वाचकांपैकीं बहुजनां-प्रमाणें मलाहि सुखस्वप्न वाटत होतें. त्यांतल्या त्यांत पुण्याच्या रहिवाशाला-सामान्य रहिवाशाला-थर्ड क्लासचें तिकीट काढून गाडींत उभें राहण्याइतकी जागा पटकावीपर्यंत जे श्रम करावे लागतात त्यांचा विचार करतां सेकंड क्लासचा प्रवास म्हणजे एक सुखसोहाळा वाटावा यांत नवल नाहीं. सहज डबा झाडतां झाडतां सेकंड क्लासच्या गादीवर टेकणाऱ्या पोर्टराच्या वैभवाचा देखील मला हेवा वाटे. एकदा मीं पुण्याहून भांबुर्ड्याचें सेकंड क्लासचें तिकीट काढिलें व आंत बसण्यास डब्यापाशीं गेलों, परंतु डब्यांत एक गौरकाय उतारू आपल्या पत्नीसह बसला होता. मी आंत शिरतांच तो कायसें ओरडला. मीं त्याच्या ओरडण्याला मुळींच भ्यालों नाहीं; परंतु नवरा बायकोच्या एकांतांत आपण कशाला व्यत्यय आणा असा विचार करून नेहमींच्या थर्ड क्लासांत जाऊन बसलों.

सेकंडचा प्रवास ( ' क्लास ' हा शब्द वगळण्याची फॅशन आहे ) हें एक सौख्याचें उपमान मला वाटूं लागलें. ' तेचि पुरुष भाग्याचे ' हा चरण आठवला कीं, एका बाजूस ओव्हरकोट टाकून दिला आहे, त्याच्यावर हॅट पडली आहे, टाइमटेबलची प्रत अस्ताव्यस्त ठेवून दिली आहे आणि गादीनें मढविलेल्या ( शृंगारलेल्या या अर्थी हा अशुभसूचक शब्द मराठींत कसा आला याची चिकित्सा करणारा कोणी आहे ? ) एका बाकावर

बसून समोरच्या बाकावर तंगड्या टाकून लठ्ठ चिरूट ओढीत इंग्रजी वर्तमानपत्र वाचीत आहे अशा एखाद्या आंग्लवेषधारी पीन-तनु घनश्मश्रु कृष्णवर्ण पुरुषाचें चित्र माझ्या कल्पनाचक्षूपुढें उभें राही. उलट तो थर्डक्लासच्या उतारूचा प्रवास म्हणजे यमयातनांची पूर्वतयारीच वाटते. आधीं तिकिटांची खिडकी उघडण्याची वाट पाहाणाऱ्या लोकांत नंबर लावणें, नंतर आपलें तिकीट काढण्यापूर्वी दांडीच्या बाहेरून आपल्या हातांत पैसे देऊन, ' मिस्टर प्लीज, आम्हांला तळेगांवचीं दोन तिकिटं द्या, थँक यू, ' म्हणणाऱ्या ऐतखाऊंचीं तिकिटें घेणें, नंतर आपलें तिकीट घेतांना ' तुम्हांला तिकीट मिळालं आहे, पुढें चला ' असें सांगितलें जाऊन मिळालेला नंबर घालवून स्वतःच्या तिकिटाकरितां पुनः लाइनींत शेवटीं नंबर लावून आपलें तिकीट घेणें; मग धांवत धांवत प्लॅटफॉर्मच्या प्रवेशद्वाराशीं गाडी सुटण्याची वेळ होईपर्यंत वाट पाहून प्रवेशद्वार खोलतांच चेंगराचेंगरींतून आंत फलाट्यावर जाणें व शेवटीं चिकार भरलेल्या डब्यांत उभें राहण्यास जागा मिळविणें या यातना कोठें; व तांगा थेट तिकीट ऑफिसपाशीं नेणें, त्यांतून उतरून ' रातदिन खुला राहाणाऱ्या ' तिकीट- खिडकीशीं जाऊन, ' मास्टर, प्लीज् वन् टिकेट फॉर घोरपरी ( किंवा भांबुर्डा, कर्की, हरपसर )' असें म्हणून तिकीट घेऊन सदा मुक्तद्वार असलेल्या, ' वे इन् फॉर १ अॅण्ड २ क्लास पॅसेंजर्स'च्या वाटेनें फलाट्यावर जाऊन आपल्या डब्यांतील गादीदार बाकावर हातपाय ताणून देणें हें परमसौख्य कोठें ?

पुन्हां एकदा सदर्न मराठा रेल्वेच्या सेकंड क्लासची व्यवस्था

पाहावी म्हणून मीं घोरपडीचें तिकीट काढलें; आणि मोठ्या ऐटीनें गाडी सुटण्याच्या वेळेच्या आधीं पांच मिनिटें डब्यांत शिरलों. डब्यांतील खणांत दोनच बाकें होतीं. दोन्हीं रिकामीं होतीं. माझा आनंद सबंध डब्यांत मावेना, मग गगनाची काय कथा ? माझ्या ध्येयभूत पुरुषाप्रमाणें समोरच्या बाकावर तंगड्या टाकून मी चैनींत बसलों. गाडी सुटण्याची घंटा झाली. वेळ होऊन दहा मिनिटें झालीं तेव्हां आणखी एक घंटा झाली. तरी माझ्या डब्यांत कोणी येईना. सर्व डब्याचा मी राजा आहें असें मला वाटूं लागलें; तोंच तिकीटकलेक्टर दाराशीं आला व आंत डोकावून पुनः मागें पाहात ओरडला, ' अहो, इकडे या. इथं जागा आहे. ' त्याबरोबर जरीचा लाल रुमालवाला एक बुवा तेथें आला व ' हं चला, गंगे, रंगे, चिंगे, इकडे या, शिरा आंत. खिडकीकरतां भांडूं नका–हं श्रीनिवास चल ये. चल ग बैस, " असें बोलत त्यानें एका खणांत चौदा माणसें कोंबलीं, वरच्या फळ्या काढून सामान त्यांवर ठेविलें व शेवटीं एक रुपया काढून टी. सी. ला दिला. मग आपण डब्यांत शिरून मला म्हणाला, ' काय हो, कुठें जायचं ? धारवाडला ? ह्या रेल्वेंत ही सोय फार चांगली आहे. थर्डचीं तिकिटं काढावीं न् रुपया दोन रुपयांत सेकंडनीं जावं थेट बेंगळुराला " ! मी त्या गर्दीला घाबरून मुकाट्यानें खालीं उतरलों व आपल्या दैवांत दुसऱ्या वर्गाचा प्रवास नाहीं अशी स्वतःची समजूत करून घेतली.

यानंतर इ. स. नं. १९२१ सालीं रेल्वेनें नाताळाच्या सुट्टींत पहिल्या व दुसऱ्या वर्गाचीं सवलतीचीं तिकिटें काढलीं, त्यांची

मुदत ता. १५ जानेवारी रोजीं दुपारीं बारा वाजतां संपणार होती. आमचे ती. नानूमामा मुंबईहून तसलें तिकीट घेऊन पुण्यास आले होते, परंतु ता. १५ जानेवारीला त्यांना कांहीं काम निघाल्यानें त्यांना त्या दिवशीं परत जातां येईना. मला सेकंडनें जाण्याची ही सोनेरी संधि वाया जाऊं द्यावयाची नव्हती, म्हणून मीं नानूमामां-जवळ तिकीट मागितलें व त्यांनीं तें खुषीनें दिलें. याबद्दल त्यांचे जाहीर रीतीनें आभार मानण्याची ही संधि फुकट दवडीत नाहीं. असो. मात्र ता. १५ रोजीं सकाळीं ८ वाजतां मला तें तिकीट मिळाल्यानें त्याचा पुरता फायदा घेणें शक्य राहिलें नाहीं. नवा-नंतरची गाडी म्हणजे १०-३५ ची व १२ वाजतां ती वड-गांवला पोंचत असल्यानें माझ्या प्रवासाची इतिश्री तेथेंच करणें अवश्य होतें; कारण ता. १५ स दुपारीं १२ नंतर तिकीट चालणार नव्हतें.

दुधाची तहान ताकावर भागवावी त्याप्रमाणें पुणें ते मुंब-ईच्या प्रवासाची हौस पुणें ते वडगांववर फेडण्यास मी तयार झालों. पण सेकंडचा प्रवास असल्यानें त्या वर्गास योग्य इतमाम पाहिजे म्हणून मी नानूमामांची कातडी ट्रंक घेऊन तिच्यावर लेबल चिकटवून त्यावर, “ सी. व्ही. जोग, पूना ” अशीं अक्षरें इंग्रजींत फडकाविलीं. मग आपल्या श्वशुरांचा ओव्हरकोट आणिला, त्यांच्याच घरचें आदल्या वर्षींचें रेल्वेचें वेळापत्रक घेतलें, दोन दिवसांपूर्वीचा एक टाइम्सचा अंक घेतला आणि एक फुटकें थर्मास फ्लास्क घेतलें—बाहेरून मात्र तें फुटलेलें ओळखूं येत नव्हतें—गुंड्याभाऊनें क्रिकेट खेळतांना घालण्याकरितां हॅट आणली

होती ती डोक्याला बळेंबळें घातली, शेजाऱ्याचें होल्डऑल उसनें घेतलें आणि सगळा जामानिमा करून दहा वाजतां तांग्यानें स्टेशनवर निघालों. सेकंडनें जाणारे लोक काय घाटी लोकांप्रमाणें तास तास आधीं निघतात ? ‘ सेकंड क्लासच्या एन्ट्रन्सशीं घे ’ असें जातांना दहा वेळां तांगेवाल्यास बजाविलें.

गाडी सुटण्याला दहा मिनिटें असतां तांगा स्टेशनवर पोंचला चटकन् हमालानें बॅग उचलली, हमालीचे पैसे ठरविण्याकरितां हुजत घातली नाहीं. मी लगेच फलाट्यावर गेलों तों गाडी सुटण्याची तयारी होती. मी सेकंड क्लासच्या एका स्वतंत्र खणांत बसलों. पलीकडील बाकावर एक शेरवानी–पटका–विभूषित गृहस्थ हातांत कागद घेऊन त्यावरील मजकूर घोकीत बसला होता. मी अलीकडील बाकावर बसलों, हमालाच्या हातावर चवली ठेवून त्याचा रामराम घेतला, आणि बरोबर आणलेला टाइम्स उघडून वाचूं लागलों.

फार उकडूं लागलें बोवा ! असें म्हणून मीं कोट खुंटीस लावला आणि डब्यांतील विजेचा पंखा सुरू केला. गाडी चालू झाली तेव्हां बाहेरचा वारा येऊं लागल्याने पंखा बंद केला व बाकावर हातपाय लांब करून पडलों. जी. आय. पी. च्या डब्यांत हातपाय लांब करावयास मिळणें हें त्या काळीं केवढ्या भाग्याचें लक्षण होतें ! पण पडून कंटाळल्यानें पुनः उठून पंखा सुरू केला व डब्याच्या पाणघरांत गेलों. अहाहा ! काय तेथला चकचकाट ? तो आरसा, तो सोपस्टॅण्ड, तें तोंड धुण्याचें तस्त–प्रथम तर आरसा पळविण्याचेंच माझ्या

मनांत आलें; पण आरशाचे स्क्रू बराच वेळ फिरवून निराश झाल्यावर विचार केला कीं, सार्वजनिक मालमत्तेचा असा अपहार करणें हें दुसऱ्या वर्गांत बसणाऱ्या सद्गृहस्थास शोभण्यासारखें नाहीं; आणि तो यत्न मीं सोडून दिला. तोंड स्वच्छ धुऊन आरशांत पाहून मी आलों तों जरा थंडी वाजूं लागली म्हणून पंखा बंद केला.

इतक्यांत आकाशांतील एका ढगानें सूर्याला आपल्या आड करून जरा अंधार पाडला म्हणून मीं खटका ओढून विजेचा दिवा लाविला आणि वरचा बर्थ पाडून त्यावर विश्रांतीसाठीं पडलों.

कांहीं मिनिटांनीं खालीं उतरून बर्थ मिटला व खिडकीबाहेर डोकावून पाहिलें तों सूर्य ढगांतून डोकें काढून पृथ्वीवर ऊन्ह पाडीत होता. लगेच मीं खटका दाबून दिवा विझविला.

बराच वेळ लायनीच्या दक्षिणेकडील सृष्टिसौंदर्य पाहून माझ्या डोळ्यांना शीण आला होता, तो घालविण्याकरितां डब्याच्या उजव्या बाजूस मी बसलों.

इतका वेळपर्यंत माझा उतारूबांधव कागदावरील मजकूर वाचतां वाचतां आरशाच्या भिंगांच्या कडांवरून तिरक्या नजरेनें या माझ्या लीला पहात होता. मी बसल्यावर तो मला म्हणाला, ‘ काय रावसाहेब, कुठं जायचं आहे ? ’ मीं वडगांव सांगितल्यावर तो पुढें म्हणाला, ‘ वाः ! मलाबी तिथंच जायचं आहे. तुम्ही शेकिन कल्लासनीं पहिल्यांदाच जातां वाटतं ? ’

‘ कशावरून ? ’

‘ आतां हें दिसतंच नव्हं का ? दिवा लावतां, मालवतां, पंखा

फिरवतां न् बंद करतां, दहादा मोरीच्या खोलींत जाऊन तोंड साफ करतां, एकदा ह्या खिडकींत बसतां तर एकदा त्या—ह्या सगल्या-वरून मीं ओलखलं कीं रावसाहेबांनीं पहिल्यांदाच शेकिन क्ला-सांत पाय टाकला असेल. द्या टाली, करा कबूल!'

'छे: मग अगदींच चुकलां तुम्ही. मी क्यारेज इन्स्पेक्टर आहें. डब्यांचीं फिटिंग्ज बरोबर आहेत कीं नाहींत तें पाहात होतों.' मीं आपली बाजू सावरण्यासाठीं लोणकढी ठेवून दिली.

'अन् हा एकच कंपार्ट इनिस्पेक्शन करायला सांपडला होय तुम्हांला? पुण्याहून निघून आतां हें शेलारवाडीच ठेशन पण मागं राह्यलं! बरं तें जाऊं द्या. तुम्ही वडगांवला कशाला जातां आहां!'

कशाला जातों आहे? खरेंच, रिकाम्या चौकश्या करणाऱ्या लोकांच्या तोंडावर टाकावयाला आपल्या वडगांवला जाण्याच्या कारणाचा तुकडा मीं अद्याप तयार करून ठेविला नव्हता. वडगां-वला कोर्ट आहे हें मला भूगोल पाठ करतांना ठाऊक झालें होतें. त्या माहितीचा उपयोग करून मीं म्हटलें, 'जरा कोर्टांत काम आहे.'

'वा: रावसाहेब, आज कोर्टाला तर सुट्टी आहे. आन् क्यारेज इनिस्पेक्टरचं कोर्टांत काय काम आहे?'

या गृहस्थानें माझा तर पिच्छाच पुरवला. बाकी मी म्हणजे कमी वस्ताद आहें असें समजूं नका. माझें उत्तर तयार होतें. 'एका उतारूनें डब्याचीं फिटिंग्ज खराब केलीं त्याच्यावर खटला होता; पण तुम्ही म्हणतां कोर्ट बंद आहे! ठीक आहे. दुसऱ्या गाडीनं पुण्यास परत जाईन.'

' हें पाहा रावसाहेब, माझ्याशीं असा आंधळ्या कोशिंबि-रीचा खेळ खेळूं नका. माझं जरा काम आहे. तुम्ही मदत कराल तर तुमचे फार उपकार होतील. मला वडगांवला नव्या शाळेचा फौंडेशन शेरिमणी करायला जायचं आहे, तेव्हां तुम्ही जर मला मदत कराल—'

' फाउंडेशन दगड बसविण्यांत मदत म्हणजे काय ? म्हणजे हमाली करायला लावणार कीं काय ? उंब्रजच्या लोकांना एक खूप मोठा दगड चौथऱ्यावर चढवायाचा होता, पण चारसहा जणांना-सुद्धां तो उचलेना, तेव्हां त्यांनीं काय युक्ति केली कीं, कऱ्हाडचा पहिलवान्–तो गब्रू–त्याला बोलावलं फाउंडेशन सेरीमनी करायला आणखी त्याच्याकडून आयताच तो दगड उचलून घेतला झालं ! तसं तर नाहीं ना कांहीं ? ' मी म्हणालों.

उंब्रजकरांच्या सुपीक डोक्याचें स्मितपूर्वक कौतुक करून त्या गृहस्थानें ' हें पाहा माझं नांव ' असें म्हणून आपलें कार्ड मला

**खानबहादुर हैबतखान पठाण**
चेअरमन, स्कूलबोर्ड, पुणें.

दाखविलें, त्यावर अशीं इंग्रजींत अक्षरें होतीं. खानबहादुर म्हणाले, ' पण सगळं घोडं पेंड खातं कीं मला भासण करतां येत नाहीं. हीं पहा कागदं, दहा वेल घोकलीं पण लक्षांत राहात नाहीं. आतां हा कागद धरा हातांत न् माझं बरोबर येतं का पाहा अं. सभ्य भागिनींनो–अं हं तसं नव्हे–मेहेरबान मामलेदारसाहेब आणि सभ्य गृहस्थ हो ! ( म्हणजे मामलेदार असभ्य आहे वाटतं ! ) तुम्हीं

हा दगडाचा पाया बसवण्याकरितां मला बोलावलं हे माझे तुमच्या-वर अनंत उपकार आहेत. आपल्या या मावळ प्रांतांतल्या तरुण पिढ्याला मृतविद्या पाजण्या—'

'मृतविद्या का विद्यामृत ? अन् कोणाचे कोणावर उपकार आहेत ? खानबहादुर, हें नाहीं चालायचं बरं ! तुम्हीं आपलं वाचून दाखवा ना तें ? '

'आतां वाचूं काय कपाळ ? हें पाहा रावसाहेब, तुमचं नांव काय ? '

'नांव चिमणराव विठ्ठल जोग. '

'हें पाहा चिमणराव, आतां तुम्हीच व्हा खानबहादुर पठाण अन् पायाचा समारंभ करा, भासण करा न् त्याबद्दल मोबदला म्हणून माझ्या खर्चानं शेकिन् कल्लासनीं पुण्याला परत जा. वर्तमानपत्रांत रिपोट येतील ते माझंच नांव घालून येतील. तेव्हां माझंहि फार नुकसान नाहीं. आहे कबूल ? '

परत जातांनाहि सेकंड क्लास ? वाः 'अजि सुदीन उगवला' असेंच म्हटलें पाहिजे. मीं खा. ब. च्या विनंतीस रुकार देऊन त्यांचा निळा फेटा मागून घेतला आणि पाणघरांत जाऊन आरशा-पुढें उभा राहून नीट बांधला. पुनः चुळाबिळा टाकून बाहेर आलों. माझी हॅट खा. ब. नीं घातली. तळेगांवचें स्टेशन आलें. तेथें पांचसात जण चुकीनें आमच्या डब्यांत शिरावयास आले. 'अरे ए घोंगड्यांनो, इथं काय आहे तुमचं ? सेकंड क्लासचा डबा आहे समजत नाहीं का ? पुढं जा पुष्कळ जागा आहे,' असें मीं त्यांना दरडावून घालवून लाविलें. पूर्वी पहिल्या दोन वर्गांचे डबे पांढरे रंगवीत असत, त्यामुळें तिसऱ्या वर्गाचे अडाणी उतारू चुकून

वरच्या वर्गाच्या वाटेस जात नसत. तेव्हां सेकंड व फर्स्ट उतारूनीं तक्रार केली कीं, ' आम्हांला गांवढळ लोकांच्या अंगावर ओरड-ण्याची संधि मिळत नाहीं यामुळें आमची फार गैरसोय होते. ' रेल्वे अधिकाऱ्यांनींहि तक्रार केली कीं, ' गांवढळ लोकांना आपला वर्ग बिनचूक ओळखतां येतो व ते चुकीनें वरच्या वर्गांत बसत नाहींत. अर्थात् त्यांच्यापासून पैसे उकळण्याचा आमचा मार्ग बंद होतो ' अशा तक्रारींमुळें सर्व वर्गाच्या डब्यांस एकच रंग लावण्याची पद्धत रेल्वेबोर्डानें अमलांत आणिली. असें असून आमचे लोक कुरकुर करतात कीं, लोकांच्या तक्रारीकडे सरकार दुर्लक्ष करतें ! या कृतघ्नपणाला काय म्हणावें ? शिवाय सर्व डब्यांस एकच रंग लाविल्यानें वर्णभेदाचा जो सरकारवर नेहमीं आरोप करण्यांत येतो त्यालाहि जागा राहात नाहीं हें वेगळेंच. तळेगांवपासून वडगांव पांच मिनिटांच्या रस्त्यावर आहे. तेवढ्या वेळांत सेकंड क्लासचे सगळे सोहाळे भागून घ्यावे असो विचार करून मीं दिवा लावला, पंखा सुरू केला, पाणघरांत जाऊन आलों, १ नंब-रचा बर्थ पाडून त्यावर जरा पडलों, पडल्या पडल्या २ नंबरचा बर्थ पाडून त्याच्यावर लोळत गेलों, मग खालीं उतरलों. एका खिडकीचें तारेच्या जाळीचें, दुसरीचें काळसर काचेचें व तिसरीचें वेनिशी पट्ट्यांचें दार बंद केलें, दिवा बंद केला, पंखा बंद केला. इतक्यांत वडगांव आलें ( म्हणजे गाडी वडगांवला आली, वडगांव जागच्या जागींच होतें ).

आम्ही खालीं उतरलों. माझें नांव असलेली बॅग खा. ब. नीं घेतली. मी हैबतखान पठाण झालों. स्टेशनाच्या प्लॅटफार्मवर एक

जाजम घातलें होतें व दोन खुर्च्या त्यावर ठेविल्या होत्या. स्टेशनवर वीसएक प्रतिष्ठित गांवकरी आणि दहाबारा मुलें आमच्या स्वागतार्थ उभीं होतीं. आम्हीं उतरतांच मला लोकांनीं विचारलें, ' पठाण-साहेब आपणच ना ? ' मीं मंदस्मित करून हुंकार दिला. मामले-दारसाहेबांनीं माझ्या गळ्यांत हार घातला व हातांत गुच्छ दिला. त्याला नसलेला वास हुंगीत मी खुर्चीवर बसलों, मामलेदारसाहेब दुसऱ्या खुर्चीवर बसले. खरे हैबतखान तात्पुरते माझे सेक्रेटरी सी. व्ही. जोग झाले. मुलांनीं भोंवतीं जमून स्वागतपर पद्य म्हटलें:---

(चाल—ता त त, त त त, ताऽत ता त त)

**स्वागत तुजसो धन्य दिनकरा।**
**सोडुनि आमुचेसाठीं स्वनगरा।**
**धावत येसी वटग्रामा।**
**अभिरामा।**
**सुखधाऽऽमा ॥ स्वागत० ॥**
**भक्तांसाठीं धावत जैसा।**
**श्रीपति जाई बहुधा तैसा।**
**ग्रामवासि जनां क्षणि ताराया।**
**येसि पुण्याहुनि मारुतितनया।**
**भराया।**
**पाया।**
**स्थळीं या ॥ येसि पुण्या० ॥**
**गायनमास्तर विनवी पाया।**
**अर्ज तयाचा जाउं न वाया।**
**प्रमोशना।**
**या जना।**
**द्या पुन्हा।**
**परि नच रागा या ॥ येसि पुण्या० ॥**

गायन संपल्यावर मी मुलांच्या आवाजाची प्रसंसा करीत म्हणालों, 'वाः फारच सुरेल आहे बुवा गाणं. पण हा मारुतितनय दिनकर कोण?'




स्वागत तुजसी धन्य दिनकरा ।।

गायनमास्तर उभे राहून हात जोडून म्हणाले, ' साहेब ! ते आपले दिनकर मारुति देसाई, असिस्टंट डेप्युटी एज्युकेशनल इनस्पेक्टर साहेबांच्या पर्सनल असिस्टंटचे हेड क्लार्क. '

' अन् मग आमच्या स्वागतपर पदांत त्यांचं नांव कशाला? '

' चुकून नांव बदलायचं राह्यलं साहेब. कालच देसाई येऊन गेले, त्यांचं नांव मुलांच्या तोंडांत बसलं; नांव बदलून मुलांना तालीम द्यायला फुरसत झाली नाहीं, साहेब. बाकी पद कालचंच आहे,' गायनमास्तर म्हणाले.

' बरं आहे, आतां खानबहादुर, आमच्या घरीं फराळ करून दगड बसवायला चलायचं,' मामलेदारांनीं विनंती केली. मीं थोडें चंद्रबळ आणून रुकार दिला आणि आपल्या सेक्रेटरी-सह त्यांच्या घरीं गेलों. भोजन झाल्यावर जरा सत्रंजीवर टेकतों न टेकतों तोंच हेडमास्तर, पाटील, गांवचे व शेजारच्या तळेगांव शहरचे शिष्ट लोक मला अद्याप न लागलेली झोंप मोडण्यास आले. मीं सर्वांचें स्वागत केलें पुण्याचें व वडगांवचें हवापाणी, तळेगांवच्या संस्था, नवीन मान्टेग्यू चेम्सफर्ड सुधारणा, शहरची रहाणी विरुद्ध खेडेगांवची रहाणी, या विषयांवर आमचें बराच वेळ संभाषण झालें व ' इंद्रायणीसमाचार ' पत्राच्या बातमीपत्रावरून नंतर मला कळून आलें कीं, मी ( म्हणजे हैबतखान पठाण ) फार मन-मिळाऊ, उल्लसित, आणि विनोदी गृहस्थास शोभण्यासारखें बोललों.

दुपारीं चार वाजतां पायाभरणी समारंभास गेलों. जातांना हेडमास्तरांच्या घरीं चहापान व चिवडाखान झालें. समारंभाची हकी-

कत स्वतःच्या शब्दांत न देतां परिशिष्ट ‘ अ ’ रूपानें इंद्रायणी-समाचाराच्या अंकाचें बातमीपत्र उद्धृत करून त्याच्या शब्दांत देत आहें. समारंभ संपल्यावर आम्ही परत जाण्याकरितां स्टेशन-वर आलों. बरोबर माझे सेक्रेटरी ‘ सी. व्ही. जोग ’ आणि गांवांतील बरीच मंडळी होती.

‘ मिस्टर जोग, सेकंडचं तिकीट माझ्यासाठीं घ्या न् सर्व्हं-टचं घ्या तुमच्यासाठीं,’ मीं हैबतखानांस फर्माविलें.

स्टेशनमास्तर जवळच होते. ते माझा हुकूम ऐकून म्हणाले, ‘ पण ही संध्याकाळची इंटरथर्ड एक्स्प्रेस आहे, हिला सेकंडचा डबा नसतो खानसाहेब.’ हैबतखानांच्या डोळ्यांत आनंदाचें तेज चमकूं लागलें. मला सेकंडचें भाडें देण्याचें त्यांनीं कबूल केलें होतें त्यांतून सुटण्याची संधि त्यांना आली.

‘ हरकत नाहीं, पूना मेलनीं जाऊं. हिच्या पाठोपाठ आर्ध्या तासांत ती येईलच, ’ मीं म्हटलें.

‘ ती इथें थांबत नाहीं. ’ मास्तर म्हणाले. हैबतखान ओंठ दाबून हासूं लागले.

‘ या गाडीनं तळेगांवपर्यंत जाऊं न् तिथं बदलूं, ’ मीं सुचविलें.

‘ तळेगांवचा मेलचा थांबा नुकताच काढून टाकला, ’ मास्तर म्हणाले.

‘ खडकीला बदलूं. ’ मीं हट्ट चालू ठेविला.

‘ तें नाहीं कांहीं जमायचं. खडकी ते पूनाचे उतारू मेल-मध्यें घ्यायचे नाहींत असा स्पष्ट नियम आहे, ’ मास्तरांनीं सांगि-

तलें. मी हरलों. हैबतखानांच्या तोंडावर नवीन पद्धतीचें ‘ सैतानी हास्य ’ विराजलें. त्यांनीं इंटरचीं दोन तिकिटें काढिलीं. आम्ही इंटरमध्यें बसलों. वाटेनें हैबतखानांचा फेटा मोठ्या नाखुशीनें मीं परत केला. हारतुऱ्यांच्या बाबतींत माझ्याशीं तंटा करण्याचा त्यांचा बेत होता, परंतु मोठ्यानें तंटा केल्यास आपलें बेंड फुटेल म्हणून त्यांनीं तो बदलून फक्त एका गजऱ्यावर समाधान मानून घेतलें. पाया भरण्यासाठीं मला चांदीची करणी मिळाली होती, ती रीती-प्रमाणें मीं जवळ ठेविली होती, ती मिळविण्याकारितां खानसाहे-बांनीं खूप धडपड केली, परंतु त्यांना ती पचली नाहीं. हल्लीं ती मजजवळच आहे व तिच्यावरील मुलामा जागोजाग उडाला आहे. मुलांना धंदेशिक्षण देण्याची पाळी आल्यास करणी विकत घ्यावयास नको.

दोनतीन दिवसांनीं वेगवेगळ्या इंग्रजी व मराठी वर्तमानपत्रांत खानबहादुर पठाणसाहेब यांच्या अध्यक्षतेखालीं भरलेल्या वडगांवच्या शाळेच्या पायाभरणीची बातमी झळकली. तींत खानबहादुरांचें भाषण, त्यांचा गमती स्वभाव इत्यादिकांची स्तुति होती. त्यांतील इंद्रायणीसमाचाराचा खास बातमीदार काय म्हणतो तें पहा जरा:—

## परिशिष्ट ( अ )

वडगांव येथील नवीन मराठी शाळेच्या इमारतीची कोनशिला बसविण्याचा समारंभ पुणें जिल्हा स्कूल बोर्डाचे अध्यक्ष खा. ब. हैबतखान यांच्या हस्तें मोठ्या थाटानें पार पडला. समारंभास वडगांवच्या स्थानिक प्रतिष्ठित गृहस्थांप्रमाणेंच तळेगांव, खडकाळें, चाकण इत्यादि गांवांतील प्रतिष्ठित मंडळी हजर होती. अध्यक्षसा-

हेबांची स्वारी मंडपांत येतांच शाळेंतील कुमार कोंडदेव, कुमारी म्हाळसाबाळा इत्यादि मुलामुलींचें स्वागतपर गायन झालें. तें कवि अनामक ( खंडेराव लोखंडे ) यांनीं केलेलें पद येथें देत आहों:-

राग-भैरवी.

**मंगलदिन आला ।**
**आजी वटग्रामाला**
**आजी मंगलदिन आला ॥**

यांतील आजी हा शब्द वारंवार येऊं लागला तेव्हां खान-बहादुरांनीं मुलांना विचारलें, " काय रे आजी कोणाला म्हणतां?" तेव्हां हशा पिकला. तो शांत झाल्यावर पुनः गायन चालू झालें.

**साधुसन्त येति घरा ।**
**तोचि दीवाळीऽ दसरा ।**
**साधुबोल नच फोल ।**
**ठरती, येति प्रत्यया ॥**

**पठाण हैबत-खान पाजी ।**
**पठाण हैबत-खान पाजी ।**
**अहो पाजी किति तरी पाऽऽजी ।**

हें शेवटचें कडवें चालू असतां खुद्द खानबहादुरांस फार गंमत वाटून त्यांनीं टाळ्या वाजविल्या. परंतु त्यांचे सेक्रेटरी रा. जोग यांस फार राग येऊन ते मध्येंच उठून ओरडले, ' काय रे कारट्यांनो, पाजी कोणाला म्हणतां ? ' तेव्हां खानबहादुरांनीं मनाचा समतोलपणा बिघडूं न देतां त्यांस धरून खालीं बसविलें व गाणं पुनः चालू झालें.

**अहो किति तरि पाजी**
**विद्यामृत सगळ्यांला ।**
**आजी मंगलदिन आला ॥**

या पदांतील चमत्कृतिजनक शब्दयोजनेबद्दल अध्यक्षसाहेबांनीं कवीस शाबासकी दिली; आणि टाळ्यांच्या गजरांत गायन पूर्ण झालें.

नंतर रा. रा. माधवराव कोडगे यांनीं अध्यक्षांच्या निवडणुकीची सूचना दिली. ते म्हणाले, 'समत्स्य बांधव हो ! आजच्या या आपल्या शाळेच्या इमारतीचा पाया भरायला हैबतखान पठाण यांना आपण बोलावलें. त्यांनींहि बोलवितांक्षणीं हो म्हटलें. आणि ते पदरचे पैसे खर्चून इथपावत आले. आतां दुसऱ्या कोणाला अध्यष्क व्हा म्हटलें तर त्यांना आवडणार नाहीं, त्यांचा हिरमोड होईल म्हणून त्यांनीं अध्यष्क व्हावें अशी माझी सूचना आहे.'

रा. रा. गोविंदपंत रेमेडोके म्हणाले. 'कोडगेसाहेबांच्या ह्याला माझं हें आहे.' ( हशा ).

सूचनेला पुष्टि देण्यास हेडमास्तर उठले. ते म्हणाले, 'हे समस्तमावलप्रान्तस्थ कृषीवलपट्टवान्सावकारश्रेष्ठी आदिकरून सज्जनवृंद हो ! या दीन चातकाच्या आर्तरवानें द्रवून तुम्ही चंद्राप्रमाणें या मंडपांत उदय पावलेत, या चक्रवाकाच्या आमंत्रणाचा आदर करून भगवान् सहस्ररश्मिप्रमाणें या शाळेच्या भावी भव्य भपकेदार कोनशिला बसविण्याच्या शुभप्रसंगीं विद्यमान राहिलेत, इंद्रायणीथडीच्या या इटांच्या इमारतीचा इमला उठविण्यासाठीं इंद्राप्रमाणें नटून सादर झालेत हे तुमचे महदुपकार आहेत. ज्यांच्या ग्रॅन्टमुळें ही इमारत

उभारली जात आहे ते स्कूलबोर्डाचे अध्यक्षच या ठिकाणीं पाया घालणार आहेत, हा मणिकांचन योग आहे. गुळाचा नैवेद्य आणि गुळाचा गणपति ! गंगापूजन गंगेच्याच जलानें करावें त्याचप्रमाणें हा प्रकार आहे. त्यांनीं अध्यक्षस्थान स्वीकारावें अशा सूचनेला माझा टेकू आहे. '

यानंतर जरा गंमत झाली. चाकणचे विठूशेट विसरे हे बोलावयास उठले. ते म्हणाले, ' सद्गृहस्थ हो ! मी पहिल्यांदा इथें आलों तेव्हां मला बोलावं लागेल असं मला वाटलं नव्हतं. पण लोकागृहावरून चार शब्द बोलावे लागत आहेत. मीं भाशणाची तैयारी केली नाहीं. हं:--हम्--खोक् खोक--' असें म्हणून शेटजी बराच वेळ थांबले. नंतर त्यांनीं हळूच खिशांत हात घालून, लिहून आणलेला कागद बाहेर काढून तो वाचण्यास आरंभ केला. ' हं. चा--र--शब्द--नाहीं तें झालं. हं. आपल्या या मावळ तालुक्यांत....' परंतु शेटजींच्या बोलण्यांतल्या व कागद बाहेर काढण्याच्या कृतींतल्या विसंगतपणानें इतका हशा पिकला कीं, त्यांचें वाचणें कोणासहि ऐकू आलें नाहीं. मात्र आपण फारच विनोदी भाषण करीत आहों अशा समजुतीनें शेटजींचें वाचन आवेशानें चाललें होतें.

मग अध्यक्षसाहेब टाळ्यांच्या गजरांत बोलावयास उठले. ते म्हणाले, " वटग्रामस्थ सज्जन हो ! त्याचप्रमाणें दुर्जन हो ! रागावूं नका, इतक्या मोठ्या समाजांत कोणीहि दुर्जन नसेल असें शक्य नाहीं. नाहीं तर हीं कोर्टें कशीं चाललीं असतीं ? मी सगळ्यांना उद्देशून बोलत आहें, नुस्त्या सज्जनांना नाहीं. मला जेव्हां आपल्याकडचें पायाभरणीचें आमंत्रण आलें तेव्हां मीं साशंक वृत्तीनेंच

त्याला रुकार दिला. कारण पूर्वींच्या चालीप्रमाणें मला पायांत चिणून टाकण्याचा तर यांचा विचार नाहीं ना अशी मला भीति वाटली. (हशा). पण तसा तुमचा बेत नाहीं असें दिसतें. (उच्छृं-खळ श्रोता–निदान अद्यापपर्यंत तरी दिसला नाहीं ). नंतर वाटलें कीं, यांना पायाचा दगड उचलत नाहीं म्हणून हमाली करायला




कोनशिला-बसवणीच्या समारंभास लायक अध्यक्ष.

तर त्यांनीं बोलाविलें नाहीं ना ? कारण डिंग्रज गांवच्या लोकांना एक शिळा उचलायची होती, पण पांचदहा जणांना सुद्धां ती उचलेना. तेव्हां त्यांनीं युक्ति केली कीं, वऱ्हाडचा प्रसिद्ध पहिलवान गब्रू याला त्यांनीं कोणशिलाबसवन समारंभाला बोलाविलें आणि बिनखर्चांत त्याच्याकडून दगड उचलविला ! (हशा). पण मी फार सशक्त नाहीं आणि दगडहि असा जड नाहीं त्या अर्थी तोहि तुमचा उद्देश दिसत नसून माझ्यावरचें प्रेमच आमंत्रणाच्या मुळाशीं असलें पाहिजे हें उघड आहे.

" आपल्या या मनोहर पण मानी, खडकाळ पण पाणाळ, गरीब पण हवाशीर मावळ प्रांताचा मला फार अभिमान वाटतो. याच मावळ प्रांतांतून पुष्पावती, कुकडी, भीमा, भामा, घोड, इंद्रायणी, मुळा, मुठा, आणि निरा नद्या उगम पावून आमच्या पुणें जिल्ह्याला पाणी पुरवितात. आपण पुणें जिल्ह्याला केवळ जीवनच देतां असें नाहीं, तर शिवप्रभूनें (टाळ्या) याच मावळांतील मावळ्यांच्या साह्यानें महाराष्ट्रास राष्ट्रीय जीवन घातलें. याच मावळांत आंबेमोहोराचे तांदुळ होतात. या मावळांतल्या पाण्याच्या शक्तीनें मुंबईतल्या कारखान्यांना पुरणारी विद्युच्छक्ति निर्माण होते, इतकेंच नव्हे तर त्या शिवरायानें (टाळ्या) सर्व भरतखंडांत यावनी सत्तेला धक्के देण्यासाठीं जी विद्युच्छक्ति निर्माण केली ती याच प्रांतांतून ! आणि चांगलें स्वस्त लोणी येथूनच पुण्याच्या बाजारांत जातें.

" आणखी या वडगांवच्या रणभूमीची आठवण झाली, स्मरण झालें, स्मृति आली कीं, प्रत्येक मराठ्याचें अंतःकरण, प्रत्येक महा-

राष्ट्रीयाचें हृदय, प्रत्येक दक्षिण्याचें मन थरारून येतें, छाती भरून येते, ऊर फुटूं लागतो. याच वडगांवच्या धारातीर्थावर महादजी शिंदे पाटीलबुवांच्या तरवारीचें पाणी सन १७८० (हेडमास्तर— नाहीं, नाहीं, १७७९ हो !) सालीं इष्टुर फाकड्याला पाजलें, याच रणांगणावर मानाजी फांकडे लढले आणि इंग्रजबहादर रडले, (टाळ्या), याच समरभूमीवर बापू गोखल्यांनीं गोडार्ड साहेबाला गोमय चारलें (कडकडाट). अशा या स्फूर्तिदायक, अशा या कीर्तिदायक मंगल भूमीची मृत्तिका मंगलतिलक म्हणून मस्तकाला माखण्याची कोणत्या महाराष्ट्रीयाला महत्त्वाकांक्षा होणार नाहीं ? आपल्याच या मावळांतून अस्सल मध पुष्कळ बाहेरगांवीं जातो.

" एकंदरींत असल्या या भू—वैकुंठांतल्या जनांच्या निमंत्रणाला मान देणें मला अपरिहार्य वाटलें. सन १९२१ च्या खानेसुमारी-वरून या तालुक्याला शाळेची किती आवश्यकता आहे हें दिसून येईल. एकंदर....'' [अरे ! इंद्रायणीसमाचाराचें २ रें पान कोठें हर-वलें ? शाबास ! हा आमचा वसंत कुत्रा तें पान चघळीत बसला आहे. वाचकांवर वसंताचे उपकारच झाले म्हणावयाचे ? ]

## परिशिष्ट (आ)

यांत टाकावयाला कांहीं मजकूर नसल्यानें हें सदोदित नांवा-प्रमाणें ' आ ' करूनच बसणार असें दिसतें.






पनवेलचा रघू साना.

# अखेर लग्न जमलें.



रघुनाथपंत साने यांचे चिरंजीव आत्मारामपंत यांस मुंबईस जनरल पोस्टांत ऐशीं रुपयांची वाढत जाणारी नोकरी होती. पोस्टमास्तर जनरल गोखलेसाहेब यांची त्यांजवर मर्जी होती. घरची बेताची इस्टेट होती. हें सर्व ऐकून गुंड्याभाऊस घेऊन मी पनवेलीस गेलों. 'रघुनाथपंत साने कोठें राहातात ?' अशी चौकशी करूं लागलों; पण कांहीं पत्ता लागेना. तेव्हां गुंडयाभाऊनें एकास विचारिलें, 'अहो, तो रघू साना, तो कुठें राहातो ?'

'हां हां, तो रघू-त्याचा बाळ्या मोमईस पी. एम्. जी. च्या हापिसांत आहे, तो ना ? तो त्या पऱ्ह्याच्या काठाकाठानं जा, म्हणजे सोपटाचं झाड आहे तिथें दिसेल. बाहेरच म्हैशी धूत उभा आहे-जरा जाडगेलासा गोरा !'

रघुनाथपंतांस आम्ही भेटलों. नवऱ्यामुलीच्या नातेवाइकांचें ज्या रीतीचें आदरातिथ्य व्हावयाचें तसलेंच आमचें झालें. रघुनाथ-पंत आणि जानकीबाई यांना स्वखर्चानें पुण्यास नेऊन मुलगी दाखविण्याचें कबूल करून त्यांस आम्हीं आपल्या घरीं नेलें. मुलगी पाहिली. त्यांस पसंत पडली व मुलाला मुलगी दाखविण्याची अनुज्ञा मिळाली. तेव्हां आम्हीं त्यांस परतभाड्याचे पैसे देऊन पनवेलीस परत पाठवून दिलें.

* * * *

या ठिकाणीं नवरबापांस एक मित्रत्वाची सूचना देण्यास

हरकत नाहीं. चि. चिमूस पहाण्याकरितां सोलापुराहून आपटे नांवाचें दांपत्य आलें होतें. सोलापुराहून जाण्यायेण्याचा खर्च देण्याचें माझ्या वतीनें माझ्या श्वशुरांनीं कबूल केलें होतें. आपटे दांपत्यास मनीऑर्डरनें सोलापूर ते पुणें भाडें पाठविलें होतें. उभयतांनीं मुलगी पाहिली. रा. आपटे म्हणाले, 'अजून मीं नीट विचार केला नाहीं. सोलापुरास गेल्यावर आम्ही आपसांत चर्चा करून निकाल पत्रानें कळवूं.' पण सौ. आपटे होत्या भोळ्या. त्यांनीं आईस सांगितलें, 'मुलाच्या मानानें मुलगी फार लहान आहे, म्हणून ती आम्हांला कर्तव्य नाहीं. तुम्ही आमच्या भरौशावर राहूं नका.' यावर आई म्हणाली, 'मुलगी लहान असली तर एकदोन वरसं वाट पहा. मोठी झाली म्हंजे करा. ती काय जन्मभर एवढीच का राहाणार आहे?' परंतु त्या मठ्ठ बाईला आईची सूचना पसंत पडली नाहीं, तेव्हां अर्थात् आपटे दांपत्याला परत जाण्याचें भाडें देण्यास मी नाखुष झालों. आपट्यांनीं परतभाड्याचे पैसे बरोबर आणिले नव्हते. जाण्यायेण्याचें भाडें ठरलें होतें अशा मुद्द्यावर ते आमच्याशीं भांडूं लागले, तेव्हां 'फिर्याद करा' असा सरळ जबाब मीं दिल्यावर नरम येऊन ते मजजवळ उसने पैसे मागूं लागले; शेवटीं त्यांनीं घड्याळ गहाण ठेविलें तेव्हांच भाड्यापुरते पैसे देऊन मीं वाटेस लाविलें. घड्याळ अद्याप मजजवळ आहे.

सारांश, जाण्यायेण्याचें रिटर्न भाडें आगाऊ घेतल्याशिवाय मुलगी पहावयास जाऊं नका, असा नवरदेव आणि नवरबापांस सल्ला दिल्यावांचून राहावत नाहीं.

नंतर मुलाला मुलगी पहाण्यास बोलाविलें. 'मुलगा' आपल्या पांचसहा मित्रांसह येऊन मुलगी पाहून गेला. इतक्या सगळ्यांचें मुंबईचें भाडें मला भरावें लागलें. तथापि मुलाची एक आत्याबाई उमरावतीस होती. आणि तिच्या इस्टेटीवर आमच्या भावी मेहुण्यांचा डोळा असल्यामुळें, मुलाच्या 'आत्याबाईस मुलगी दाखवा व त्यांच्या पसंतीस पडली तर नक्की करूं,' असें रा. रघुनाथपंतांचें पत्र आलें. आत्याबाईस खर्च देऊन पुण्यास आणिलें व मुलगी दाखविली. त्यांसहि मुलगी पसंत पडली.

पत्रिकेबद्दल दरम्यान् वाटाघाट झाली, थोडेसे गुण कमी पडत होते, म्हणून चिमीच्या वार्षिक परीक्षेंतले गुण पत्रिकेंतल्या गुणांत मिळवून बेरीज जमविली. लग्न लवकर उरकून घ्यावयाचें होतें; परंतु जुन्या पंचांगाप्रमाणें अधिक मास येत होता, म्हणून आम्ही दोघेहि नवीन पंचांगाचे अनुयायी बनलों आणि मुहूर्त ठरविण्याचा चंग बांधिला.

परंतु साने मंडळीला मुहूर्ताच्या अगोदर दुसऱ्या महत्त्वाच्या बाबतीचा निकाल करून घ्यावयाचा होता. 'हुंडा घ्यावयाचा नाहीं, मुलगी मात्र मनाजोगी असली पाहिजे' ( आणि माझी चिमणी 'जोग' घराण्यांतली असल्यामुळें 'जोगी' तर होतीच फक्त 'मना' चा प्रश्न राहिला होता. ) असें साने मंडळीनें दहादा निक्षून सांगितलें असल्यामुळें मीं एकदम मुहूर्ताचें काढिलें. परंतु रघुनाथपंत म्हणाले, 'अहो मिस्टर जोग ! हुंडा घ्यावयाचा नाहीं, तरी शास्त्राप्रमाणें कांहीं वरदक्षिणा ठरावायला नको का ?'

'अहो, दक्षिणा कांहीं ठरवीत असतात का ? ती देणारा

आपल्या शक्त्यनुसार आणि इच्छेनुसार देतच असतो,' गुंड्याभाऊनें मध्येंच म्हटलें.

'दक्षिणा देणारे नेहमींच 'शक्त्यनुसार' देत असतात असं कांहीं नाहीं; 'इच्छेनुसार' देण्याचा यत्न करतात आणि म्हणूनच तिचा ठराव अगोदर करून घ्यायला लागतो. क्षेत्रांत तुम्ही पहा किंवा या तुमच्या पुण्यांत लग्नसराईच्या दिवसांत पहा, 'सवा रुपया दक्षिणा देत असाल तरच जेवायला येतों,' असं सांगणारे भिक्षुक तुम्हांला हवे तितके मिळतील. म्हणजे आम्ही त्या भिक्षुकांच्या इतके हीन अवस्थेला जात आहों असं समजायचं नाहीं, उगीच दृष्टांत सांगितला हो. पण वरदक्षिणा हा एक ब्राम्हविवाहाचा मुख्य भाग आहे. तुम्हीं 'कन्यादान' केलं कीं, दक्षिणा आली पाठोपाठ! ब्राम्हणाला गाय दिली कीं जर सवा रुपया दक्षिणा देतां येते, तर 'कन्या' दिल्यावर सवासहस्र दक्षिणा तरी नको का?'

सवासहस्राचा आंकडा ऐकतांच मी घाबरून गेलों. मुंबईस ८० रुपये पगार मिळविणाऱ्या माझ्या भावी मेहुण्याला सवासहस्र रुपये जमविण्यास सवाशें वर्षांचें आयुष्य तरी पुरेल कीं नाहीं याची मला शंकाच वाटली. मी आश्चर्यचकित झालेलों पाहून रघुनाथपंत मला अभय देत बोलले, 'अहो, घाबरूं नका. तुम्हां तरुणांना बायकांची आणखी गायींची तुलना केली, गोदान आणि कन्यादान सारखं म्हटलं, कीं राग येतो–''

'अल्बत्, कां नाहीं येणार?' मी उद्गारलों.

'पण तुमचं तरुणांचं वर्तन जुन्या काळच्या सनातन्यांच्यापेक्षां निराळं आहे का? क्षेत्रांतल्या भटाभिक्षुकांप्रमाणं तुम्ही

वरदक्षिणेकरितां अडून बसतां, विकत घेतलेल्या जनावराप्रमाणें आपल्या बायकोचं मूळचं नांवदिखिल बदलून टाकितां, उठल्या-सुटल्या तिला अडवून तिच्या बापाकडून पैसे उकळतां आणखी तिला दोनचार मुलं झाल्यावर तिच्या उरावर एखादी सुशिक्षित पदवीधर सवत किंवा नर्स आणून आदळतां ! या वेळीं तुम्ही बहिणीचं लग्न जमवायला आलां आहां म्हणून कदाचित् जुन्या चालींचा तुम्हांला फार राग येत असेल, नाहीं ? '

' केव्हांहि ! या सगळ्या जुन्यापुराण्या चाली पार मोडून टाकिल्या पाहिजेत. केशवसुतानं एवढ्याचकरितां तुतारी फुंकली, अन् आगरकरांनीं—'

' शंख वाजविला,' त्यांनीं मध्येंच म्हटलें, ' तुमचं स्वतःचं लग्न झालं आहे का ? '

मीं होकार दिला.

'मग त्याच्या अगोदर केशवसुताची तुतारी तुमच्या कानापर्यंत येऊन थडकली नसेलच !' मला निरुत्तर करून जयघोषाचें हासत ते उद्गारले.

' मी-मी— ' माझ्या स्वतःच्या लग्नांत मला आईच्या आग्रहास्तव हुंडा घेणें कसें भाग पडलें तें मी सांगूं लागलों; परंतु माझी बाजू अमळ लंगडी असल्यानें माझा आत्मसमर्थनाचा प्रयत्न दुबळा पडला. रघुनाथपंतांनीं मला बोलूं दिलें नाहीं. तुम्ही कांहीं जगावेगळे नाहीं, बाकीच्या तरुणांप्रमाणें तुम्हींहि आपल्या सासऱ्यास पिळलेंच असेल, व आतां मात्र बहिणीच्या लग्नाच्या वेळीं तुम्हांला 'परोपदेशे पांडित्यम्' सुचत आहे, अशा अर्थाचीं वाक्यें ते बोलले.

* * * *

आतां या ठिकाणीं वाचकांस सांगून ठेवितों कीं, प्रत्येक स्त्रीस ( अगर पुरुषास ) वाटतें कीं, मी जगासारखी (अगर सारखा) नाहीं. इतरांपेक्षां माझ्यांत करारीपणा, फटकळपणा, नियमितपणा हे गुण अधिक प्रमाणांत आहेत; आपणांस आपले दोष पूर्णपणें माहीत आहेत; इतरांचे दोष आपण जसे जाणतों, तितक्याच बारकाईनें आपल्याला स्वतःचे दोष कळतात इत्यादि इत्यादि प्रत्येक मनुष्यास वाटत असतें व त्यामुळें आपल्या असामान्यत्वाविषयीं प्रत्येकास जाणीव असते. परंतु गंमत ही कीं, तीच व्यक्ति अगदीं सामान्य, अगदीं इतरांसारखी सदोष आहे असें इतर सर्वांस पक्कें माहीत असतें.

माझी मात्र, वाचकहो, तशी गोष्ट नाहीं. मला स्वतःच्या दोषांकडे डोळेझांक करण्याची मुळींच खोड नाहीं; व खरेंच सांगतों, माझ्यांत किंवा माझ्या मोरूंत एवढे (·) जरी दोष असते तरी ते माझ्या लक्षांत आल्यावांचून कदापि राहाते ना.

एकदां मीं सौ. स म्हटलें. ‘ अग ए, आपण स्पष्टपणें एक-मेकांचे दोष सांगू या; म्हणजे ते सुधारण्याचा यत्न करायला बरं.’

‘ नको नको. आपण तर माझे दोष नवरेपणाच्या हक्कानं सगळी सदाशिव पेठ ऐकेल इतक्या मोठ्यांदा गर्जना करून सांग-तच असतां पण मी मात्र आपले दोष सांगायला तयार नाहीं, ’ ती म्हणाली.

‘ कां बरं ? सांपडत नाहींत म्हणूनच ना ? ’ मीं अभि-मानपूर्वक विचारिलें.

‘ तसं नव्हे. आपले दोष कुणीं सांगितले तर इकडे राग येतो

म्हणून ! ' ती शांतपणें चुलीवरचें भांडें उतरवीत उत्तरली.

' नाहीं, मला कधींहि राग येत नाहीं. माझ्यासारख्या शांत स्वभावाच्या माणसाला त्याचे दोष कळवले तर राग येईल हें शक्य नाहीं. उलट तुझी एकादी चूक दाखविली तर तूं मात्र एखाद्या मांजरीसारखी चिडत्येस, ' चढत्या आवाजांत मी म्हणालों.

'मी कुठं म्हणती आहें मी चिडत नाहीं म्हणून ? माझं म्हणणं एवढंच कीं, आपली एखादी चूक आपल्या नजरेला आणली तर मात्र तें तुम्हांला खपत नाहीं. स्वतःबद्दल मी कांहीं बोलतच नाहीं.'

' अगदीं खोटं ! ' मी रागानें ओरडलों, ' स्वतःचे दोष सांगणारावर मी रागावतों हें म्हणणं साफ खोटं आहे. त्यांतून माझ्या बायकोनं मला अशीं खोटीं नांवं ठेवणं मला नाहीं खपायचं !' इत्यादि इत्यादि. सारांश, दोषान्वेषी अशा स्त्रियांना देखील माझे दोष दिसत नाहींत.

* * * *

असें असून रघुनाथपंतांनीं, ' तुम्ही कांहीं जगावेगळे नाहीं,' असें म्हटलेलें मला बहिणीकरितां ऐकून घ्यावें लागलें. शेवटीं आमच्या पक्षाचे चार आणि सानेपक्षाचे चार अशा आठ शिष्टांनीं एकत्र जमून लग्नाचा तहनामा करावा असें ठरलें. आमच्या या तहनाम्याच्या वेळेपासून साने व जोग यांत किती चकमकी उडाल्या, किती वेळां लग्न फिसकटण्याचे प्रसंग आले, पुन्हां मध्यस्थांची कुशलता कशी उपयोगीं पडली वगैरे गोष्टी सर्वांच्या अनुभवांतल्याच आहेत तेव्हां त्यांचें वर्णन करण्याचें कारण नाहीं. आमच्या बाजूनें माझे श्वशुर, गुंड्याभाऊ, आमचे उपाध्ये भिकंभटजी व मी असे चौघेजण वाटाघाट करीत होतों. रघुनाथपंत, त्यांचे उपाध्ये

बाळंभट, मुलाचे मामा व त्याचे काका असे चौघे शत्रुपक्षांत होते. रघुनाथपंत प्रत्येक बाब आपल्या उमरावतकिर श्रीमंत बहिणीची मंजुरी घेऊन मग नोंदवीत होते. प्रेसिडेंट विल्सनच्या कलमबंदींतल्या प्रमाणें किंवा मुसलमानांच्या चौदा मागण्यांप्रमाणें आमच्या तहनाम्यांत चौदा कलमरूपी रत्नें होतीं. तीं येणेंप्रमाणें:—

(१) रा. चिमण विठ्ठल जोग यांनीं आपली भगिनी सौ. कां. चिमूताई ही रा. रघुनाथपंत साने यांचे चिरंजीव आत्मारामपंत यांस विवाहांत द्यावयाची. साने यांजकडून तिचा स्वीकार व्हावयाचा.

(२) जोग यांचे सोयीसाठीं पुणें येथें विवाहसमारंभ करावयाचा. विवाहासाठीं साने मंडळींचा पनवेलीहून पुण्यास जाण्याचा व पुण्याहून परत पनवेलीस येण्याचा खर्च जोगांनीं द्यावा.

(३) साने यांजकरितां वाडा पाहाणें, वाजंत्री, आचारी वगैरे ठरविणें, मांडव घालणें, इत्यादि कामें जोग यांनीं करावीं.

(४) पनवेलीस परत जाण्याचा साने यांचा खर्च जोगांनीं वेळेवर न दिला तर खर्चाचे पैसे मिळेपर्यंत साने यांचें जेवणखाण व रहाणें जोगांच्या घरीं होईल.

(५) व्याहीभोजनाची चाल सशास्त्र नाहीं, त्यामुळें तिला फांटा देण्याचा हक्क साने यांनीं राखून ठेविला आहे. व्याहीभोजन केल्यास जोगांस त्या वेळीं मिळालेला अहेर त्यांनीं बरोबर न नेतां सान्यांकडेच ठेवून द्यावा.

( ६ ) वाङ्‌निश्चयाच्या वेळीं खाऊचा पुडा आणण्यासाठीं आठ आणे व खणासाठीं एक रुपाया जोगांनीं साने यांस आगाऊ द्यावा.

( ७ ) सीमान्तपूजनाच्या अगोदर जोगांनीं नवऱ्यामुलाच्या बेताचे खालीं वर्णन केलेले कोरे कपडे साने यांजकडे पाठवावे. कपडे आल्याशिवाय पूजनास उठणार नाहींत.

१ पुणेरी पगडी, आबाशाई, झिरमळ्याची. किं. ६ रुपये.

१ पारशी फॅशनचा चायना सिल्कचा लाँग कोट चांदीच्या बटनांसह. किंमत रु. ३०.

१ नागपुरी धोतरजोडी रेशीमकाठीं. किं. रु. १०.

१ जरीचें उपरणें. किं. रु. १०.

१ चर्मी ब्राम्हणी जोडा. किं. रु. ३.

एकूण ५ किं रु. ५९.

( ८ ) सीमान्तपूजनाचे वेळीं वरमाईस चांदीची वाटी आणि नवरदेवांकडील सर्व मानकरणींची खणानारळांनीं ओटी हे मान झाले पाहिजेत.

( ९ ) जोग यांनीं सान्यांस वरदक्षिणेचे रुपये एक हजार एक रोख अगर करन्सी नोटांच्या रूपानें द्यावयाचे. यांपैकीं निम्मी रकम सीमान्तपूजनाचे वेळीं आदा करावी व बाकीची वरप्रस्थानाच्या वेळीं भरावी. पूर्ण रकम चुकती झाल्याशिवाय वधूगृहीं वराची रवानगी

होणार नाहीं.

(१०) वधूकडील मोलकरणीस ओंवाळणीचें लुगडें, पोट-झांकणीचें लुगडें, मामेचीर, हीं देण्याकरितां जोगांनीं साने यांस तीन लुगडीं अगोदर देऊन ठेवावीं. हीं लुगडीं देणेंचा, न देणेंचा किंवा बदलून कमी अधिक किंमतींचीं देणेचा हक्क साने यांच्या स्वाधीन आहे. कानपिळ्याचा रुमाल जोगांनीं सान्यांस अगो-दर देऊन ठेवावा. रुमाल देणें न देणें, किंवा रुमाला-ऐवजीं टोपी देणें, वगैरे सर्व हक्क साने यांनीं राखून ठेविले आहेत.

(११) रुखवताचे वेळीं वधूपक्षाकडून वरमायेस जरीचें लुगडें मिळालें पाहिजे. लग्न लागल्यावर वरपक्षाकडील सर्व बायकांच्या खणानारळांनीं ओट्या भराव्या.

(१२) लग्न लागल्यावर वरपक्षाचे सर्व प्रकारचे मानपान जोग यांनीं द्यावे. रासन्हाणीं आणि पायघड्या हीं साने यांनीं न घेतल्यास जोगांनीं त्यांबद्दल रोख रुपये एकशें एक सान्यांस द्यावे. आंबोणांत तोंड धुण्याचें सर्व सामान असावें, तें:—

तस्त १ पितळेचें.

तपेल्या २ पितळेच्या.

फणीकरंडयाची पेटी १ फणी व करंडयासह.

कामिनिया हेअर ऑईल. बाटली १.

चेरी ब्लासम पावडर डबा १ गोंड्यासह.

कृत्रिम दांतांचा सेट १ विहिणींकरितां.

(१३) वधूपक्षाकडून लग्न लागल्यानंतर सायंकाळीं एक मेजवानी, दुसऱ्या दिवशीं एक प्रयोजन व चौथ्या दिवशीं मांडव परतणें, अशा तीन मेजवान्या द्याव्या. वरपक्षाकडे तिसऱ्या दिवशीं प्रयोजन होईल त्या दिवशीं वधूपक्षाकडील दहा पुरुष व दहा बायका यांपेक्षां अधिक माणसें येऊं नयेत. आल्यास माणशीं रुपाया एक आकार जोगांनीं द्यावा. मेजवानीचे वेळीं नवरदेव रुसल्यास त्यांना रुपये पन्नास पर्यंतचा जिन्नस समजुतीकरितां जोगांनीं द्यावा.

(१४) मांडवपरतणें झाल्यावर वरपक्षाकडील प्रत्येक पुरुषास एकेक जरीचा रुमाल, मुलास एकेक जरीची टोपी, नवरदेवाच्या मित्रांस एकेक कोटाचें टस्सरचें कापड, प्रत्येक स्त्रीस एकेक इरकली लुगडें आणि मुलीस चोळीपरकरांसाठीं तीनतीन खण जोगांनीं द्यावे.

याप्रमाणें कलमबंदी तयार झाल्यावर तिजवर सर्वांच्या सह्या झाल्या. जित राष्ट्राच्या वकिलांप्रमाणें तोंड लपवीत आम्ही पुण्यास परत आलों. मुहूर्त वैशाख मासांत एका मंगळवारचा गोरज धरला होता. व्याही मंडळीकरितां वाडा कांहीं केल्या मिळेना, कारण पुण्यांतले सगळे लग्नी वाडे त्या मुहूर्ताला गुंतले होते. तीच गोष्ट वाजंत्री आणि आचारीपाणक्ये यांची होती. लग्नसराईवर उपजीविका करणाऱ्या सर्वांस वर्षाची बेगमी दोन महिन्यांतच करून घ्यावी लागत असल्यानें ही आपत्ति व्याही मंडळींस सहन करावी लागते.

होणार नाहीं.

(१०) वधूकडील मोलकरणीस ओंवाळणीचें लुगडें, पोटझांकणीचें लुगडें, मामेचीर, हीं देण्याकरितां जोगांनीं साने यांस तीन लुगडीं अगोदर देऊन ठेवावीं. हीं लुगडीं देणेंचा, न देणेंचा किंवा बदलून कमी अधिक किंमतींचीं देणेचा हक्क साने यांच्या स्वाधीन आहे. कानपिळ्याचा रुमाल जोगांनीं सान्यांस अगोदर देऊन ठेवावा. रुमाल देणें न देणें, किंवा रुमालाऐवजीं टोपी देणें, वगैरे सर्व हक्क साने यांनीं राखून ठेविले आहेत.

(११) रुखवताचे वेळीं वधूपक्षाकडून वरमायेस जरीचें लुगडें मिळालें पाहिजे. लग्न लागल्यावर वरपक्षाकडील सर्व बायकांच्या खणानारळांनीं ओट्या भराव्या.

(१२) लग्न लागल्यावर वरपक्षाचे सर्व प्रकारचे मानपान जोग यांनीं द्यावे. रासन्हाणीं आणि पायघड्या हीं साने यांनीं न घेतल्यास जोगांनीं त्यांबद्दल रोख रुपये एकशें एक सान्यांस द्यावे. आंबोणांत तोंड धुण्याचें सर्व सामान असावें, तें:—

तस्त १ पितळेचें.

तपेल्या २ पितळेच्या.

फणीकरंड्याची पेटी १ फणी व करंडयासह.

कामिनिया हेअर ऑईल. बाटली १.

चेरी ब्लासम पावडर डबा १ गोंड्यासह.

कृत्रिम दांतांचा सेट १ विहिणींकरितां.

(१३) वधूपक्षाकडून लग्न लागल्यानंतर सायंकाळीं एक मेजवानी, दुसऱ्या दिवशीं एक प्रयोजन व चौथ्या दिवशीं मांडव परतणें, अशा तीन मेजवान्या द्याव्या. वरपक्षाकडे तिसऱ्या दिवशीं प्रयोजन होईल त्या दिवशीं वधूपक्षाकडील दहा पुरुष व दहा बायका यांपेक्षां अधिक माणसें येऊं नयेत. आल्यास माणशीं रुपाया एक आकार जोगांनीं द्यावा. मेजवानीचे वेळीं नवरदेव रुसल्यास त्यांना रुपये पन्नास पर्यंतचा जिन्नस समजुतीकरितां जोगांनीं द्यावा.

(१४) मांडवपरतणें झाल्यावर वरपक्षाकडील प्रत्येक पुरुषास एकेक जरीचा रुमाल, मुलास एकेक जरीची टोपी, नवरदेवाच्या मित्रांस एकेक कोटाचें टस्सरचें कापड, प्रत्येक स्त्रीस एकेक इरकली लुगडें आणि मुलीस चोळीपरकरांसाठीं तीनतीन खण जोगांनीं द्यावे.

याप्रमाणें कलमबंदी तयार झाल्यावर तिजवर सर्वांच्या सह्या झाल्या. जित राष्ट्राच्या वकिलांप्रमाणें तोंड लपवीत आम्ही पुण्यास परत आलों. मुहूर्त वैशाख मासांत एका मंगळवारचा गोरज धरला होता. व्याही मंडळीकरितां वाडा कांहीं केल्या मिळेना, कारण पुण्यांतले सगळे लग्नी वाडे त्या मुहूर्ताला गुंतले होते. तीच गोष्ट वाजंत्री आणि आचारीपाणक्ये यांची होती. लग्नसराईवर उपजीविका करणाऱ्या सर्वांस वर्षाची बेगमी दोन महिन्यांतच करून घ्यावी लागत असल्यानें ही आपत्ति व्याही मंडळींस सहन करावी लागते.

यावर उपाययोजना मला सुचली आहे; ती मी सर्वांच्यापुढें विचाराकरितां ठेवितों.

मुहूर्तांच्या चालीमुळें वर्षाच्या ३६५ दिवसांपैकीं फक्त तीस-चाळीस दिवस आपल्यांतील लग्नकार्यांना उपयोगीं पडतात, आणि वर्षांतील लागोपाठ येणाऱ्या पांच महिन्यांत लग्नें मुळींच लागत नाहींत, तेव्हां हें मुहूर्तांचें थोतांड अजीबात काढून टाकून अमावस्येसारखा एकादा अशुभ दिवस वर्ज्य करून बाकीचे सर्व दिवस शुभ ठरविले तर लग्नांना वाडे मिळतील, लोकांना आचारी पाणक्ये मिळतील, वाडेवाल्यांना वर्षभर भाडें मिळेल आणि आचारीपाणक्ये, वाजंत्री, दारूवाले यांना वर्षभर काम मिळत राहील. त्याचप्रमाणें मुहूर्त पद्धतीच्या योगानें भोजनभाऊंना एकदम दोनतीन आमंत्रणें येऊन एकाखेरीज इतरांवर पाणी सोडण्याची जी पाळी त्यांजवर येते ती येणार नाहीं. उलट वर्षभर दररोज आमंत्रण येत राहील.

आता आम्हीं जो मुहूर्त ठरविला त्यावर पुण्यांत ब्राम्हण–ब्राम्हणेतरांची मिळून ७–८ शें लग्नें ठरलेलीं होतीं. त्यामुळें व्याही मंडळीसाठीं जानोसा लौकर सांपडेना. सरतेशेवटीं रोडक्या गणपतीचें देऊळ पांच रुपये रोजानें ठरविलें. वाजंत्री रोजचे तीस रुपये मागूं लागले. आचारी रोजची पंधरा व पक्वान्नाचे पायलीस दोन रुपये, तर पाणक्ये आणि वाढपी रोजची पांच रुपये, मजुरी मिळाल्याशिवाय येणार नाहीं, असें म्हणूं लागले.

आणि आमच्या तहनाम्यांत तर लग्न चार दिवस चालावें असें कलम होतें; अशा प्रकारचे वाढलेले दर देऊन चार दिवस

लग्नसमारंभ चालविण्याच्या कल्पनेनें माझी छाती दडपून गेली. परंतु या प्रसंगीं आमच्या श्वशुरांनीं चांगली तोड काढिली. आमचे भावी मेहुणे मुंबईस पी. एम्. जी. च्या ऑफिसांत होते असें वर सांगितलेंच आहे. ‘ आतां सोनाराकडूनच कान टोंचवतों गुलामाचा ! ’ श्वशुर म्हणाले.

‘ पण सोनार कबूल झाला पाहिजेना काकासाहेब ? ’ मी म्हणालों.

‘ चट् होईल. अहो, सध्यां ते घारुआण्णा गोखले झाले आहेत पी. एम्. जी. ! ते न् मी अगदीं वाढलों खेळलों आहों एका जागीं ! फक्त आम्ही दोघे ‘ कुमार ’च आहों, नाहीं—तर शाकुंतल नाटकांत आहे ना, ‘ मी कुमार तीहि कुमारी ’ ! ’

काकासाहेबांना अशा चुका मुद्दाम करून रसिकतेचे प्रकार आपल्याला माहीत नाहींत असें दाखविण्याचें सोंग करण्याची फार हौस होती. ते मुंबईस गेले कीं, ‘ आपल्याला एकदां इंग्रजी नाच पहायचा आहे बुवा ! तो फार वाईट असतो असं म्हणतात, पण वाईट म्हणजे तरी काय तें समजलं पाहिजे, ’ असें म्हणून इंग्रजी ऑपेरा, व्हरायटी शो, नाटक, जें काय त्या वेळीं असे तें ते पहात. पहिल्या खेपेला ज्या प्रस्तावनेनंतर त्यांनीं इंग्रजी नाच पाहिला, तीच प्रस्तावना त्यांना एकतिसाव्या वेळींहि उपयोगीं पडली. किर्लोस्कर थिएटरमधले तमाशेदेखील, ‘ मला एकदा तमाशा कसा असतो तो पहायचा आहे, ’ असें बोलून ते नेहमीं पहात. इतकेंच नव्हे, तर, ‘ काय हो तुमच्या पुण्यांतले लोक बिघडले आहेत ! तो प्रोफेसर...., आणखी तो....शास्त्री; अहो, चांगले चांगले संभावित

म्हणून मिरवणारे लोक राजरोस तमाशाला येऊन बसलेले मीं पाहिले ! ' असेंहि आश्चर्य ते प्रकट करीत.

' सौभद्रांत आहे तें, काकासाहेब, ' मीं दुरुस्ती केली.

' हो. सौभद्रांत असेल. मीं कुठं भावड्याच्या वेळेला सौभद्र पाह्यलं होतं, आतां कशाला आठवेल ? बरं, पण सांगायचं कारण इतकंच कीं, घारुआण्णा माझा दोस्त आहे, त्याच्याकडे जाऊन चांगला बंदोबस्त करतों,' असें सांगून काकासाहेब मुंबईस जाऊन घारु-आण्णांना भेटले. तेथील हकीकत काकासाहेबांनीं परत आल्यावर सांगितली ती अशीः—

* * * *

' घारुआण्णाचा बंगला वांद्र्यास आहे. काल रविवार असल्यानं तो तिथंच भेटेल म्हणून लोकलनीं गेलों वांद्र्याला. आणखी बंगल्याचा तपास काढला. घारुआण्णा बंगल्याच्या दाराशीं कुऱ्हाडीनं लाकडं फोडीत होता अन् त्याची बायको नवऱ्यानें फोडलेलीं लाकडं घरांत नेत होती. एवढा दोन हजार रुपये दरमहा पगार मिळविणारा माणूस पण, आधीं होता वाघ्या, त्याचा झाला पाग्या, मूळ स्वभाव जाईना आणखी त्याचें कायसें राहीना, असं रामदासांनीं म्हटलंच आहे—'

' त्याचा येळकोट राही ना, असं आहे. आणखी हें राम-दासांनीं म्हटलं नसून तुकारामांनीं म्हटलं आहे, ' मीं म्हणालों.

' कोणीं का म्हटलं असे ना ? आणि म्हटलं नसलं म्हणून तरी काय झालं ? खरं तें खरं ! तें असूं द्या. मी घारुआण्णासमोर उभा राहिलों आणखी त्याचं लक्ष वेधण्याकरितां खाकरलों. लगेच

हातांतली कुऱ्हाड बाजूला टाकून त्यानं माझ्या पाठीवर अशी थाप मारली. ' वा: ! काशीनाथ, आज किती वर्षांनीं भेटतो आहेस ? फार आनंद झाला तुला पाहून ! ' तो म्हणाला. ' तुझा बंगला कुठें आहे ? ' मीं विचारलं. तेव्हां हाच, असं त्यानं उत्तर दिलं. ' हाच का ? मला वाटलं दोन हजार रुपये पगार पुरा पडत नाहीं म्हणून सुट्टीच्या दिवशीं दुसऱ्याच्या घरीं लाकडं फोडून तूं त्यांत भर घालीत असशील ! '

' असं मीं उत्तर दिल्यावर त्याला फार मजा वाटली. खरा ह्यूमर समजणारीं माणसं फार विरळ असतात. त्यानं लगेच मला बंगल्यांत नेलंन् घरची वास्तपुस्त केलीन् चहाबिस्कुटं खाऊं घातलींन् आणखी विचारलंन् कीं, ' कां आलास ? कोणी भाचापुतण्या चिकटून द्यायचा असेल आमच्या खात्यांत ?'

' छे: बुवा, असल्या कामाकरितां मी कोणाकडे जाणार नाहीं, असं सांगून मीं त्याला त्याच्या ऑफिसांतला आत्माराम साने याचं लग्न जमल्याचं आणखी मुलगी माझ्या जावयाची बहीण असल्याचं सांगितलं. तेव्हां त्याला वाटलं लग्नाचं आमंत्रण करायला मी आलों आहें म्हणून. तेव्हां मीं सांगितलं, ' लग्नाचं आमंत्रण वेळेवर देईनच पण आधीं मुलीच्या भावाची एका पेंचांतून सुटका करणं तुझ्या हातीं आहे. ' तें कसं काय ? तर लग्नाच्या अटींची कलमबंदी त्याला मीं दाखविली. त्याच्या मुलीचं एका आय्. एम्. एस्. शीं लग्न नुकतंच झालं होतं. त्या वेळीं त्याच्या जावयानं त्याला असंच पिळून काढलं होतं. म्हणून स्वाभाविक त्याची सहानुभूति मिळाली.

'मग काय? या भामट्याला देऊं का चांगली तंबी कीं, तुझ्या या अटी कमी कर नाहींतर तुला नोकरींतूनच कमी करीन म्हणून?'

'छे: रे बाबा, असा धाक देऊन काय उपयोग? मुलगी नांदायची आहे त्याच्या घरीं; तुझें काय, उद्यां बदली होऊन दिल्लीस नाहींतर मद्रासेस गेलास कीं ती धमकावणी निस्तरावी लागेल त्या बिचाऱ्या पोरीला! त्या ए. आर. साऱ्याला जरब तर बसली पाहिजे पण हा शह वधूपक्षाकडनं लागला आहे असं त्याला समजतां कामा नये. हें पहा. लग्न ठरलं आहे मंगळवार तारीख वीसला संध्याकाळचं. तूं असं कर कीं, त्याला मंगळवारीं आणखी बुधवारींच काय ती रजा दे म्हणजे लग्नाच्या अगोदरचे सीमान्तपूजन, उष्टीहळद न् दुसरे काय काय प्रकार असतात ते संक्षिप्तांत येतील. मंगळवारीं रात्रीं वरात निघाली कीं बुधवारचं जेवण बसेल साऱ्यांच्या बोकांडीं. आणखी बुधवारीं रात्रीं जांवईबुवांना पुणं सोडलंच पाहिजें! एकदां जावई गेला कीं बाजारबुणग्यांना कोण दाद देतो? असा म्हणावं खुशाल पोस्टमास्तर जनरलच्या नांवानं शंख करीत!'

'ही माझी युक्ति घारुआण्णाला सोळा आणे पसंत पडली. 'गुरुवारीं सकाळीं हाजर नाहीं राहिलास तर तुझ्या खुर्चीवर दुसरा इसम बसलेला पहाशील, असा धाक मी या गुलामाला देतों,' असं त्यानं कबूल केलंन् मग मी जेवायला तिथंच राह्यलों....'

* * * *

या हकीगतीवरून वाचकांच्या ध्यानांत आलेंच असेल कीं,

खुद्द नवरदेवालाच रजा नसल्यामुळें साने मंडळींची बरीच निराशा झाली. पूर्वी बालविवाहाच्या लग्नसमारंभांत विहिणी आणि करवल्या याच मुख्य भूमिका असतां नवरामुलगा हा गौण असे व नवऱ्या-मुलीला तर कांहींच किंमत नसे.

माझ्या आजोबांच्या लग्नाच्या वेळीं त्यांचें वय फक्त नऊ वर्षांचें आणि माझ्या आजीचें सात वर्षांचें होतें. त्या वेळीं माझा जन्म झालेला नव्हता, परंतु ही आख्यायिका मीं बाबांकडून ऐक-लेली सांगत आहें. खुद्द बाबादेखील त्या वेळीं झाले नव्हते हें चतुर वाचकांच्या ध्यानांत आलेंच असेल. आमचें घराणें त्या वेळीं आंज-र्ल्यास राहात होतें; आजीचें घर मुर्डीस होतें. मुर्डीस लग्न व्हाव-याचें होतें. लग्नाची पार्टी आंजर्ल्याहून दुपारीं निघाली त्या वेळीं आजोबा विटीदांडू खेळत होते, त्यांची आठवण कोणाला झाली नाहीं. पाळण्यांत खेळत असलेल्यांपासून अर्धी लाकडें मसणांत गेलेल्यांपर्यंत सगळ्या करवल्या आणि विहिणींचा मस्टर तीन वेळ झाला; पण नवऱ्या मुलाची आठवण कोणासहि झाली नाहीं. वरपक्ष मुर्डीस पोंचला, तेथें देवळांत सीमान्तपूजन योजिलें होतें. वरपक्षाच्या शेंबड्या लेंबड्या पोरींचे देखील पाय धुवून घ्यावयाचे असा आमच्या पणजीचा पण होता. सगळी तयारी झाली. मग नवऱ्या मुलाची आठवण झाली. तो बरोबर नाहीं अशी जेव्हां सर्वांची खात्री झाली, तेव्हां धांवपळ सुरू झाली. पुन्हां कांहीं जण परत आंजर्ल्यास मुलाला आणावयास गेले.

आमची पणजी व इतर वरपक्षीय मानकरणी म्हणूं लागल्या ‘ बंड्या नसला मेला, म्हणून काय झालें ? आमचे तर मानपान

कराल दिवस मावळायच्या आंत ? तो येईल मेला सावकास ! ' परंतु वधूपक्षीयांना हें पटेना. ' नवरामुलगा आल्याशिवाय आम्ही कांहीं तुम्हांला विचारीत नाहीं, ' असें त्या म्हणूं लागल्या. ' नाहीं तर आम्ही दुसरी मुलगी करूं जगांत काय आमच्या बंड्याला पन्नास मुली पाया पडत सांगून येतील, समजलांत ? ' पणजीबाई म्हणाल्या. 'आणखी आमच्या पण भिकीला बंड्याशिवाय कुठें नवरा मिळणार नाहीं असं का वाटतं तुम्हांला ? आपलं जवळचं पंच-क्रोशींतलं गांव आहे म्हणून तुमच्यासारख्या कातळफुंक्या भिक्षु-काच्या घराण्यांत मुलगी द्यायला तयार झालों, समजलांत ? नाहीं-तर वाईचे अभ्यकर मुलगी करून घ्यायला तयार आहेत दोन्ही-कडचा खर्च देऊन. मुलगाय् असा तसा वर आलेला नाहीं. चौथीचा अभ्यास करतो आहे ! शिवाय चांगलं गृहस्थाचं घराणं आहे, ' असें जेव्हां का आमच्या आजीची आई म्हणाली आहे तेव्हां आमच्या पणजीचा नुसता भडका झाला

' आमची द्वारकी कां नाहीं करून घेत बंड्याला याच मुहूर्तावर यांच्या नाकावर टिचून ? ' मुर्डीची एक नडलेली बाई म्हणाली.

कांहीं वेळानें आजोबा आले परंतु आधींच रागावलेल्या आजीच्या मंडळींनीं सीमांतपूजनांत शेंबड्या लेंबड्या पोरींचे पाय धुण्याचें नाकारलें. आमच्या आजीचें लग्न आजोबांशीं झालें नाहीं. ' द्वारकी 'चें लग्न आजोबांशीं लागलें.

आजीचें लग्न कांहीं दिवसांनीं वाईच्या अभ्यंकरांच्या मुलाशीं लागलें.

*  *  *  *

तात्पर्य, बालविवाहाच्या काळीं व्याहीविहिणी, करवल्या, वर-धावे, पाणजावई इत्यादिकांचे मानपान हींच लग्नसमारंभाचीं केंद्रें होतीं, आतां प्रौढविवाहांनीं वधूवरांना थोडेंबहुत महत्त्व येत चाललें ही वधूवरांच्या दृष्टीनें अभिनंदनीय सुधारणा असली तरी बहुसंख्याक इतरेजनांना हानिकारक आहे. आमच्या जांवईबुवांना रजा न मिळाल्यानें वरपक्षीयांचा फार हिरमोड झाला. मंगळवारीं गोरज मुहूर्ताचें लग्न असल्यानें वऱ्हाड्यांनीं शुक्रवारीं यावयाचें, जांवईबोवांनीं शनिवारीं सायंकाळीं पुण्यास थडकावयाचें आणि लगेच सीमांतपूजन, अक्षत, घाणा, उष्टी हळद, तेलफळ हे समा-रंभ निवांतपणें एकामागून एक करावयाचे. पुढेंहि समारंभ शुक्र-वारीं मांडवपरतणें होईपर्यंत चालवावयाचा असा साने मंडळींचा बेत होता.

परंतु जांवईबोवांना सोमवारीं सायंकाळीं सहा वाजेपर्यंत मुंबईस ऑफिसांत डांबवून ठेवावयाचें आणि ते मंगळवारीं सकाळीं पुण्यास पावतील असें करावयाचें असा घारुअण्णांचा बेत होता. अर्थात् आमच्या व्याहीमंडळींनीं पुण्यास शुक्रवारीं येण्याचा बेत रहित करून रविवारीं येण्याचें ठरविलें. आत्मारामला अगोदर रजा देत नाहींत तर नाहीं, त्याचा वचपा शनिवार–रविवारपर्यंत लग्न लांबवून काढूं, आणि शनिवारीं बालगंधर्वाचें नाटक सगळी मॅरेज पार्टी मिळून जोगांच्या खर्चानें पाहूं, अशा मिटक्या आमचा शत्रुपक्ष मारीत होता. परंतु पुढें जेव्हां त्यांना कळालें कीं, आत्मा-रामला गुरुवारीं सकाळीं साडेदहा वाजतां कचेरींत हजर रहावयाचें आहे तेव्हां त्यांच्या तोंडचें पाणी पळालें.

आमच्या विहीणबाई तेव्हांपासून आजपर्यंत ज्याच्या त्याच्या जवळ सांगत असतात, ‘ पाह्यलंत ना आमच्या आत्मारामचं काम त्याच्या साहेबाला किती पसंत आहे तें ? लग्नाला दिखील त्यानं एकच दिवसाची रजा दिलीन् ! तू न येऊन बाकीच्यांनीं काम कसं रेटेल ? असं त्यानं विचारलंन् हो ! ’ अंदरकी बात काय आहे तें माहीत असणारांना ही बढाई ऐकून गंमत वाटत असते.

रविवारीं आमची व्याहीमंडळी दोन मोटार लॉऱ्यांतून पुण्यास येऊन थडकली. आम्ही त्यांना रोडक्या गणपतीच्या देवळांत जानोसा घेऊन दिला होता, तेथें पन्नासएक मंडळी उतरली, बरोबर फारसें सामान आणिलें नव्हतें. भांडीं, कुंडीं, बैठक, दिवे इत्यादि सर्व सामानाची तरतूद आम्हांलाच करावी लागली. रीतीप्रमाणें जानोशाच्या जागेला आणि एकंदर पुणें शहराच्या वैभवाला पनवेलकरांच्या लाखोल्या सुरू झाल्या. जानोसा ‘ फर्निश्ड ’ करून देण्याची कलमबंदींत अट नव्हती तरी सर्व सामानसुमान पोंचविण्याची जबाबदारी आम्हांवरच येऊन पडली.

सोमवारीं वरप्रस्थानपूर्व विधी झाले. मंगळवारीं सकाळीं जावईबुवा आपल्या मित्रमंडळीसह पुण्यास येऊन दाखल झाले. संध्याकाळीं वरप्रस्थानाकरितां आम्ही एक घोडें ठरविलें होतें. होतें गरीबच. भाड्याच्या टांग्याचें तट्टू काय बिचारें मस्ती करणार ? परंतु आमचे जावईबापू त्याच्या देखील पाठीवर बसण्यास भिऊं लागले. आमच्याकडे निरोप आला कीं, जावयांना न्यायला मोटार पाठवा, ते घोड्यावरून येणार नाहींत. मला फार वाईट वाटलें व मीं खालीलप्रमाणें सुंदर स्वगत भाषण केलें:—

'अरे शूर मराठ्यांच्या अपात्र वंशजा, तुझ्याच पूर्वजांनीं रात्रंदिवस घोडयांवर सफरी करून अटक गांठली. 'जिन घर' असें ज्यांच्या पूर्वजांचें ब्रीद होतें, भीमथडीच्या तट्टांना उत्तरेस गंगेचें आणि दक्षिणेस कावेरीचें पाणी ज्यांनीं पाजिलें, ज्यांचे उपाध्ये घोड्यावर, ज्यांचें देवघर घोड्यावर, ज्यांची कचेरी तट्टावर आणि जनानादेखील कधीं कधीं घोडयावर असावयाचा, बैठकीला घोड्यावरचा गाशा घेऊनच ज्यांच्या वाटाघाटी चालावयाच्या त्यांचाच तूं वंशज असून लग्नाला घोड्यावरून येणार नाहीं असें म्हणावयास तुला किमपिहि किन्तु वाटत नाहीं काय ? आणि घोडा म्हणजे तरी कांहीं भय वाटण्यासारखा आहे काय ? अरे, आमच्या सखाराम तांगेवाल्याचें नापास झालेलें पांढरें तट्टू, आणखी त्याच्यावर बसायलाहि तूं जर भीत असलास तर माझ्या बहिणीचें पाणिग्रहण करण्याला तूं एकदम अपात्र आहेस !'

हें स्वगत भाषण घाईघाईनें आटोपून मी मोटारीच्या तजविजीस लागलों. वरप्रस्थानाचे वेळीं जांवईबोवांच्या मोटारींत पांच पंचवीस कच्चींबच्चीं आणि शिवाय कांहीं करवल्या आणि विहिणी कोंबून बसविल्या होत्या. वरप्रस्थानाच्या मिरवणुकींत बँड न लावून स्वदेशी व्रत कडकडीत रीतीनें पाळण्याचा माझा विचार होता, परंतु त्याचा सुगावा लागतांच वरपक्षांत लोकमत भयंकर प्रक्षुब्ध होऊन गेलें आणि त्यांतील वेगळाल्या पुढाऱ्यांनीं खालीलप्रमाणें उद्गार काढले:—

व्याही:–तशी बँडची आम्हांला कांहीं हौस आहे किंवा आम्हीं बँड कधीं पाहिला नाहीं असं नाहीं. तसं म्हणजे मुसलमान

लोकांनीं इंग्रजी वाद्य हिंदूंच्या मंगलसमयीं वाजवीत नेणं मला फारसं आवडतं असं नाहीं, पण आपला आयाबापड्यांचा हट्ट आहे आणि लग्नासारख्या प्रसंगीं त्या खपतात, कष्ट काढतात तेव्हां ऐकावं थोडं त्यांचं झालं.

विहीणबाई:—नतद्रष्ट मेलीं ! बँड लावाला पैसे नाहींत तर द्यावी कशाला आमच्याकडे मुलगी ? आपल्यासारखे कुणी कंगाल पाहून तिथं द्याची होती ! मोठे आले आहेत स्वदेशीवाले ? असेल तुम्हांला स्वदेशाची मोठी कळकळ तर सत्याग्रह करून तुरुंगांत जा, पण आमचा बँड बुडवून. आमचा हक्क बुडवून पुन: आपणच स्वदेशीचा टभा मिरवायला पाह्यजे ! आईजींच्या जिवावर बाईजी उदार म्हणतात ना तशांतली गत ! आधीं आम्हीं किती हौस बाळगली होती कीं, पांच दिवस लग्नाचा धडाका लावून देऊं तें मुलाला रजा नाहीं म्हणून आलं दोन दिसांवर. आणखीन् त्यांतून हीं म्हणतात ब्यांड लावीत नाहीं ! म्हणतात ना आधींच उल्हास नि त्यांत आला फाल्गुनमास; तशांतली गत ! तें कांहीं नाहीं चालाचं, मुलगी द्याची असेल तर बेंडबाजा लावलाच पाह्यजे !

करवली—हें काय मेलं ? आम्ही एवढ्या लांबनं धुळ्याहून आलों, तें काय बिन बेंडबाजाशिवाय रखडायला कीं काय ? बेंड-बाजा आला नाहीं तर मी करा धरणार नाहीं, म्हणून साफ सांगलें.

मि. घोपाटणे ( जामातृ—मित्र )—बँडवांचून प्रोसेशन म्हणजे डेन्मार्कच्या प्रिन्सवांचून हॅम्लेट नाटक होय.

सरतेशेवटीं आम्हीं धांवपळ करून गणेश पेठेंतून एक बॅन्ड

आणला. त्याला मिरवणुकीचे पन्नास रुपये ठरविले. अर्धा हुंडा आधीं सीमान्तपूजनाचे वेळीं दिला होता. बाकीचा चुकता केल्यावर वरराज मोटारींत जाऊन बसले आणि एका तासानें कुमारी चिमूताई जोग ह्या सौभाग्यवती कुसुमावतीबाई साने झाल्या.

त्याच रात्रीं वरात निघाली. कारण जामातांना रजा नसल्यानें सर्व समारंभ घाईनें आटोपणें भाग होतें. रात्रीं वरातीच्या वेळीं बॅण्डविषयीं वरपक्षाचें मत कसें परिवर्तन पावलें तें पुढारीवर्गाच्या खालील उद्गारांवरून दिसून येईल.

व्याही—चिमणरावांचं म्हणणं अगदीं बरोबर होतं बरं का ! बॅण्डच्या विरुद्ध तर मी पहिल्यापासून होतोंच. पण केवळ बायकामंडळीकरितां तो लावायला हरकत नाहीं असं माझं म्हणणं होतं. पण आतां मला असं वाटतं कीं, ज्या त्या कामांत बायकांच्या तंत्रानं चालणं हा एक मूर्खपणा आहे.

विहीणबाई—इश्शऽऽऽ ! काय मेले हे पुण्याचे बॅण्ड ! यापेक्षां आमच्या कोकणांतलं भराड बरं ! नको ग बाई वरातीला असला बॅण्ड ! यापरतं पनवेलीला लग्न केलं असतं तर मुंबईसून तरी बेंडबाजा आणला असता.

करवली—करवली झाल्यें म्हणून काय झालं ? ऊठसूट रुसलं तर बरं दिसेल का ? नसला वरातीला बेंड बाजा तरी चालेल मेला एक वेळ !

मि. धोपाटणे—हिंदूनीं आपल्या लग्नसमारंभांत इंग्रजी बँड लावणं म्हणजे आपल्या कल्चरचा ( संस्कृतीचा ) धडधडीत अपमान करणं आहे.

मुलाच्या आत्याबाईला मीं आतेचिराचें लुगडें दिलें होतें तें तिला साफ नापसंत पडलें. त्याबद्दल तिनें मला गांठून मजविषयीं स्वतःचीं मतें स्पष्टपणें मोठ्या आवाजांत म्हणून दाखविलीं. ती अगोदरच रागावली होती व त्यांतून वरातीच्या अगोदर नवरानवरींच्या जोडप्यानें प्रथम आईबापांना आणि नंतर आत्याबाईस नमस्कार केला. यामुळें आत्याबाई खूपच खवळून गेल्या. 'हें काय, मी वडील असून तात्याला ( रघुनाथपंत ) न् वहिनीला कसा आत्मारामनीं अगोदर नमस्कार केला ? यांचीच शिकवण असेल ही सारी ! मी म्हणजे कोणत्या झाडाचा पाला ? मला मुलगी दाखवायला तरी अगोदर आणली होती का ?'

'हें काय वन्सं बोलणं ? तुम्हांला चांगला जाचा याचा खर्च देऊन उमरावतीसून हितं आणलं नि मुलगी दाखवली, मग लग्न ठरवलं. तुमच्या मनाला दुखापत होऊं नवे म्हणून आम्हीं इतकीं जपत असतांना दिखीत तुमचा रुसवा संपत नाहीं. म्हणतात ना शेळी जाते जिवानिशीं न् खाणारा म्हणतो वातड, तशांतली गत !' विहीणबाई आपल्या श्रीमंत नणंदेची समजूत घालीत म्हणाल्या.

'होओओओ ! वरातीमागनं घोडं ! आधीं मुलगी पसंत करून लग्नाच्या वाटाघाटीलाय् पण सुरवात झाली होती. मग आपलं टाकणं टाकण्याकरतां झाली बहिणीची आठवण ! पण ती तरी केव्हां ? बहिणीच्या जवळच्या दामाजीची गरज लागेल असं वाटलं तेव्हां ! दाम करी काम अन् बिब्बी करी सलाम म्हणतात तें कांहीं खोटं नाहीं.'

विहीणबाई जागच्या जागीं उभ्या राहून आपला सूर वरच्या सप्तकांत लावून म्हणाल्या, ‘ आम्ही कांहीं कोण्ण्ण्ण्णाच्या मिंध्या नाहीं आहोंत. काय तुमचे दाम आमच्या कामाला आले आहेत ते तमाम जगाला माहीत आहे ! कापल्या करंगळीवर थुंकाला दिसींत कोणी वेळेवर येत नाहीं ! ’



आम्ही कोण्ण्ण्ण्णाच्या मिंध्या नाहीं आहोत.

'तर तर तर तर,' आत्याबाई ठमकाऱ्यानें ताशाच्या तालावर गडगडल्या, 'सुनेच्या अंगावर दोन अडीच हजारांचं लेणं चढवलं आहे तें जसं तिच्या बापाच्या घरचंच असेल! हुंडा आला तो सावकाराला द्यायला ठेवून सुनेच्या माहेरच्यांचे डोळे दिपवायसारखे दागिने घातलेत ते कुठले आहेत हें न समजाय् इतकं जग आंधळं नाहीं. दे पाहूं माझे दागिने परत म्हणजे तुझी सून कशी लंकेची पार्वती दिसेल ती सगळ्यांना पाहायला मिळेल!'

आमच्या व्याहीमंडळीची झांकली मूठ अशा प्रकारें जेव्हां आत्याबाईनीं चारचौघांपुढें जाहीर रीतीनें उघडली तेव्ह त्यांचीं तोंडें कशीं सुकून गेलीं असतील त्याची कल्पनाच करावी. करवली आपल्या माहेरची ढासळलेली अब्रू उभारण्याची दुबळी खटपट करीत म्हणाली, 'कांहीं हरकत नाहीं, आत्याबाई, माझा दादा दोनचार वरसांत चढवील बायकोच्या अंगावर दोन हजाराचे दागिने'

'माहीत आहे बरं बने!' आत्याबाई वेडावीत बोलतात, 'पाऊणशें टिकल्या पगार मिळवणाऱ्याला सात जल्म दिखीत पुरायचे नाहींत दोन हजार रुपये शिल्लक टाकायला!'

आत्याबाईच्या बोलण्याकडे लक्ष न देतां विहीणबाई करवलीस व दुसऱ्या एका मुलीस म्हणाल्या, 'बने! यमे! टाका ते खोटे दागिने आपल्या नव्या भावजयीच्या अंगावरून काढून! उगचि खोटी मांडवशोभा करून व्याहीमंडळीला फशिवलं तितकं पुरे झालं अन् फसणारा तरी कोण? म्हणतात ना माजरूं डोळे मिटून दूध

पितं तशांतली गत. हे सगळे मोती कल्चर का फल्चर म्हणतात त्यांतले आहेत अन् सोनं आहे गिनी गोल्डचं.'

ही नवीन प्रकारची गोलंदाजी अनपेक्षितपणें आपल्यावर फिरलेली पाहातांच आत्याबाईंची गाळण उडाली. आत्याबाईंचा श्रीमंतीचा तोरा आमच्या व्याहीमंडळीस असह्य झालेला असल्यानें त्यांची आतां होत असलेली फजिती सर्वांसच तोंड झांकून हासवूं लागली. 'बरे असतील कल्चर मोती! चांगले तीन रुपये चवाचे....' चींत पडलेल्या आत्याबाईंनीं बाजू सावरण्याचा यत्न केला. तिकडे लक्ष न देतां विहीणबाई पुढें बोलल्या, 'आणखी हें सोनं म्हणजे निव्वळ मुलामा आहे. कालच नथूशेटनीं सांगितलं कीं, ह्या सगळ्या जिनसांचे दोनशें रुपये दिखीत याचे नाहींत. पण केवळ वन्संच्या आग्रयावरनं मीं हें खोटं लेणं सुनेच्या अंगावर चढवलं. पण म्हण-तात ना लोकाचं लेणं नि लाजिरवाणं. एरवीं मला नाहीं बाई खोटा डौल आवडत नि त्यांतनं उसना तर मुळींच नाहीं आवडत.'

'बरा नसेल आवडत चोर तर चोर आणखी वर शिर-जोर....' इत्यादि आत्याबाईंचें भाषण चालू असतांच बनीयमींनीं चिमणीच्या अंगावरचे दागिने उतरून ते आत्याबाईंपुढें ठेविले. त्यांचा आणि त्यांच्या भावजयीचा भांडणाचा कडाका इतक्या मोठ्यानें गाजला कीं ताशेवाले लाजेनें थिजून जाऊन ताशे फाडून मजुरी मागितल्याशिवाय चालते झाले. आत्याबाई रागावून ताबड-तोब शेवटच्या प्यासेंजरनें पुण्याहून निघून गेल्या.

वरातीनंतर दुसऱ्या दिवशींच आमच्या इकडची मांडवपरत-ण्याची मेजवानी होती. आमच्याकडल्या दोन मेजवान्या आमच्या

श्वशुरांच्या युक्तीनें वांचल्या. मेजवानीच्या अगोदर जांवईबुवा रुसले होते. आम्ही आमची स्वतःची मित्रमंडळी होती तिला जेवूं घातलें व नंतर गुंड्याभाऊ, माझा मेहुणा कमळाकर, व शेजारी प्रोफेसर दिघे यांना व्याहीमंडळीकडे बोलावणें करण्यास पाठवून दिलें. जांवईबुवांच्या रुसव्यामुळें आमच्या निमंत्रणास कोणी उत्तरच देईना तेव्हां ते तिघे तेथेंच सतरंजीवर उपरणीं पांघरून घोरत पडले.

इकडे आमच्या मित्रमंडळींतील पुरुषांचीं जेवणें झालीं. नंतर दुपारीं दोन वाजतां बायकांचीं पण जेवणें उरकलीं. ‘ सागरगोटे घे ! केरसुणी घे ! बिट्ट्या घे ! चार लाडू दे म्हंजे सागरगोट्याचा अक्षी चांगला डाव देईन, ’ अशीं प्रलोभनें दाखविणाऱ्या भिकारणींना मुली आपापल्या पानांत मुद्दाम टाकून ठेविलेलीं पक्वान्नें वाढूं लागल्या. ‘ ए जरीची लाल पैठणीवाली काकू. बाळाला एक जिल्बी घाल ग ! ए हिरव्या चोळीची चंद्रहारवाली वैनी, तुला बुरगुंडा होईल. ए खादीची पातळवाली कमळाताई ! तुझी परिक्षा पास होईल, ’ असे यथोचित आशीर्वाद देऊन आळवणाऱ्या चाणाक्ष भिकारणींची गंमत पाहून आणि सागरगोटे घेऊन त्यांचा मोबदला न देतां पळून आलेल्या मुलींविषयींच्या तकारारी मिटवून मला कंटाळा आला तेव्हां दोन द्रोण मठ्ठा ( दुसऱ्या माणसाला खुशाल ‘ मठ्ठा ! ’ असें संबोधण्याची ज्यास इच्छा असेल त्यानें मेजवानींत मठ्ठा वाढण्यास घ्यावा ) फस्त करून मी व्याह्यांकडे गेलों. शेवटीं बऱ्याच वेळानें जांवईबोवा व त्यांचे मित्र यांनीं आमचें आमंत्रण स्वकारलें. मात्र त्यापूर्वी आम्हीं त्यांचा रुसवा काढून टाकण्यास त्यांस ग्रामोफोन भेट द्यावा असें ठरलें. मग व्याहीमंडळी

जेवणास आली. मांडवपरतण्याचे मानपान दिले. लग्नसमारंभ आटोपून रात्रीच्या प्यासेंजरनें जांवईबुवा मुंबईस रवाना झाले.

इतरेजनांना आतां कोण विचारतो ? त्यांना दोन मोटार बशांतून गुरुवारींच पनवेलीस पाठवून दिलें. चिमणीहि सासरीं जाण्यास निघाली. जातांना आमच्या आग्रहावरून तिनें

पावसाळ्याच्या दिवसांत मुठेला आला महापूर,
आत्मारामपंतांच्या जिवावर आईभाऊ केले दूर,

असा हृदयस्पर्शी उखणा घेतला. तिला म्हटलें, 'चिमूताई, तूं मला एकच बहीण असून दहा जणींच्या ठिकाणीं आहेस. कारण तुझ्या एकटीचं लग्न जुळवायला मला इतका त्रास पडला कीं, दहा बहिणींच्या भावाला सुद्धां तितका पडायचा नाहीं.'

आईला गहींवर आला. चिमीच्या वहिनीला सुद्धां फार वाईट वाटलें.

मोटारच्या क्लीनरांनीं हॅन्डलें फिरविलीं व मोटारींच्या अंगांचा थरकांप झाला. 'काळजी करूं नको, पत्र पाठवा, झाल्यागेल्या गोष्टी विसरून जा, जपून जा,' इत्यादि वाक्यांची देवघेव चालत असतां मोटारबशा रस्त्याच्या कोपऱ्याशीं वळून दिसेनाशा झाल्या.

---

## परिशिष्ट.

परिशिष्टावांचुनी ग्रंथ । पुच्छहीन कपी जसा ॥

निरनिराळ्या शतकांतील महाराष्ट्रीय वधूंचे निवडक उखाणे पुढें दिले आहेत, त्यांवरून तत्कालीन वधूंच्या महत्त्वाकांक्षा प्रतीत होतात.

सन १६००

खंडोबाच्या देवळाला बसवलं चंदनाचं दार,
महीपतरावांला बादशहानं नेमलं पेडगांवचे कमाविसदार.

पुळ्याच्या गणपतीपुढें माजलं केवड्याचं रान,
गोमाजीपंतांना दरबारांत मिळालं मानाचं पान.

सन १७५०

पेशव्यांच्या शिकारखान्यांत नेपाळचा आणला गेंडा,
शिरपतरावांनीं अटकेपार नेला श्रीमंतांचा झेंडा.

सवा कोस पसरला अंगरख्याचा घोळ,
रामाजीपंतांचं अक्षर जशी मोत्यांची ओळ.

तालमीच्या नादानं कपडे झाले मळके,
धनाजीरावांच्या हातांत नंगी तरवार झळके.

सन १८००

गणेशाच्या स्मरणानं सगळीं विघ्नं पळती,
गोविंदपंतांचं प्रेम पाहून सवती मनांत जळती.

श्रीमंतांच्या दरबारचं आमंत्रण आलं खास,
भवानरावांना जिल्बीचा देत्यें गोडसा घास.

सन १८५०

चंदनाचे पाट त्यांना सोन्याची चूक,
गोपाळरावांच्या हातांत इंग्रजी चवथीचं बूक.

सरकारच्या कृपेनीं प्याद्याचा झाला फर्जी,
मारुतीरावांच्या वर बसली कलेक्टरसाहेबांची मर्जी.

सन १९३०

सासरच्या माणसांच्या दारचा फणस निघाला बरका,
मधुकराच्या हातांत सदैव फिरे महात्माजींचा चरका.

देशाचे पुढारी लागले स्वराज्याच्या नादीं,
शांतारामराव सूट द्या टाकून नि वापरा आतां खादी.

सन १९५०

मधुकर ! अरे मधू ! केव्हांची मी वाट पहाती आहें, अजून
ाहीं का कपडे चढवणं झालं ?



# गुलाब.



गुलाब ही सौ. ची शाळेंतील मैत्रीण. पहिल्यानें ती साताऱ्यास होती. माझ्या लग्नाच्या वेळींच माझ्या लक्षांत तिचा मिस्कीलपणा आला. सारखी माझी आणि आमच्या पक्षाची ती इतकी चेष्टा करीत होती कीं, आमचा वधूपक्ष आणि उलट बाजूचा वरपक्ष असें वरवर पहाणारास वाटावें ! तिचें लग्न झाल्यावर तिच्या नवऱ्यानें बडोद्यास नोकरी धरून पुण्यास बिऱ्हाड केल्यानें ती येथें रहाण्यास आली. मग पुनः दोघी मैत्रिणींचें सूत जमलें. गुलाब नाकींडोळीं चांगली होती; पण तिच्या नाकाची ती उंच बोंडशी, चमकणारे घारे डोळे आणि तो उंच पण बारीक आवाज यांच्या योगानें तिचा मिस्कील स्वभाव सहज समजत असे.

तिचें लग्न होऊन पुढें बरेच दिवस झाले होते, आणि तिला दोन मुलें झालीं होतीं. अशीं नुसतीं पाप्याचीं पितरें दिसत होतीं कीं जशी बालामृताची जाहिरात !

आमची चि. मैना नुकतीच झाली होती. एक महिन्याची होती. तिचीहि प्रकृति अशक्त होती.

त्या दोघी मैत्रिणी गप्पा मारीत होत्या. मला सुट्टी असल्यानें मी घरींच होतो. नेहमींप्रमाणें माझ्यावर टीका सुरू झाली. १९२१ च्या खानेसुमारींत मी स्वयंसेवक म्हणून काम करण्यास गेलों होतों. तेव्हां एका गृहस्थाला मीं ‘ तुमच्या बायकोचें कोणत्या कोष्टकांत नांव घालूं ? अविवाहित, सवाष्ण कीं—’असा प्रश्न विचारला होता.

हा प्रश्न विचारल्यावर तीन तासांनीं मी शुद्धीवर आलों. ही गोष्ट मीं बाहेर फोडिली नव्हती. ती एक मला कीं माझ्या पन्नास–साठ जिवलग मित्रांनाच ठाउक, परंतु ती गुलाबच्या कानीं कशी गेली कोणास कळे! ही हकीकत गुलाबनें सांगितल्यावर अगदीं अनार्येसारखी सौ. खिदीखिदी हंसली. आधुनिक शिक्षणानें स्त्रियांचा स्वाभाविक विनय नष्ट होत चालला आहे; त्यामुळें आम्हां आर्य पुरुषांची धडगत नाहीं, कारण जगांत आमचा कोठें बोज रहात असेल तर तो स्त्रियांजवळ. आणि त्याहि अशा उद्दाम बनूं लागल्या, तर आमचे हाल कुत्राहि खाणार नाहीं.

गुलाबनें सांगितलेली गोष्ट ऐकून हासून पोट भरल्यावर सौ. म्हणाली, ‘ अग गुलाब, असं एकच काय, पन्नास उदाहरणं सांपडतील यांच्या ( ‘ यांच्या ’ बरें का ? ‘ तिकडच्या ’ नाहीं ! ) गैरसावध बोलण्याचीं. एकदा बोलतां बोलतां मला विचारलं, ‘ काय ग, तुझ्या लग्नांतलं मला कांहीं आठवत नाहीं कसं ? मी त्या वेळीं हजर होतों कीं नाहीं ? प्रत्यक्ष जांवयाला आमंत्रण करायची तुझ्या बाबांना तुझ्या लग्नांत आठवण होऊं नये ना ? ’ हें अस्सं–अग, अगदीं खरंच सांगत्यें. अस्संच म्हणायचं झालं. ’

‘ म्हणतील बाई ! पण आपण विषय बदलूं या नाहींतर रागावून हे उठून जातील, ’ असें म्हणून त्या दोघी मैत्रिणींनीं बोलण्याचा विषय बदलला. मला स्वाभाविकच बरें वाटलें. बोलण्यांत मीं बराच भाग घेतला. शेवटीं मोरू–मैनांच्या अशक्तपणावर बोलणें आलें. गुलाबनें बालसंगोपनावर पुस्तकी ज्ञान बरेंच मिळविलें होते. वेगवेगळ्या प्राण्यांचीं दुधें पृथक् करून पाश्चात्य वैद्यांनीं आयांना

काय उपदेश केला आहे, त्याचा अनुवाद करतांना ती म्हणाली, ' आईचं दूध मानवत नसलं तर शेळीचं किंवा गायीचं दूध मुलांना घालावं. सर्वांत उत्तम मार्ग म्हणजे गाढवीचं दूध; कारण त्यांतले घटक आणखी अंगावरच्या दुधांतले घटक बहुतेक सारखेच असतात. '

' तें साहजिक आहे, ' कांहींतरी बोलावयाचें म्हणून मी बोललों.

' काय ? ' जरा डोळे वटारून गुलाबनें विचारिलें, 'साहजिक आहे म्हणजे ? '

' म्हणजे—अहो, म्हणजे सारख्या—म्हणजे आपलं अन् गाढवीचं दूध सारखं असावं यांत नवल नाहीं. कारण गाढवं तरी आपल्या सारखे प्राणीच नाहीं काय ? आमच्या त्रिंबकरावांची बायको क्षयानं आजारी पडली, मुलाची उपासमार होऊं लगली, तेव्हां त्यांनीं दुधाकरतां गाढवी बाळगली ! ब्राम्हणाच्या दारापुढें गाढवी बांधलेली पाहून लोक लागले थट्टा करायला ! '

' खरंच सांगत्यें, काऊ, ' गुलाब म्हणाली, ' गाढवीच्या दुधानं मुलं चांगलीं बळकट होतात. '

' मग गुलाबताई, तुमचीं मुलं इतकीं अशक्त कशानीं हो राह्यलीं ? ' मीं विचारलें.

याच्यावर गुलाब इतकी रागावली कीं, तिचें फेंदारलेलें टोंकदार नाक, आंतल्या घाऱ्या बाहुल्या गरगर फिरत असणारे बटाट्यासारखे मोठे केलेले डोळे व रागानें लाल झालेले पुरीसारखे फुगलेले व कांपणारे गाल पाहून एखादा बोकासुद्धां घाबरून तिच्यापुढें

शेपटीचा गोंडा हालवीत तिची क्षमा मागूं लागता. माझ्या सरळ प्रश्नाचा तिला इतका राग कां यावा, हें मला समजलें नाहीं.

'आप्पा, अगदीं छान बोललांत. पुन्हा सांगा काय म्हणालां तें ?' तिनें विचारलें. मीहि एकंदर रागरंग पाहून तेथून पाय काढून आपल्या खोलींत येऊन बसलों.

तेव्हांपासून गुलाबनें माझ्याशीं जणूं वैर बांधलें. ज्याला आपण बावळट समजतों त्यानें आपल्याला 'जिरविलें' असें वाटून ती माझी फजिती करण्याची संधि पाहूं लागली. पुढें सप्टें-बरांत तिचा नवरा बडोद्यास कॉलेजच्या कामाकरितां गेला असतां ती आमच्याकडे रहाण्यास आली. ऋषिपंचमी जवळ आली अस-ल्यानें आईचें फर्मान सुटलें कीं, उपासाकरितां बिनबैलाच्या श्रमाचे ( किंवा बैलाच्या बिनश्रमाचे ) जिन्नस मिळवून ठेव. तेव्हां तसल्या जिन्नसांच्या शोधांत राहिलों होतों.

एकदा कचेरींतून परत येतांना सासवडच्या बाजूनें एक बैल-गाडी येत होती ती दिसली. तिच्यांत कांकड्या आणि भोपळे भरून मंडईकडे चालले होते. ऋषिपंचमीसाठीं यांतले पदार्थ घरीं नेले तर सर्वांना आनंद वाटेल, असें वाटून मीं गाडीवाल्यास विचारिलें, 'काय पाटील, कांकड्या भोपळे वोपायचे आहेत का ?'

'वोपायचे आहेत, नाहीं तर काय मुळामुठेंत टाकायला जातों आहें व्हय ?'

'मला काय ठाऊक कशाला जातां तें ? पण काय हो, ऋषिपंचमीला चालतील का हे जिन्नस ?' मीं विचारिलें.

मला कांहींएक उत्तर न देतां पाटीलबुवांनीं तंबाखूची एक



काय हो पाटील, हे भोपळे ऋषिपंचमीला चालतील का ?

पिचकारी टाकिली व, ' ह्यांतला एक बैल जरा लंगडतोय्, त्याच्या-बद्दल दुसरा मिळायला ह्या पुन्यांत पंच्याईत नाहीं पडायची ! ' असें पुटपुटत चालते झाले. पुढें हेच जिन्नस दुप्पट किंमत देऊन मंडईत लोकांनीं ' ऋषींचे ' म्हणून विकत घेतले असतील यांत मला तिलमात्र शंका वाटत नाहीं.

तृतीयेच्या दिवशीं रविवारची सुट्टी आली होती; तेव्हां गुंड्याभाऊ, मी, आणखी ऑफिसांतले कांहीं मित्र सायकलीवरून कोथरुडास गेलों. तेथें एका बागेंत विहिरींचें पाणी तेलयंत्रानें बागेस देण्यांत येत होतें. त्या बागेंतून आम्ही वऱ्याचे तांदूळ, पपया, मिरच्या, कोथिंबीर, भाज्या वगैरे ऋषिपंचमीचे जिन्नस विकत घेतले. मग मी आपल्या घरच्या वांट्याचे पदार्थ मोठ्या झोळींत घालून ती पक्या दहा शेर वजनाची झोळी पाठीस लटकावून धापा टाकीत घरीं पोचलों. झोळी स्वयंपाकघरांत टाकून मी घाम पुशीत म्हणालों, ' ही घ्या ऋषिपंचमी ! दोन कोसांवरून ओझें वाहून आणून घामाघूम होऊन गेलों बुवा ! आतां कपभर चहा द्या आमच्या मेहनतीबद्दल ! '

गुलाब त्या वेळीं चुलीशीं खटपट करीत होती; तिनें शांत-पणें विचारिलें, ' तुम्ही स्वतः हें सामान आणण्याचें श्रम घेतलेत ना आप्पा ? '

' होय तर ! ' मी गर्वानें उत्तरलों.

' तर मग हें तुमच्या श्रमाचं ऋषिपंचमीला चालायचं नाहीं ! ' संभावितपणाचा आव आणीत ती म्हणाली.

तिचें बोलणें ऐकून आई, ताक मागण्याकरितां आलेल्या

शेजारच्या ठकूताई, ती सुंद्री, भिकी मोलकरीण, गवळण सगळ्याजणीं मला हांसूं लागल्या. फार काय सांगूं सौ. नें तरी गुलाबला चापावयाचें, पण तीहि हासूं लागली ! स्त्रियांच्या उपहासाला पात्र झालेल्या पुरुषाचें जिणें किती लाजिरवाणें असतें तें, मयसभेंत दुर्योधनाची फजिती त्याला पुढें जन्मभर किती डांचत होती तिच्या वृत्तान्तावरून कळेल. ( विशेष माहितीकरितां रा. रा. कृष्णद्वैपायन पाराशर व्यासकृत महाभारत, पर्व दोन, पहा ) जर एखादा सायकलवाला भर रस्त्यांत आपटला आणि पांच पंचवीस जणांनीं त्याची हुर्यो केली, त्याला जबर दुखापत झाली, स्वतःची सायकल असून तिचा एखादा भाग मोडला, किंवा चिखलानें त्याचे कपडे खराब झाले, तर त्याला फारसें वाईट वाटणार नाहीं; परंतु जर का एखादी बाई त्याला हांसली तर मात्र त्याला मेल्यापेक्षां मेल्यासारखें होईल; मला तर आतां चारपांच बायका हांसूं लागल्या, त्यामुळें माझी अवस्था काय झाली असेल तें सांगणें नलगे. गाढवीच्या दुधावर मीं नकळत केलेल्या कोटीचें उट्टें ऋषिपंचमीस मला बैल ठरवून गुलाबनें काढलें. परंतु माझ्या हातून नकळत झालेल्या कोटीबद्दल तिनें जाणूनबुजून माझा अपमान केला, त्याचा सूड घेतल्याशिवाय मी राहीन काय ?

परंतु माझ्यासारख्या क्षुद्र व्यक्तीला तिचा सूड कोणत्या प्रकारानें घेतां येणार ? आम्ही गरीब लेखक दुसऱ्याची हड्डी नरम करितों, पण ती काठीनें नसून छोट्याश्या टांकानेंच करतों. आम्ही दुसऱ्याला टीकेनें चीत करितों, म्हणजे त्याचें एखादें बिंग बाहेर काढतों परंतु चीत झालेला इसम अगदीं रोजच्यासारखा आनंदांत

असतो, त्याच्या केसाला देखील धक्का लागलेला नसतो. उलट तो अधिकच प्रसिद्धीला आलेला असतो. आम्हीं केलेला खून म्हणजे वांद्रें किंवा चौपाटीवरील बंगल्यांतल्या एखाद्या श्रीमंत शेटजींचा किंवा सुंदर स्त्रीचा असतो ! त्या व्यक्तीस आम्हीं कधींहि पाहिलेलें नसतें आणि खुनाचा उद्देश फक्त रामराव डिटेक्टिवाला काम मिळवून देण्याचा असतो ! आमचे दरवडे इंग्रजी कादंबरीकारांच्या किंवा कथालेखकांच्या संविधानकांवरच पडतात आणि आमच्या चोऱ्या इतर लेखकांच्या लिखाणांतूनच काय त्या केलेल्या असतात. फार तर एखाद्या मित्रानें वाचावयास दिलेला हस्तलेख स्वतःच्या अक्षरानें नकलून नंतर मूळ लेख जाळून टाकून आम्ही त्याच्या लेखनाचें श्रेय स्वतःस घेतों; पण यापेक्षां अधिक खुनशी कृत्यें करण्याची छाती आम्हांला होत नाहीं.

अर्थात् गुलाबवर सूड उगवावयाचा तो लेखनाच्या द्वारेंच उगविण्याचें मीं ठरविलें. एका गोष्टींत नायिकेचें गुलाब हें नांव ठेवून तिची खूप फजिती झालेली दाखवावी व ती गोष्ट बायकांची सभा भरली असतां तेथें वाचून दाखवावी आणि मग आपल्या ओळखीच्या मासिकांत छापवून घ्यावी, असें ठरवून मीं गोष्ट लिहावयास घेतली.

× + × +

## कांटेरी गुलाब.

[ लेखक—**चिमणराव विठ्ठल जोग**, पी. ई. एफ्. ]

राजपूर स्टेट कॉलेजच्या महिला वसतिगृहासारखें आदर्श वसतिगृह इतरत्र क्वचितच दृष्टीस पडेल. प्रत्येक विद्यार्थिनीस राहाण्यास एकेक स्वतंत्र खोली

असून सर्व जणींनीं एकत्र जमावें म्हणून " लक्ष्मी हॉल " बांधलेला होता. या हॉलांत एका कोपऱ्यांत पिंगपॅंगचे टेबल, तर दुसऱ्यांत सोंगट्या खेळण्याचें छोटें मेज, तिसऱ्यांत पत्ते खेळण्याचें टेबल आणि चौथ्यांत एक मोठी थोरली वाज्याची पेटी ठेविली होती. मध्यभागीं मेजें, खुर्च्या, कोचें यांची रेलचेल केली होती व भिंतींवर पौर्वात्य व पाश्चात्य इतिहासप्रसिद्ध स्त्रियांचीं चित्रें लटकाविलेलीं होतीं. या ठिकाणीं कॉलेजच्या विद्यार्थ्यांस दिवसांतून विवक्षित वेळीं येण्याची परवानगी होती. तेवढ्या काळांत विद्यार्थी व विद्यार्थिनी एकत्र होऊन वेगवेगळे खेळ खेळत आमोदप्रमोदांत दंग होऊन जात. शिवाय परस्परांविषयीं मैत्री झाल्यानें विद्यार्थिनींबद्दल भलत्यासलत्या कंड्या पिकविण्याचा दुष्टपणा विद्यार्थ्यांकडून होण्यास आळा पडत असे.

गुलाब आणि शेवंती या दोघी मैत्रिणी फर्स्ट इयरच्या वर्गांत होत्या. या दोघींचें इतकें मेतकूट जमलें होतें कीं, ' यत्र यत्र धूमः तत्र तत्र वन्हिः ' या अनुभववाक्याऐवजीं ' यत्रयत्र गुलाब् तत्रतत्र शेवन्ती ' असें प्रतीक विद्यार्थीवर्गानें प्रचलित केलें होतें. या दोघींच्या रूपाचें वर्णन करावयाचें म्हणजे त्या कामास एखादा कविच पाहिजे. परंतु इतकें म्हणतां येईल कीं, त्या दोन्ही नांवांप्रमाणें सुंदर होत्या. प्रत्येकीचें सौंदर्य वेगळ्या प्रकारचें, परंतु तें सौंदर्यच. तथापि, दोघींचें स्वभाव मात्र भिन्न होते. शेवंती ही अत्यंत शांत, गंभीर आणि प्रेमळ तितकीच गुलाब गडबडी, उथळ व कजाग होती. शेवंतीच्या फुलाचा वास जसा मधुर आणि सूक्ष्मपणानें केवळ रसिकांचेंच चित्त हरण करण्यास समर्थ असतो, त्याचप्रमाणें शेवंतीचा स्वभाव आल्हादकारक होता. उलट गुलाबाचा—त्यांतल्या त्यांत पिवळ्या किंवा पांढऱ्या गुलाबाचा-वास जसा उग्र असतो किंबहुना त्यास जसा दर्प येतो तसा गुलाबचा स्वभाव उग्र किंबहुना दर्पयुक्त होता. तिचें तें उंच टोंकदार नाक तिच्या खवचट कुत्सित स्वभावाची साक्ष देत होतें. तिचे मांजरासारखे घारे डोळे तिच्या निर्दयपणाचे साक्षीदार होते. ती बोलकी होती; इतकेंच नव्हे, तर तिचें बोलणें नेहमीं दुसऱ्यास टोमणे देण्यासाठीं असे. या तिच्या बोचऱ्या स्वभावामुळें विद्यार्थ्यांनीं तिला ' कांटेरी गुलाब ' असें टोपण नांव दिलें होतें. शेवंतीला शांत स्वभावा—

या ठिकाणीं पहिला ताव पुरा झाला. गोष्टींतल्या गुलाबचें उंच नाक, तिचे घारे डोळे, व तिचा कुत्सित स्वभाव यांचें वर्णन खऱ्या

गुलाबला चांगलें शोभेल, अशी माझी खात्री होती. त्यांतल्या त्यांत 'कांटेरी गुलाब' या टोपणनांवाचे कांटे तिला सपाटून बोंचतील व कदाचित् हेंच नांव तिला प्राप्त होईल, अशी मला आशा वाटली. आतां दुसऱ्या तावावर पुनः मजकूर लिहिण्यास मीं प्रारंभ केला:-

* * * *

मुळें "शान्त शेवन्ती" असें अनुप्रासयुक्त टोपणनांव मिळालें होतें.

गणपति आणि शान्ताराम असे दोघे परमस्नेही बी. एस्सी. च्या वर्गांत होते. शांताराम हा अभ्यासांत जरा मागासलेला, परंतु खेळांत प्रवीण होता. गणपतीस खेळांचा कंटाळा, परंतु अभ्यासांत त्याचें लक्ष विशेष होतें. हे दोघेहि मित्र भिन्न स्वभावांचे होते. शांतारामाचा स्वभाव उथळ, बोलका, हासरा, आनंदी, थट्टेखोर असून तो समाजप्रिय होता; तर गणपतीचा खोल, अबोलका, गंभीर असा असून तो माणूसघाण्या नसला तरी एकान्तप्रिय होता. अशा उलट स्वभावांच्या व्यक्तींस परस्परांविषयीं आकर्षण तरी कसें वाटलें असेल, तें एका विधात्याशिवाय किंवा विधात्याचे एजंट जे कथालेखक त्यांच्याशिवाय इतरांस कसें कळणार? अथवा परस्परविरुद्ध असेच पदार्थ परस्परांस आकर्षीत असतात, असें निरीक्षण करणाऱ्यांस सृष्टींत दिसून येईल. ऋणविद्युतच धनविद्युतेला आकर्षिते. समानगोत्र्यांचीं लग्नें जमत नाहींत, तीं याच कारणानें.

शिवाय, कोठेंहि पोकळी असली तर ती हवेनें किंवा पाण्यानें शक्य तोंवर भरून काढावयाची, असा सृष्टिनियम आहे; तद्वतच दोन स्नेह्यांच्या जोडींत परस्परांस पूरक असेच गुण वसावे, असा सहधर्मशास्त्राचा नियम असावा. ज्याप्रमाणें गणपतीचा विरुद्ध प्रकृतीच्या शांतारामाशीं स्नेह जमला, त्याचप्रमाणें विरुद्ध स्वभावाच्या गुलाबविषयीं त्याच्या मनांत प्रेमाचा अंकूर फुटूं लागला. शांतारामास शेवंती आवडूं लागली.

राजपूर कॉलेजांत टेनिस कोर्टांत डबल सेट् मिश्र असत, व या चौकड्या चिठ्या टाकून ठरविण्यांत येत. गणपति व शांताराम या जोडीच्या सुदैवानें तिला गुलाब-शेवंतीची जोडी खेळावयास मिळाली. हीं चौघें टेनिस कोर्टावर एखादा

'सेट्' खेळून नंतर लक्ष्मी हॉलमध्यें जात, आणि तेथें ब्रिजचा डाव टाकून नंतर शेवंतीच्या तोंडचें एखादें मधुर गीत किंवा गुलाबच्या गळ्यांतून निघालेला एखादा 'झंपा' किंवा 'तराणा' ऐकून गुजगोष्टी करीत. तोंच जेवणाची घंटा झाल्यानें निरुपाय होऊन सर्वांस एकमेकांचा निरोप घ्यावा लागे.

गणपतीचें प्रेम गुलाबवर होतें, परंतु तो लाजाळू असल्यानें तिच्याशीं बोलण्यास धजेना. गुलाबजवळ कांहीं बोलावयाचें तर तो शेवंतीमार्फत बोलत असे. गुलाबला गाण्याचा आग्रह करावयाचा तर तो 'शेवंतीताई, आपल्या मैत्रिणीला एखादं गाणं म्हणायला सांगा कीं!' असें म्हणावयाचा. शांतारामाशीं बोलतांना शेवंतीची जीभ अशीच अडथळावयाची त्यामुळें तिनेंहि शांतारामाशीं बोलावयाचें तें सर्व गणपतीस उद्देशून बोलावें. 'काय, गणपतराव, यांना उद्यां अमुक व्याख्यानाला जायचं आहे काय?' अशा द्राविडी प्राणायामानें ती आपले शांताराम-

* * * *

या ठिकाणीं तिसरा ताव सुरू झाला; त्याच्या वरचा मजकूर असा होताः—

* * * *

विषयक प्रश्न विचारी.

एके दिवशीं तीं चौघें टेनिसचा एक सेट संपवून बाकांवर विश्रांति घेत बसलीं होतीं. गणपतरावांनीं शेवंतीस विचारिलें, 'काय शेवंतीताई, आणखी एक सेट खेळायची इच्छा आहे का? आज फारशी गर्दी नाहीं, खूप टेनिस चापायला मिळेल!' अर्थात् हा आग्रह गुलाबला होता हें सांगावयास नकोच.

शेवंतीनें आपली कांहीं हरकत नसल्याचें सांगितलें; तेव्हां गणपतीनें विचारिलें, 'आपल्या मैत्रिणीला विचारा कीं त्या तयार आहेत का?'

गणपति गुलाबशीं कांहीं बोलत नसून शेवंतीशींच सर्व बोलतो, त्या अर्थी त्याचें शेवंतीवर प्रेम असलें पाहिजे; तसेंच शेवंती आपल्याशीं कांहीं बोलत नसून आपल्याशीं जें भाषण करावयाचें तें सर्व गणपतीस उद्देशून करिते, तेव्हां तिचें आपल्यावर प्रेम नसून गणपतीवर असलं पाहिजे, अशी मात्सर्ययुक्त शंका भोळ्या

शांतारामाच्या सरल बालकासारख्या हृदयास भुंग्यासारखी पोखरून राहिली होती. त्याच्या मत्सरभावनेचा आतां कडेलोट झाला.

‘ काय रे गणपति, ’ त्यानें रागाच्या स्वरांत विचारिलें, ‘ गुलाबताईंना प्रत्यक्ष विचारायला काय झालं ? त्या काय लांब आहेत होय ? त्यांच्या मध्यस्थीनं प्रत्येक प्रश्न विचारण्याचं काय कारण ? ”

गणपति बिचारा बावरला. ‘ शांताराम, खरं म्हणशील तर मी ह्यांच्या-( गुलाब )–शीं प्रत्यक्ष बोलायचं टाळतों, हा माझा मला नवीनच शोध आहे ! ’

‘ नवीन असला तरी खरा आहे ! ’ शेवंतीनें त्याला सांगितलें. ‘ आणखी या अपराधाबद्दल तुम्हीं माझ्या गुलाबची क्षमा मागितली पाहिजे, ’

‘ माझी ना नाहीं, ’ गुलाबची क्षमा मागण्याची संधि गणपतीला अलभ्य लाभ वाटली, परंतु तिच्या तोंडाकडे पहाण्याची लाज वाटल्यानें तो भलतीकडे पहात म्हणाला, ‘ ग–ग–गुलाबताई ? मी आपला अपराधी आहें, मला क्षमा करा. ’ आपला लाजाळूपणा घालविण्यास कांहीं तरी मानसिक व्यायाम घेतला पाहिजे, असें त्याला वाटूं लागलें !

हा आपली क्षमा मागण्याच्या वेळींहि आपल्याकडे न पाहतां शेवंतीकडे पाहत होता, हें ध्यानांत येऊन गुलाबच्या मत्सराची एक ज्योत तिच्या जिभेपर्यंत येऊन तिनें क्रोधानें म्हटलें, ‘ असला जुलमाचा रामराम मला नको आहे बरं ! क्षमा अंत:करणापासून आली पाहिजे. ’

‘ आपला ग–ग–गैरसमज होण्यासारखं म–माझ्या हातून काय झालं ? मीं खरोखरच अंत:करणापासून तुमची क्षमा मागितली ! ’ हे शब्द बोलतांना सुद्धां गणपतीची दृष्टि शेवंतीकडे लागली होती. त्यामुळें एखाद्या मांजरीसारखी चवताळून गुलाब म्हणाली, ‘ अंत:करणापासून खरी, पण कोणाच्या अंत.करणा-पासून ? तुमच्या खास नाहीं. शेवंतीनीं नि यांनीं क्षमा मागायला सांगितलं, तेव्हां टाकणं टाकलं झालं. पण माझी क्षमा मागतांना सुद्धां शेवंतीवरची दृष्टि माझ्याकडे फिरली का ? पण जाऊं द्या. मी तरी किती वेडी, तुमच्या आड कशाला येऊं ? ’ असें म्हणून रॅकेट उचलून तिनें वसतिगृहाचा मार्ग धरला. ‘ अग गुलाब, जरा ऐकून तर घे ! ’ असें ओरडणाऱ्या शेवंतीकडे तिनें ढुंकूनहि पाहिलें नाहीं !

* * * *

येथून चौथा ताव सुरू झाला.

*    *    *    *

गुलाब गेल्यावर शांताराम, शेवंती आणि गणपति असे तिघेच तेथें राहिले. गणपति शेवंतीस हलकेच म्हणाला, ' शेवंतीताई, माझा दोष तुमच्यापासून झांकून ठेवण्यांत अर्थ नाहीं; गुलाबबाईच्या पुढें बोलतांना मी अडखळतों, याचें कारण त्यांच्या लक्षांत न येतां त्यांचा भलताच गैरसमज झाला '

एक सुरेख फूल कॉलेजच्या वनस्पतिशास्त्रीय बाफ्यांत उमललेलें शांतारामास दिसलें. तें शेवंतीस आणून देण्यासाठीं तो लपतछपत कुंपणापाशीं गेला होता. कुंपण टेनिस कोर्टापासून वीसपंचवीस पावलांपेक्षां दूर नव्हतें.

गणपति पुढें बोलला, शेवंतीताई त्यांच्यावर माझं प्रेम किती जडलं आहे तें मीं सांगायचं कारण नाहीं. तुमच्या ध्यानांत आलंच असेल. '

' इतकं ध्यानांत न येण्याइतकी कांहीं मी मठ्ठ नाहीं ! ' शेवंती उत्तरली.

शांतारामानें फूल तोडलें आणि, ' शेवंतीचं फूल श्रेष्ठ आहे कीं हें नार्सिस्सस श्रेष्ठ आहे, त्याची परीक्षा करूं या,' असें वाक्य रचून तो परत येणार तोंच ' माझं प्रेम जडलं आहे,' व 'ध्यानांत न येण्याइतकी ' हे त्या दोघांचे शब्द वाऱ्याच्या झुळकेबरोबर त्याच्या कानीं येऊन तो बर्फासारखा थिजून गेला. त्याच्या हातांतील गळून फूल पडलें. हाय ! आपल्या आयुष्याचें पुष्प असेंच मातींत पडून मातीमोल होणार काय ? तो त्या दोघांच्याकडे जड पावलानें आला. नंतर आपला ब्लेझर कोट खांद्यावर आणि फेल्ट टोपी डोक्यावर कशीबशी टाकून त्यानें रॅकेट घेतली आणि शेवंतीस म्हटलें, " एकूण असं आहे ना तर ? "

" असं म्हणजे कसं ? " गणपतीनें गुलाबसंबंधीं उच्चारलेलें वाक्य शांतारामानें ऐकिलें असें समजून ती हंसत म्हणाली.

" तें आपल्या मनाला विचारा ! " मग गणपतीकडे वळून तो म्हणाला, " खरोखर गणपति, तूं असा अविश्वासू मित्र असशील, असं मला नव्हतं वाटलं ! "

" तें कसं ? " गणपति दचकून म्हणाला.

" तें आपल्या मनाला विचार ! " असें ठसक्यानें बोलून उजव्या हातांत

रॅकेट व डाव्या हातांत मफलरची गुंडाळी घट्ट धरून शांताराम पाय आपटीत चालता झाला.

“ हा काय प्रकार ? ” शेवंतीनें गणपतीस विचारलें.

“ आतां याला काय उपाय ? तुमचं नि माझं प्रेम एकमेकांवर जमलं आहे, असा या दोघांचाहि समज झाला आहे. आतां त्यांच्याशीं बोलायला जावं तरी दोघंहि ऐकून घ्यायचीं नाहींत, ” शेवंती म्हणाली.

‘ मला वाटतं, आपण त्यांना पत्र लिहून त्यांचा गैरसमज दूर करावा,’ गणपतीनें सुचविलें. हाच मार्ग त्यांना पसंत पडला; कारण गणपति व शेवंती हीं दोघेंहि लाजाळू असल्यानें तीं प्रत्यक्ष भेटून आपआपल्या प्रियजनांचा रुसवा घालवतील हें शक्य नव्हतें. अखेर गणपतीनें सायकलवरून शहरांत प्रयाण करून कांहीं गुलाबी नोटपेपर—पाकिट आणिलीं. त्यांतील एकदोन त्यानें शेवंतीस दिलीं. मग तो आपल्या खोलींत येऊन गुलाबला पत्र लिहिण्यास बसला. दोन-तीन वेळ त्यानें पत्राचे मसुदे केले. काय लिहावें म्हणून डोकें खाजवावें तों भांग विस्कटावा; पुन्हा भांग काढून पत्रास प्रारंभ करावा तों डोकें खाजवावें लागून पुनः भांग खराब व्हावा, असें दहावीस वेळां झालें. शेवटीं एकदाचें पत्र तयार झालें. पत्र टेबलावर ठेवून तो लिफाफ्यावर पत्ता लिहीत आहे, तेवढ्यांत आपण तें वाचू या. या प्रिय वाचक, असें हळूंच त्याच्या खांद्यावरून त्याच्या पत्रांतील मजकूर वाचण्यास उभे रहा, आणि वाचा तें पत्र ! अगदीं संकोच धरूं नका. जवळ कोणी नसतांना लोकांचीं पत्रें तुम्ही जशीं चोरून वाचतां त्याप्रमाणें हें वाचा. हें पत्र शेवंती गुलाबला, व त्याच्या बदली शेवंतीनें शांतारामास लिहिलेलें पत्र गणपति शांतारामास, नेऊन देणार आहे. गणपतीनें लिहिलेला मजकूर असा होताः—

या ठिकाणीं माझा चौथा ताव पूर्ण होऊन पत्र पांचव्या तावावर लिहिलेलें, होतें, तें असेंः—

* * * *

“ प्रिय गुलाब !

“ मीं जरी तुला प्रत्यक्ष नेहमीं अहोजाहोनें संबोधतों तरी या पत्राच्या द्वारें मी आपलें हृदयकपाट तुला उघडून दाखवीत आहें. तुला दिसेल कीं या माझ्या हृदयांत विक्रांतानें सरोजिनीस (किंवा दुसऱ्या कोणीं दुसऱ्या कोणास तरी) म्हटल्या-

प्रमाणें " बहुवचनाला जागा नाहीं. " म्हणूनच तुला मी या पत्रांत एकवचनानें संबोधीत आहें, याची क्षमा कर.

" गुलाब ! जरी तुझी वाणी कठोर असली तरी तिचा उगम तुझ्या प्रेमळ रमणीहृदयांतून झालेला असतो. तुझ्या कटूक्तीमुळें जरी तुला ' कांटेरी गुलाब ' असें छिद्रान्वेषी जनजिव्हारूपी नागिणीनें नांव दिलें असलें तरी मला तुझ्या कांट्यांची भीति वाटत नाहीं. पुष्पाचा सुवास मिळविण्याची महत्त्वाकांक्षा बाळगणाऱ्या मानवी मनुष्याच्या मोठ्या मनास कंटकांची भीषण भीति स्पर्श करूं शकणार नाहीं. तुझ्या उंच नासिकाग्राबद्दल जनतेला कांहीं वाटो, मला मात्र तुझें उंच नासिकाग्र हिमालयाच्या गगनचुंबी शिखराप्रमाणें आल्हादकारक वाटतें, आणि तुझे घारे डोळे गुरुशुक्रांच्या युतीसारखे मंगलकारक वाटतात. काल जरी तूं मला कठोर शब्दांचा प्रहार केलास तरी त्या कठोर शब्दांचें प्रयोजन नव्हतें. माझ्या लाजाळू आणि भिडस्त स्वभावामुळें आपली नित्य भेट होत असूनहि माझ्या मानसांतील प्रीति मी व्यक्त करूं शकलों नाहीं. हा पत्ररूपी हंसदूत हें कार्य करील. विशेष काय लिहूं ?

सर्वस्वीं तुझाच

**कोण बरें ?**

* * * *

' अहो मिस्टर जोग ! चला त्या रोडक्या गणपतीपुढें आज हवालदारांचं व्याख्यान आहे, चला लौकर, कपडे पेहेरा ! ' नथोबा बेहेरे मला हांक मारीत आले. मला हवालदारांचीं व्याख्यानें फार आवडत. मीं आपला लेख अर्धवट टाकून तशीच कोटटोपी चढविली व बाहेर पडलों. दारांतच आमचा मोरू मला आडवून पतंग करण्यास कागद मागूं लागला. त्याला टेबलावरचे चार कागद घेण्यास सांगून नथोबाबरोबर व्याख्यानास निघून गेलों.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं मीं अर्धवट झोपेंत होतों. गोष्ट पुरी करून सगळ्यांना वाचून दाखवावी म्हणजे सगळींजणें गुलाबची

खूप चेष्टा उडवितील असे विचार मनांत येऊन मी खूष होऊन गेलों होतों. इतक्यांत गुलाब आली व म्हणाली, ‘ आप्पा, जरा एक निरुपयोगी कागद द्या हो ! ’

मी पांघरूण फेंकून उठलों आणि टेबलाशीं जाऊन एक कागद तिला दिला. कागद देतांना मघांचे विचार डोक्यांत घोळत असल्यानें मी स्मितहास्य करीत होतों. ‘ कागदावर कांहीं लिहिलें आहे वाटतें,’ असें म्हणून गुलाबनें कागद वाचण्यास प्रारंभ केला. दोनतीन वाक्यें वाचतांच ती चवताळलेल्या नागिणीसारखे उसासे टाकूं लागली व दोनतीन मिनिटांनीं कागद हातांत घट्ट धरून ओरडून म्हणाली, ‘ आप्पा, काय हें ? शोभतं का तुम्हांला ? काऊ, अग काऊ, इकडे ये ग--’

सौ. धांवतच आली व ‘ काय झालं ’ असें विचारती झाली.

“ वाच. हा बघ तुझ्या पतिराजांचा पराक्रम ! ’ असें म्हणून गुलाबनें तिच्या हातांत कागद दिला. दोनतीन वाक्यें वाचतांच तिचे डोळे खदिरांगार कीं काय म्हणतात तसे लालबुंद झाले आणि कागद वाचणें संपवून माझ्यापुढें कागद करून ती ओरडली, “ काय हा चावटपणा ! ”

तो कागद म्हणजे गणपतीनें गुलाबला लिहिलेलें पत्र होतें ! मी हंसून म्हणालों, “ अग हें—”

“ आतां हंसून गोड करतां कां ? बिचारी चार दिवस माझ्या ( वाचक हो ! ‘ माझ्या ’ बरें का ? ‘ आपल्या ’ नाहीं ! ) इथें राहायला आली तर हें असं घाणेरडं पत्र लिहितां तिला ? ”

“ अग हें तिला नाहीं—” मी म्हणालों.

" मग कोणाला, **मला ? माझं** नांव गुलाब आहे ? **माझ्या** नाकाचा शेंडा उंच आहे ? **माझे** डोळे घारे आहेत ? " सौ. ठसक्यानें म्हणाली.

" अन् ' कांटेरी गुलाब, ' बरं का काऊ ? खूप आहेत बाई तुझे यजमान ! आपल्या बायकोची मैत्रीण चार दिवस पाहुणी आली तर तिची ही अशी विटंबना करायची काय ? बावळे दिसतां पण खूप आहांत—गोगलगाय नि पोटांत पाय ! " गुलाब रागानें कांपत फणफणली.

" खरंच ग बाई, हे असे आहेत असं अजून मला कधीं वाटलं नव्हतं ! फार सालस आहेत, असं वाटत होतं हो ! पण मेली पुरुषाची जात, केव्हां वळणावर जाईल याचा नेम नाहीं ! " असे उद्‌गार काढून सौ. स्फुंदूं लागली.

तिच्या हातून कागद घेऊन गुलाब त्याच्याकडे आपली क्रुद्ध घारी दृष्टि फेंकीत म्हणाली, " हँ, पाहूं काय लिहिलं आहे तें ! काय मुक्ताफळं दिसताहेत पण ! काऊच्या नथींत जरी खोटे मोती असले तरी इथें ते झळकताहेत चक्‌चक् ! म्हणे ' माझ्या लाजाळू आणि भिडस्त स्वभावामुळें ' ! वाहवा रे लाजाळू ! असले दहापांच लाजाळू नि पांचदहा भिडस्त एका जागीं झाले तर बायकांना जिवंत राहायची सोय नाहीं रहायची ! ' काल कठोर शब्दाचा प्रहार केला—' म्हणजे ऋषिपंचमीचा बैल म्हणाल्यें, तेंच ना ? त्याच्याहिपेक्षां पलीकडचे आहां तुम्ही, समजलांत ? "

" जाऊं दे ग गुलाब, समजलं मला सगळं कांहीं. माझ्या नशिबांत सुख नाहीं ! " सौ. मोठ्यानें गळा काढून म्हणाली.

गुलाब तिला मिठी मारून स्फुंदूं लागली.

मला बोलण्याला संधि मिळाली; तिचा फायदा घेऊन मी म्हणालों, " हें पहा, तुम्ही वेड्यासारख्या रडतां काय ? माझं ऐकून तर घ्या. "

" हँ, शांगा बरं एकदां ! " गुलाब वेडावून म्हणाली.

' हें पत्र मीं लिहिलं नाहीं ! '

' मग हें काय, न लिहिलेलं पत्र आहे कीं काय ? ' कागद मजपुढें धरून गुलाबनें पुसलें.

' हें पत्र मीं लिहिलेलं नाऽऽहीं ! ' मी हासत पण जोरानें म्हणालों.

' मग हें अक्षर कुणाचं आऽऽहे ? ' माझ्या स्वराचें अनुकरण करीत गुलाबनें विचारलें.

' जाऊं द्या, एका पापांत खोटं बोलण्याची कशाला भर घालतां ? हें आपलंच अक्षर आहे बरं महाराज. लपवाछपवी करून कांऽहीं चालायचं नाहीं ! ' रडें थांबवून सौ. म्हणाली. म्हणणें थांबल्यावर पुनः पहिल्यासारखें रडें चालू झालें. इंजिनची गति जशी ड्रायव्हरच्या ताब्यांत त्याप्रमाणें रडण्याची गति बायकांच्या पूर्ण ताब्यांत असते.

' अहो, तें पत्र खरं नसून माझ्या गोष्टींतल्या नायकानं नायिकेला लिहिलेलें आहे ! का, ह्यः ह्यः ह्यः ह्यः ! ' मीं समजाविलें. परंतु त्यांची खात्री होईना.

' गोष्टींतल्या नायिकेचं नांव गुलाब, आणखी तिचे नाकडोळे

माझ्यासारखे, आणखी तीहि त्याला कठोर शब्द बोलली होती !— इतकं सगळं कसं हो जमलं ?' गुलाबनें शंका व्यक्त केली.

'तें जमलं कसं हें मी नंतर सांगेन, पण हें माझ्या गोष्टींतलं एक पान चुकून तुमच्या हातांत मीं दिलं. प्रत्यक्ष पुरावा म्हणून हीं पहा बाकीचीं पानं !' असें म्हणून मी पहिलीं चार पानें दाखविण्यासाठीं आणण्यास टेबलाशीं गेलों. पण टेबलावर तीं नव्हतीं. कदाचित् पुडांत टाकलीं असतील म्हणून पुडें उघडलीं; परंतु त्यांतहि दिसलीं नाहींत. 'ऑ, काय झालीं ?' असें मी पुट-पुटलों व सगळीकडे शोधूं लागलों.

'उगाच शोधायचं ढोंग कशाला करतां ? गोष्ट नाहीं न् बिष्ट नाहीं, थाप मारून पाहिली झालं !' सौ. म्हणाली.

मी खोलींत सर्व जागीं शोधलें. कदाचित् खोलीच्या बाहेर आलीं असतील म्हणून खोलीबाहेर निघावें तों तेथें त्या दोघी वाट अडवून उभ्या होत्या. मीं रुमालानें डोकें पुशीत निराश होऊन खुर्चीवर अंग टाकलें आणि माझ्या शीलाबद्दल, स्वभावाबद्दल व इतर गोष्टींबद्दल गुलाब आणि सौ. कृत अनुदार टिका ऐकत स्वस्थ पडलों मी इतका वाईट असेन असें मला अद्याप वाटलें नव्हतें. बराच वेळ ही टीका होऊन नंतर 'या घरांत मला पाणीहि घ्यावयाचें नाहीं !' अशी प्रतिज्ञा करून गुलाब घरीं जाण्यास निघाली. माझ्या घोर अपराधामुळें मी कांहीं बोलूं शकें ना. माझ्या भावी बेअब्रूच्या भीतीनें मला सर्व जग मरुभूमीप्रमाणें वाटूं लागलें.

तोंच चि. मोरू धांवत येऊन तक्रार करूं लागला. 'आप्पा !

पहा हो, मीं काल दोन पतंग केले ते या मैनिट्‌लीनं फाडले ! मला आतां दुसरे कागद द्या—अं अं अं ! '

' जा, ते फाडलेले पतंग घेऊन ये, मी दुरुस्त करीन, ' मीं




उगाच इतका वेळ डोकेफोड केलीत तुम्ही !

त्याला सांगितलें. इतका वेळच्या माथेफोडीनंतर ह्या उद्योग मला बरा वाटला.

मोरूनें ते पतंग आणिले. प्रत्येक पतंग दोन ताव एकत्र चिटकावून तयार केलेला होता; असे दोन पतंग चार तावांचे झालेले होते.

आणखी हे ताव कोणते होते? ओळखा बरें! मीं ज्या चार तावांवर गोष्ट लिहिली होती तेच हे ताव होते!

'ही पाहिलीत माझी गोष्ट! हीं तिचीं पहिलीं चार पानं! मोरूनं यांचे पतंग केले. बाकीचं तें पत्राचं पान मीं चुकून गुलाबताईना दिलं, तें पांचवं होतं. हीं सगळीं पानं वाचा म्हणजे हें माझं पत्र नसून गोष्टींतलं आहे, हें तुमच्या लक्षांत येईल. उगाच इतका वेळ डोकेफोड केलीत तुम्हीं दोघींनीं मूर्खासारखी!' जयशाली स्वरानें त्या दोघींपुढें पतंग फडफडावीत मी म्हणालों!



# झोळवण.



आज सकाळीं नित्याप्रमाणें चि. वज्रचुडेमंडित सौ. चिमूताई टपालवाल्याची वाट पहात होती. टपालवाला हा मोठा भाग्यशाली प्राणी आहे. तो पहा, ह्या घरांतून त्या घरांत कसा विजेसारखा सकाळच्या उन्हांत तळपणाऱ्या कोऱ्या खाकी पोषाकाच्या ऐटींत चमकत आणि हातांतील देणग्यांचा उत्सुक स्त्रीपुरुषांवर व मुलाबाळांवर वर्षाव करीत चालला आहे ! तो पहा, जवळ जवळ येऊं लागला. चि. सौ. चिमूताईची छाती आतां औत्सुक्यानें धडधडूं लागली. "अहो, आमचं कांहीं आहे का ?"—"काय हो, ढेकणे आहे का—असेल असेल पहा ! कृष्णाजी नरहर ढेकणे—काय, नाहीं ?" अशा प्रश्नांनीं भंडावणाऱ्या लोकांच्या घोळक्यांत तो सांपडला. बरें आहे, तो आपल्या जवळ येईपर्यंत आपण त्याच्यावर एक गद्य—काव्य करूं या. ऐका.

\+ \+ \+ \+

हे भाग्यशाली पोस्टमना ! दररोज जितक्या उत्सुकतेनें जितके लोक तुझी मार्गप्रतीक्षा करीत असतात, तितकी उत्सुकता तितके लोक दुसऱ्या कोणाचीहि वाट पहातांना दाखवीत नाहींत. चकोर चंद्रिकेची वाट पाहतो ती अमावस्येच्या आगेंमागें चार-चार दिवस त्याला तहकूब ठेवावी लागते; परदेशीं गेलेल्या व्यापाऱ्यांच्या स्त्रिया पतींची, मोर मेघांची, आणि बेडकें पावसाची वाट मृगनक्षत्रांतच काय तीं पहातात; मुलें, मास्तर व प्रोफेसर

सुट्टीची मार्गप्रतीक्षा वर्षांतून दोनदांच करतात; विरही दांपत्यें कांहीं काळपावेतोंच परस्परांकरितां जिवाचें रान करितात; चोर फक्त कृष्णपक्षांत रात्र केव्हां होईल म्हणून वाट पहात टपून बसलेला असतो; लेखक आपल्या लेखाच्या अपेक्षित वेळींच मासिकाच्या अंकाची वाट पहात असतो. परंतु आबालवृद्ध स्त्री-पुरुष दररोज सकाळीं तुझी मोठ्या उत्कंठेनें अपेक्षा करीत असतात.

सुशिक्षितांचा पत्रव्यवहार मोठा व बहुविध असतोच, परंतु अशिक्षित स्त्रीपुरुषहि परगांवच्या आप्तेष्टांचा ‘ कागुज ’ केव्हां येईल म्हणून तुझ्या वाटेकडे डोळे लावून बसलेले असतात. एकाद्या परपुरुषाच्या करितां दिवसानुदिवस झुरणें हें तरुण स्त्रियांस अक्षम्य असतें, परंतु तुझ्या बाबतींत मात्र त्यांना, “केव्हां येईल बरं तो....? नऊ वाजले तरी तो अजून कां येत नाहीं ? ” इत्यादि मनमोकळे उद्‍गार काढण्याची पूर्ण मुभा आहे. हे टपालवाल्या! शेंकडों तरुण स्त्रियांस दररोज आपली वाट पहावयास लावणाऱ्या तुझ्या भाग्याचा तरुणांनीं हेवा कां करूं नये ?

ज्याप्रमाणें तरुण स्त्रियांस ‘ टपालवाला ’ या पुरुषाची बिन-दिक्कत वाट पहातां येते त्याप्रमाणें तरुण पुरुषांसहि उजळ माथ्यानें एका स्त्रीची वाट पहातां येते. उदाहरणार्थ, हा पहा अरविंद डायरी घेऊन मोठ्यानें स्वगत भाषण करीत आहे:

“ अजून कां बरं ही येत नाहीं? ही येऊन ( डायरी चाळून पहातो ) पंधरा दिवस होत आले, तरी ठिकाण नाहीं. दर आठ दिवसांनीं येण्याचं कबूल करून हें असं काय ? किती वाट

पहायला लावायची लोकाला ? छे, छे, आतां आली कीं तिला ताकीद दिली पाहिजे. ”

मालतीनें हें भाषण चोरून ऐकिलें व ती अरविंदची कान-उघाडणी करूं लागली. शेवटीं तिनें ती डायरी उघडून, पंधरा दिवसांपूर्वी ही कोण अवदसा आली होती तें पाहण्यासाठीं, पंधरा दिवसांपूर्वीचें पान काढिलें. त्यांत होतें:—

| | | |
|---|---|---|
| शर्ट | ४ | |
| कॉलरी | २ | शिवाय मागील |
| नेकटाय | १ | १ कोट राहिला |
| विजारी | २ | आहे. |
| पातळ | १ | |
| पोलके | २ | |

—

## १२ बारा

तेव्हां मालती हंसून म्हणाली, “ अगबाई, परटीऽण! इश्श! ”

\+ \+ \+ \+

टपालवाल्यानें माझ्या हातांत दोन पत्रें दिलीं. त्यांपैकीं एक चिमूताईच्या नांवचें होतें, तें, “ घ्या हो एकदांच आत्मारामपंतांचं पत्र आलं, ” अशी थट्टा करून तिला दिलें. दुसरा आमचा एका मासिककर्त्याकडून नापसंत होऊन परत आलेला लेख होता. चिमूताईला नवऱ्याचें पत्र पाहून इतका आनंद झाला कीं, तो तिच्या गगनांत ( पोटांत ) मावेना. खुदूकन् हासून पत्र घेऊन तें वाचण्यासाठीं ती एकान्त स्थळीं गेली. तिची वहिनी तिचा

पाठलाग करीत धांवत गेली, हें एकपरी बरें झालें. कारण मासिकांकडून नापसंत होऊन परत आलेल्या लेखांवरून ती माझी नेहमीं थट्टा करीत असते; आणि दहा संपादकांकडून धक्के खाऊन परत आलेला माझा तो लेख पाहून तिच्या मिस्कीलपणाला फारच चेव आला असता.

दहा ठिकाणीं नापसंत झालेल्या मुलीच्या बापाच्या अंतःकरणाची प्रतीति तो लेख फोडून पहातांना मला आली. या अरसिक संपादकानें लेख परत करतांनाः—

सा. न. वि. वि. साहित्यसेवा दोन प्रकारांनीं होत असते. ( १ ) लेख वगैरे साहित्य निर्माण करून, व ( २ ) प्रतिभाशाली लेखकांचें साहित्य वाचून. यांपैकीं २ रा मार्ग आपल्याला श्रेयस्कर आहे. आपण न लिहाल तरच वाङ्मयाचें प्रचंड हित होणार आहे व तें आपण साधावें अशी विनंति आहे

असा शेरा दिला होता. त्याचा मला फार राग आला. या फाजील माणसाला असा बनवावा कीं ज्याचें नांव तें !

" ऐकलं का ? बापूरावांचं पत्र वाचून वन्सं ओक्साबोक्शीं रडत आहेत. विचारावं तरी त्यांना पत्रांत असं काय आहे म्हणून ? " सौ. येऊन म्हणाली.

" असेल कांहीं प्रेमकलह ! " असें मीं म्हटलें, परंतु रहावेना. तसाच उठलों व चिमूताईपुढें जाऊन उभा राहिलों. " काय गं ताई, रडायला काय झालं ? बापूरावांची प्रकृति बरी आहे ना ? "

" चांगली आहे, त्यांना काय आली आहे धाड ? " थरथर कांपणारे ओठ आणि पाण्यानें थबथबलेले डोळे मजकडे करून ती रागानें म्हणाली.

' अग मग रागावलीस कशानें ? ' मीं विचारिलें.

मला तोंडीं उत्तर न देतां चिमूताईनें नवऱ्याचें आलेलें पत्र मजपुढें चोळा करून फेंकिलें. पतीनें पत्नीस लिहिलेलें पत्र उघडपणें तिऱ्हाइतानें वाचूं नये असा जरी शिष्टाचार आहे, तरी तिनें मुद्दामच तें पत्र दिलें असल्यामुळें मीं वाचिलें. त्यांत पुढें दिल्याप्रमाणें मजकूर होता:—

पणतू यांची चाळ,<br>
जुन्या गिरगांव पोस्टाजवळ,<br>
मुंबई ४.

अनेक आशिर्वाद विशेष—

तुझीं तीन आणि तुझ्या विद्वान शिष्टंमन्य बंधुराजांचीं चारपांच अशीं बरींचशीं पत्रें पावलीं. मी ज्या पोष्टखात्यांत नोकर आहें, त्या खात्याला तुमच्याकडून मिळालेल्या या उत्तेजनाबद्दल तुमचा फार आभारी आहें; परंतु तुमच्याकडून येणाऱ्या पत्रांचा मारा असह्य झाल्यानें एकच पत्र लिहीत आहें; यावरून काय तें समजा.

तुझा आणि माझा विवाह झाला; म्हणजे माझीं वडील माणसें आणि तुझीं वडील माणसें यांच्यामध्यें करारमदार झाले, उपाध्यांना दक्षिणा मिळाली व इतरेजनांस मिष्टान्नभोजन मिळालें, माझ्या आईचे मानपान झाले, करवल्यांचे तंटे झाले; पण नवरदेवाच्या भावनांची कोणीं चौकशी केली काय ?

तूं तर मान वरती करून नुस्तें मजकडे पाहिलेंहि नाहींस ! मग मजवर प्रेम जडण्याचें नांवच नको !

मीं तुला एकदां पाहून पसंत केलें, म्हणजे तूं निखालस कुरूप नाहींस इतकी मीं आपल्या मनाची खात्री करून घेतली; आणि माझा रुकार वडिलांस कळविला.

परंतु हाय ! हा रुकार वडिलांस कळविला तेव्हांच मीं तुला दुबळीला बळी पाडिलें. अभेद्य विवाहशृंखलेनें माझ्या एका भगिनीला माझ्यासारख्या खांबाशीं जखडून टाका असें सांगितलें ! धिक्कार असो माझ्या भिडस्तपणाला ! माझें तुजवर निरतिशय प्रेम नसतांच तुझ्याशीं लग्न केलें ही माझी चूक झाली. मग मला

वाटलें कीं, सहवासानें तरी तुजवर प्रेम जडेल; परंतु चिमूताई ! मंगळागौरीला पनवेलीस आली होतीस तेव्हां मीहि तेथें आलों होतों. परंतु लग्नाच्या दावणीनें दोन व्यक्तींचीं आयुष्यें जरी जखडलीं जात असलीं तरी त्यांचीं अंतःकरणें, त्यांचीं हृदयें, त्यांचीं मनें, त्यांचीं चित्तें, एकत्र बद्ध, निगडित, आणि सुजडित होण्यास लग्नाची दावण पुरत नाहीं. डॉक्टर भांडारकर यांनीं संस्कृत दुसऱ्या पुस्तकाच्या कितव्याशा धड्यांत म्हटलें आहे–

व्यतिषजति पदार्थान् आन्तरः कोपि हेतुः ।
न खलु बहिरूपाधीन्प्रीतयः संश्रयन्ते ॥

म्हणजे आंतला–अगदीं कुपींतला–असा हेतु पदार्थांना चिकटवितो; उदाहरणार्थ, गोंद. लग्नासारख्या बाह्य उपाधींवर प्रीति अवलंबून असत नाहीं. मी प्रेमाचा भुकेला आहें, ध्येयाचा तहानेला आहें.

आणि तूं ? तुझ्या त्या कातकरणीसारख्या झिप्रया, आई आदिमायेसारखें कुंकू, कोंकणांतल्या भटिणीसारखें तें तुझें नेसणें, मारक्या म्हशीसारखें टवकारून पहाणें, खो खो करून पुरुषासारखें मोठ्यानें हंसणें; या तुझ्या गुणांनीं माझें चित्त बांधलें जाइल ( गुण शब्दावर श्लेष आहे ) असें का तुला वाटतें ? ज्याप्रमाणें नेपोलियनच्या कोशांत ‘ अशक्य ’ शब्द सांपडणें अशक्य होतें, त्याप्रमाणें कटाक्ष, मंदस्मित, गजगति, हे शब्द तुझ्या कोशांत सांपडणें मला अशक्य वाटतें. हरिणींचें कटाक्ष न स्वीकारितां त्यांच्या द्रुत उड्या तूं मिळविल्या आहेस आणि हत्तिणीच्या गतीऐवजीं तिच्या बारीक डोळ्यांतला जडपणा तुझ्या वांट्याला आला आहे. हें असलें रत्न माझ्यासारख्या ध्येयवाद्याला काय उपयोगी ? माझी, ‘ पंकभवा ! ’ ही हृदयस्पर्शी, मर्मच्छेदी, भावनाहलवी लघुकथा तुला मोठ्या हौसेनें वाचून दाखवूं लागलों, तेव्हां त्यांतील उत्कट करुणरसानें डोळ्यांतून पाणी काढण्याऐवजीं तूं आपले जांबुवंती दांत काढून हासलीस ! तर माझ्या मानवी स्वभावाचें मार्मिक निरीक्षण ग्रथित करून लिहिलेल्या नाट्यछटांचें मर्म तुला कसें आकलन होणार म्हणजे कळणार ? मानवी व्यक्तींच्या भावनांचे, आचारविचारांचे व व्यवहारांचे सूक्ष्म धागे कुशल विणकऱ्याप्रमाणें गुंफून मानसशास्त्रविषयक कथानकें रचण्याची महत्त्वाकांक्षा धरणाऱ्या या महाराष्ट्राच्या भावी कादंबरीकाराला तुझ्यासारख्या रुक्ष, अन्‌रोमॅन्टिक ‘ ठकी ’ बरोबर जीवितयात्रा कंठावीसें वाटणें शक्य आहे काय ?

म्हणूनच प्रेमाच्या आद्य शाहिरानें आपली रोमान्सशून्य जगदंबा त्यागिली व दुसरी सहधर्मचारिणी केली ! याच कारणानें महाराष्ट्र रंगभूमीवर सदैव नव-कल्पनोदय करणाऱ्या नवचेतनाच्या जासुदानें आपल्या मनोभूमिकेशीं तादात्म्य न होणाऱ्या बायकोचा धिक्कार केला !

मीहि महाराष्ट्राचा भावी कवि, नाटककार आणि कादंबरीकार होणार आहें. सध्यां ज्या लेखणींतून दरमहा ऐशीं रुपड्यांसाठीं जनरल पोस्टाच्या लेजर बुकांत खरडलेल्या इंग्रजी आंकड्यांशिवाय दुसरें कांहीं उतरत नाहीं, त्याच या लेखणींतून केशवसुतांनीं म्हटल्याप्रमाणें अशीं अक्षरें बाहेर पडणार आहेत कीं, हजारों लोक तीं आपल्याशींच गुणगुण करीत रहातील ! पण तुझ्यासारख्या अरसिक ठोंबीला हें हृद्गत सांगून काय उपयोग ? तुझ्यासारख्या पुरातन स्त्रीच्या वडसावित्रीशीं उच्च वातावरणांत भराऱ्या मारणाऱ्या माझ्यासारख्या नवयुवकानें लग्न करणें म्हणजे एअर मेलमध्यें ४४० तोळ्यांच्या वरच्या वजनाचीं फॉरिन पार्सलें कोंबून विमानांच्या भराऱ्या जमिनीसरपट करून टाकण्यासारखें आहे.

ठरलें. तुझा त्याग केल्याशिवाय मला माझीं उच्च ध्येयें साध्य करतां येणार नाहींत. पूर्वी साधुसंत ज्याप्रमाणें विवाहित स्त्रीची बेडी तोडून भक्तीनें आपलें ध्येय जें श्रीविठ्ठल तें साध्य करण्यास जात असत, त्याप्रमाणें आम्ही आपल्या विवाहित स्त्रीचा त्याग करून आमचें जें ध्येय चारचौघांत सांगण्याची आमची इच्छा नाहीं तें प्रीतीनें साध्य करणार ! कारण मी स्वतंत्र वृत्तीचा शाहिर आहें लग्नासारख्या जुन्यापुराण्या चिंध्यांना कवटाळून प्रेमस्वातंत्र्याच्या शेलेपैठण्यांचा अव्हेर हा उमार खय्यामचा अनुयायी फकीर कधींहि करणार नाहीं. बंधनाच्या पलीकडे ! हेंच माझें ब्रीद आहे.

असो. आतां यापेक्षां अधिक लिहिणें म्हणजे, गाढवापुढें ( कठोर व ग्राम्य शब्दाबद्दल क्षमा कर. ) गायली गीता, कालचा गोंधळ बरा होता, त्याप्रमाणें स्थिति करून घेणें होईल. तुला माझ्याकडे येण्याचें कारण नाहीं. एक महिन्यापूर्वी तुमचे शहाणे बंधुराज तुम्हांला घेऊन येथें आले होते. त्यांचें अगाऊ पत्र मला पावलें होतें. मुद्दामच मी तुम्ही येण्याच्या वेळीं खोलीस कडीकुलूप ठोकून बाहेर गेलों होतों व शेजाऱ्यांस, " मी बाहेरगांवीं जात आहें " असें सांगून ठेविलें होतें. तुम्ही निराश होऊन चिमुकलीं तोंडें करून परत गेलां तेव्हां तुम्हां भावं-

डांचीं नांवें सार्थ झालीं असतील यांत शंका नाहीं. तीं मला पहावयास मिळालीं नाहींत एवढेंच वाईट वाटतें !

असो. आतां हें माझें तुला शेवटचें पत्र आहे. माझा मार्ग मला मोकळा आहे व तुझा तुला मोकळा आहे. हिंदु कायद्याचा अवास्तव फायदा घेऊन मी तुझा ताबा मागेन असें समजूं नको. तुझ्या स्वातंत्र्याआड मी कधींही येणार नाहीं. आमच्या सासूबाईस व भावोजीस शेवटचे नमस्कार सांगावे. कळावें.

आपला लौकिक पति

**आत्माराम रघुनाथ साने.**

हें पत्र वाचतांच माझ्या मनाची भयंकर खळबळ उडाली. इतके दिवस मला वाटत होतें कीं, चिमीचे सासूसासरे जरी तिच्यावर नाराज झाले होते, तरी निदान तिचा नवरा तिला अनकूल असेल. परंतु या पत्रानें त्या आशेच्या चिंधड्या उडाल्या. मुलीला सासरचीं माणसें असलीं म्हणजे तिचा नवरा थोडाबहुत ताळ्यावर रहातो; परंतु तींहि जर का उलटलीं तर पंचायतीची वेळ येते. चि. सौ. चिमूताईचें लग्न लांबून आम्हांला खर्च पडूं नये म्हणून आमच्या श्वशुरांनीं रा. आत्मारामपंतांस ऑफिसांतून दोन दिवसांपेक्षां अधिक रजा मिळूं न देण्याची मसलत केली. ही गोष्ट कांहीं काळानें चिमूचे सासरे रघुनाथपंत यांस कळाल्यावर त्यांनीं जें एक जळजळीत पत्र मला लिहिलें, तें जर मीं प्रसिद्ध केलें असतें तर मराठी वाङ्मयांतलें पाहिलें " फिलिपिक " म्हणून त्याची नांवाजणी झाली असती. परंतु त्यांत माझा फारसा गौरव केलेला नसल्यानें तें मीं पाणी तापाविण्याच्या बंबांत टाकिलें, आणि चमत्कार असा कीं चार पसे कोळसे टाकूनहि झालें नसतें इतकें पाणी कडकडीत होऊन गेलें ! तेजस्वी वाङ्मयाचें सामर्थ्य असें आहे.

नंतर एक महिन्याभरानें चि. सौ. चिमूताईचें गर्भाधान आलें. त्या वेळीं आमच्यावर सूड उगविण्याच्या निश्चयानें रघुनाथपंतांनीं आमच्याकडून रोख दोनशें रुपये मागितले. मीं शंभरच रुपये पाठविले आणि सोबतच्या पत्रांत आपल्या दैन्याची कहाणी सांगितली. ते शंभर रुपये रघुनाथपंतांनीं तसेच ठेवून दिले आणि आणखी शंभर वसूल होईपर्यंत गर्भाधान तहकूब ठेविलें.

मग श्रावण महिना आला. चिमूताईनें पहिली मंगळागौर सासरीं करून दुसऱ्या मंगळागौरीस माहेरीं यावें, मग तिसरी साताऱ्यास माझ्या सासुरवाडचें आमंत्रण होतें तेथें करून चवथी उमरावतीस तिच्या आतेसासूकडे करावी, असा कार्यक्रम ठरला. त्याप्रमाणें पहिली मंगळागौर पनवेलीस झाली. सौ. मुद्दाम तेथें गेली होती. गर्भाधानाच्या अहेराचे बाकीचे शंभर रुपये देऊन टाकण्याविषयीं चिमीच्या सासूनें सौ. चे मागें सारखें टुमणें लाविलें होतें. तिनें म्हटलें, ' मी परस्वाधीन बायकोमाणूस. मी तुमचा निरोप घरीं सांगत्यें. '

सौ. जवळ चिमूताईच्या भाड्याचे पैसे दिले होते. मंगळागौर झाल्यावर गुरुवारीं ती येण्यास निघतांना म्हणाली, ' वन्संना द्या माझ्या बरोबर धाडून, म्हणजे वेगळी सोबत पहायला नको.' तेव्हां रघुनाथपंत म्हणाले, ' इतक्या लवकर कशाला धाडायला पाहिजे? घरांत अमकीतमकी अडचण आहे. रविवारीं भार्गवबरोबर पाठवीन. दोघांच्या भाड्यातोड्याकरतां दहा रुपये ठेवून जा. ' त्याप्रमाणें दहा रुपये रघुनाथपंतांच्या हवालीं करून सौभाग्यवती परत आली. पुढें रविवारीं रघुनाथपंतांचें कार्ड आलें. त्यांत त्यांनीं लिहिलें होतें,

चि. सौ. सूनबाईस येथेंच गांवांत आग्रहाचीं निमंत्रणें आलीं असल्यानें तूर्त पुण्यास पाठवीत नाहीं. भाड्यासाठीं म्हणून दिलेले दहा रुपये गर्भाधानखातीं जमा केले आहेत. आतां बाकीचे नव्वद रुपये सत्वर पाठविण्याचें करावें; म्हणजे गर्भाधानसमारंभ उरकून घेऊं.

\+ \+ \+ \+

या प्रकारावरून मला एक नवीन कल्पना स्फुरली. ज्याप्रमाणें आपण वर्तमानपत्रें, औषधें वगैरे पदार्थ व्ही. पी. नें मागवतों, त्याप्रमाणें आपल्या मुली सासरहून आणण्याकरितां व्ही-पी. पद्धत सुरू करण्याची खटपट करावी. रेल्वे व आगबोट कंपन्या आणि खेपा घालणाऱ्या मोटारवाल्यांनीं हा प्रयोग करावा, म्हणजे पुष्कळदां मुलींच्या बापांनीं मुलीच्या पाठवणी करितां पाठविलेले पैसे त्यांचे सासरे किंवा नवरे दाबून बसणार नाहींत. **अ** ची मुलगी **ई** ही **ब** ला दिली आहे. **ब** कडून ती माहेरीं बरेच दिवसांत आली नाहीं. **अ** नें भाडयाचे पैसे पाठविले तर **ब** ते बळकावून बसण्याचा संभव आहे.

आणखी असें समजा कीं, **ई** व **ब** हीं दोघें नागपुरास रहातात व **अ** मुंबईस रहातो.

मग **अ** नें **ब** स पत्र लिहावें कीं, " **ई** ला अमुक दिवशीं तमुक ट्रेननें व्ही. पी. पद्धतीनें पठवावें. "

ठराविक वेळीं त्या ट्रेनवर **अ** नें जावें व गार्डाजवळ भाडयाचे पैसे भरून मुलीस घरीं न्यावें.

या व्ही. प्या. मालकांनीं नाकारूं नयेत म्हणजे झालें !

नाहींतर तहानेनें, भुकेनें व प्रवासाच्या शिणानें व्ही. पी. आर्टि-कलांची चांगलीच तारांबळ उडावयाची !

\+ + + +

पण मीं अद्याप नव्वद रुपये पाठविले नाहींत म्हणून रघुनाथ-पंतांनीं रागावून सुनेला माहेरीं पाठवून दिलें व मला कळविलें, " तुमच्यासारख्या कृपणाशीं संबंध जडला ही वाईट गोष्ट झाली. आम्ही यःकश्चित् नव्वद टिकल्यांकरितां धाय मोकलतों असें नाहीं, परंतु तुमच्या क्षुद्र मनाची ओळख पटली. आतां तुम्हीं नव्वद दुणें एकशें ऐशीं रुपये दिले तरी, बुंदसे गई सो हौदसे नहीं आती. बरोबर दोनशें रुपये भरून झाल्या गोष्टीची क्षमा मागाल तरच मुलीस घरांत घेऊं. नाहीं तर तिला टाकून देऊन चि. आत्मारामाचें लग्न दुसऱ्या मुलीशीं करूं. "

या पत्राला मीं फारशी दाद दिली नाहीं. मला वाटलें, हा लोभी थेरडा जरी चिमीला प्रतिकूल असला तरी रा. बापूराव ( आत्मारामपंत ) हे नवीन मताचे आहेत ते तरी हिचा अव्हेर करणार नाहींत, म्हणून आगाऊ कार्ड टाकून मी चिमूस घेऊन मुंबईस गेलों. मला तर वाटलें कीं तो नवा नवरा बोरीबंदरावर बायकोचें स्वागत करण्यास येईल; परंतु तो आला नाहीं. मी बापूरावांच्या बिऱ्हाडीं गेलों. तों ते आदल्या रात्रीं गांवीं गेले असें शेजाऱ्यानें सांगितलें. त्यांच्या या गांवीं जाण्याचा उलगडा आरंभीं उद्धृत केलेल्या त्यांच्या पत्रावरून आतां मला झाला. आतां या मुलीची स्वगृहीं बोळवण कशी करावी, हा प्रश्न आमचे पुढें उभा राहून आई, गुंड्याभाऊ, व मी यांचें कौन्सिल भरून बरीच चर्चा

झाली.

\+ + + +

आणखी आठ दिवस लोटले; सकाळची वेळ होती. आई, मी व सौ. अशीं तिघें दोन तीन दिवसांपासून गुंड्याभाऊची वाट पहात होतों; आज मात्र गुंड्याभाऊचा तांगा दारांत धडकला. मी घाईनें बाहेर जाऊन त्याची वळकटी स्वतः उचलून आणिली. गुंड्याभाऊची स्वारी एका हातांत पाण्याचा फिरकीचा तांब्या आणखी दुसऱ्या हातांत भला मोठा सोटा घेऊन 'हाशहुश' करीत घरांत आली आणि आईस म्हणाली, " मावशी, आतां फर्स्ट क्लास चहा करायला सांग वहिनीला. मी काम फत्ते करून आलों. "

" आलास ना गुंड्या ? तरी मला वाटलंच गुंड्याशिवाय हें काम कधीं व्हायचं नाहीं ! आमच्या चिरंजिवांच्या हातून असलीं कामं कधींच व्हायचीं नाहींत. त्याला डोकं जरा कमी आहे, " आई म्हणाली.

कपडे काढून खुर्चीवर बसलेला गुंड्याभाऊ म्हणाला, " पण मलासुद्धां या कामांत डोकं फारसं वापरावं लागलं नाहीं. हा माझा पठाणी सोटा आहे ना ? " सोटा हातांत धरून त्याला प्रेमानें कुरवाळीत तो बोलला, " याच्या जोरावरच समेट घडवून आणला. निःशस्त्र प्रतिकार राजकारणांत उपयोगी पडतो कीं नाहीं, हें अजून पहायचं आहे; पण आमच्या गृहकारणांत याच्या सारखा शिष्टाई करणारा हुषार वकील मिळणं कठीण आहे. "

आईला हें बोलणें समजलें असेल असें वाटत नाहीं. परंतु

गुंड्याभाऊविषयीं तिला आंधळी माया वाटत असे. तो कांहीं जरी आचरटपणाचें बोलला, तरी त्यांत कांहीं तरी खुबी आहे, असें समजून ती हासत असे. उलट मीं किती जरी उच्च प्रकारची कोटी केली, तरी तिच्या मुखावर हासण्याची रेघहि उमटत नसे. गुंड्याभाऊचें बोलणें ऐकून ती बरीचशी हासली. इतक्यांत एका ताटांत चहाचे दोन पेले व पाण्याची लोटी घेऊन सौ. आली. तिनें तें ताट गुंड्याभाऊच्या समोर ठेविलें. गुंड्याभाऊनें पाण्याची नुसती चूळ भरून चहाचे घुटके घेण्यास प्रारंभ केला. आईनें जिज्ञासेनें विचारिलें, " पण आतां त्या सोट्याची शिष्टाई कशी काय झाली ती सांग तर खरी ! "

" तें असं झालं, " चहा पितां पितां थांबत तो सांगूं लागला, " पहांटे साडेपांच वाजतां आमची आगगाडी बोरीबंदरावर पोंचली. एक व्हिक्टोरिया केली न् पणतूच्या चाळींत गेलों. तिथं खालच्या मजल्यावर एकाला विचारलं, कीं सान्यांचं बिऱ्हाड कुठं आहे ? त्यानं—चांगला माणूस दिसला तो--स्वतः वर येऊन खोली दाखविली. खोलीला आंतून कडी होती. त्यानं दार दोन-चारदा ठोठावलं मग तो म्हणाला, ' आतां तुम्हीच बसा ठोठावीत मिस्टर, हा साने मोठा झोपाळू आहे. मला काम आहे, मी जातों ' मग मीं बराच वेळ खडबड केल्यावर बापूरावानं डोळे चोळीत चोळीत दार उघडलं. मला पाहून त्यानं कपाळाला आठ्या घातल्या आणखी म्हटलं, ' काय ? कोण पाहिजे तुम्हांला ? '

" त्याला उत्तर न देतां माझ्यामागें, बापूरावाला न दिसेल अशा बेतानं उभ्या राहिलेल्या चिमीवर दरडावून मी, ' चल ग,

हो आंत ! ' असं ओरडलों. दाराची चौकट दोन हातांनीं बापूरावांनीं आडवून धरली होती, त्यामुळें ती आडली. हातांतला सोटा जमिनीवर दाणदिशीं आपटून, '**हो आंत !**' असं पुनः गरजलों, त्याबरोबर तो डचकला आणखी त्याचा एक हात सुटला. मीं चिमीला चटदिशीं आंत लोटलं. ती आंत जाऊन हातांतलं गाठोडं खालीं ठेवून भिंतीशीं उभी राहिली. बापूराव दारांतून आंत जाऊन, आपल्या लांब लांब झिंज्या कुरवाळीत अंथरुणावर जाऊन रागानं एकदां चिमीकडे न् एकदां माझ्याकडे पाहूं लागला. माझा सोटा हातांत धरून पण जमिनीला टेकवून मीं उंबऱ्यावर ठाणं दिलं. ”

“ अस्सं. म्हणजे एकदां ती घरांत तर शिरली ! ” कौतुकानें आई म्हणाली,

“ तर ? वहिनी, आतां आणखी एक अर्धा कप आणा पाहूं ! ” गुंड्याभाऊनें, जणूं आपल्या कामगिरीचा मोबदला आपण हक्कानें मागत आहों, अशा ऐटीनें म्हटलें. त्याच्या मागणीप्रमाणें चहा आल्यावर तो थोडाथोडा पीत त्यानें आईच्या विनंतीवरून पुनः आपलें आख्यान सुरूं केलें—

“ आपली बायको आपल्या इच्छेविरुद्ध घरांत शिरलेली पाहून बापूरावाला राग तर आला, पण माझ्या सोट्याकडे पाहून त्यानें तो गिळला; आणखी मांसभक्षक रानटी लोकांच्या टोळीनं गराडा दिलेल्या फिल्मनायकाप्रमाणं चेहरा शांत ठेवून त्यानं उशाखालची सिगारेट काढून ती पेटविली आणि तोंडांत धरून दोनचार झुरके मारले. नंतर माझ्याशीं बोलण्याकरितां तोंड उघडणार तोंच मी

पुनः सोटा जमिनीवर आपटून, ' चिमूताई ! नुस्ती अडाण्यासारखी उभी काय राहिली आहेस ? ती खुंटीवरची केरसुणी घेऊन आंतल्या खोलींत जा आणि स्वच्छ झाडून घे. आपल्या घरीं तूं आली आहेस. तें स्वच्छ ठेव असं सांगायला दुसऱ्याची गरज




चिमूताईचा स्वगृहप्रवेश.

काय आहे ? जाव अंदर !' असं दरडावलं. मागं शाळेंत ग्यादरिंगच्या नाटकांत भीमाचं काम केलं होतं. तें या वेळीं फार उपयोगीं पडलं. माझ्या आवाजानं घाबरून जाऊन बापूराव नुसते ' आ ' वासून पहात राहिले.

" चिमणी केरसुणी घेऊन आंत गेली. आणखी आंतलं झाडल्यावर परत बाहेर आली. मग मी म्हणालों, ' शाबास, आतां असं कर, घरांत जाऊन एक कळशी नाहीं तर बाधली घे, अन् या इकडे नळ आहे तिथं जाऊन नंबर लाव. ही मुंबई आहे बरं, इथं सगळीं काम नंबरवारीनं व्हायची. गर्दी असली तर नंबर लावून उभं रहायचं. जा ताजं पाणी घेऊन ये. ' हें ऐकून चिमणी आंतल्या खोलींत गेली आणखी तिथली एक बाधली न् कळशी घेऊन नळाकडे गेली. ती नाहीं असं पाहून जांवईबुवांना वाचा फुटली. ' हें पहा मिस्टर--' ते बोलूं लागले. पण त्यांना मी म्हणालों. ' बापूराव, मला तिऱ्हाइतासारखं मिस्टर कां म्हणतां ? मी तुमचा मावसमेव्हणा आहें. माझं नांव गुंड्याभाऊ आहे. मला गुंड्याभाऊ म्हणत जा. '

" ' आय डोन्ट केअर, माझ्या लौकिक पत्नी'-असं तो कांहीं बोलणार इतक्यांत चिमणी पाणी घेऊन आली. मीं तिला स्टो पेटवून चहाचं आधण ठेवायला सांगितलं, आणखी रुद्रावतार जरा बदलून हासत म्हणालों, ' चिमणे, आतां चांगला छान चहा कर बरं ! मुंबईच्या लोकांना इराण्याच्या दुकानचा चहा प्यायची संवय झालेली असते. जर तूं फक्कड सिंगल बनवून नाहीं दिलास तर बापूरावांना इराण्याच्या

दुकानचा चहा बंद करावासा वाटणार नाहीं. आणखी चहाबरोबर सकाळीं कांहींतरी नवा खाण्याचा पदार्थ करीत जा.' असं तिच्याशीं मी बोलत असतांना तिनं स्टो पेटवलेला दिसला. कारण बायका स्टो पेटवूं लागल्या कीं, प्रथम होणारा भडका आंत झाला होता. बापूराव जरा घाबरून आंत पाहूं लागले. मीं म्हटलं, 'कांहीं काळजी नको, बापूराव. चाळ आपली नाहीं न् दुसऱ्याची असली तरी तिचा विमा उतरलेला असेलच. काय हो, खोलीचं भाडं काय आहे?'

"माझा प्रश्न झिडकारण्याचा हेतूनं जांवईबुवा म्हणाले, 'तें माझं खासगी कन्सर्न आहे. तुम्ही इथं माझ्या परवानगी-शिवाय—' त्यांना वाक्य पुरं करूं न देतां मी बसल्या बसल्याच सोटा आपटून ओरडलों, 'चिमणे! झाला कीं नाहीं चहा? लवकर येऊं दे. तिथंच कपबशा असतील बघ! इथं मुंबईत पुण्यासारखं रेंगाळणं चालायचं नाहीं! झट्पट् चट्पट् सगळीं कामं झालीं पाहिजेत!' मग आवाज कमी करून जांवई-बुवांजवळ गेलों. ते अद्याप अंथरुणावरच बसलेले होते. त्यांना मी म्हणालों, 'चलायचं, आतां एक चूळ भरून टाकायची. चहा झाला आहे.' जणूं आपण त्या गांवचेच नाहीं अशी मुद्रा धारण करून बापूराव समोर खिडकीकडे पहात राहिले. मीं त्यांचा असा खस्‌दिशीं हात धरला!"

आपण बापूरावांचा हात कसा धरला तें प्रत्यक्ष दाखविण्या-करितां गुंड्याभाऊनें माझा हात पकडून ओढून दाखविला. गुंड्या-भाऊच्या अंगांत निदान दोन अडीच तरी अश्वशक्ति आहे.

त्यामुळें माझा हात दुखून मी ‘ ओय् ’ असें किंचाळलों.

“ अगदीं अशीच, ” गुंडयाभाऊ पुढें सांगूं लागला, “ अशीच किंचाळी त्यांनीं फोडली. ‘ चला कीं आंत ! बायकोपुढं असं लाजायला नको ! ’ असं म्हणून मीं त्यांना आंतल्या खोलींत ओढूनच नेलं. त्यांच्यापुढं पाणी ठेवायला चिमणीला सांगितलं. माझ्या शक्तीच्या अनुभवावरून, निदान तूर्त तरी माझं ऐकायचं असं बापूरावांनीं ठरवून चूळ टाकली. तेवढ्यांत मीं तिथं असलेली चटई जमिनीवर पसरली. बापूराव नाखुषीनं चटईवर बसले. मी पण बसलों. चिमणीनं दोन कप चहा आमच्यापुढं ठेवला. खरो-खरच त्याला और लज्जत होती. बायको घरांत आल्यावर निदान सकाळीं उठून चहाकरतां तीन जिने उतरून दुकानांत जायला नको, असं बापूरावांला वाटलं असावं. कारण त्यांनीं चहा पितांना स्वतःला नकळत चार मिटक्या मारल्या. आपलं काम फत्ते होणार अशी मला आशा वाटूं लागली.

“ ‘ आतां अंघोळीला पाणी ठेव या स्टोवरच तापत, आणखी मी डाळतांदूळ, मीठमसाला, भाजी सगळं घेऊन येतों. इथं खालींच सगळा बाजार आहे. ’ असं मीं चिमणीला सांगितलं. आम्ही दोघे पुनः बाहेरच्या खोलींत आलों. मीं उंबऱ्यांत ठाणं दिलं, आणखी माझ्याकडे एकदां तिरस्कारानं पाहून बापूराव आपला सेफ्टी रेझर काढून चपाटण्यावर उगाळूं लागले. माझी ब्याद कशी बाहेर काढावी याचा विचार ते दांतओठ खाऊन करीत होते. त्याच्या भरांत रेझरची पात खूप पाजळली जात होती. तेवढ्यांत खाणा-वळीचा छोकरा रात्रीचा रिकामा झालेला डबा घेऊन जाण्याकरितां

आला. त्यानं स्वयंपाकाच्या खोलींत जाऊन विस्कळीत झालेले खण एकत्र करून डबा बाहेर आणला. बाहेर येतांना आंतल्या बाई पाहून तो चकित झालेला दिसला. मीहि पाहुणा बसलों होतों. त्यानं बापूरावांला विचारलं, 'आज किती ताटं आणायचीं साहेब?'

" बापूरावांना उत्तर देण्याची संधी न देतां मी म्हणालों, 'अरे बेट्या, आतां बाई आल्या. अजून खाणावळीचं जेवण जेवायचं कीं काय? आजपासून पुनः नोटीस येईपर्यंत ताट बंद. झाल्या दिवसाचं बिल घेऊन ये.'

" बापूराव माझ्या हुकुमावर उलट हुकूम देणार तोंच त्यांचे शेजारी बन्याबापू नुकतेच उठून सज्ज्यांत उभे राहिले होते, त्यांनीं माझं बोलणं ऐकलं, आणखी ते हासत हासत येऊन म्हणाले, 'काय हो साने, खाणावळवाल्यास नोटीस मिळाली का?'

" बापूराव अगदीं गोंधळून गेले. मी म्हणालों, 'तर? आतां घरधनीण आल्यावर खाणावळीचं जेवण कोण जेवतो?' मग जरा ओरडून चिमणीला बाहेर बोलावून मीं सांगितलं, 'चिमणे, हे भावजी आले आहेत, नमस्कार कर यांना!' चिमणीनं नमस्कार केल्यावर बन्याबापू खुष झाले आणखी म्हणाले, 'काय वहिनी, आलांत? बरं पण साने, तुम्ही म्हणालांत आपलं लग्न अद्याप झालं नाहीं म्हणून! काय तरी बुवा लाजाळू स्वभाव तुमचा!' हें ऐकतांच बापूरावांचं तोंड उमगलेल्या चोरासारखं एकदम खाड्कन उतरलं.

" लगेच बन्याबापूंनीं आपल्या कुटुंबाला हांक मारून तिथं आणलं. बन्याबापूंच्या मानानं त्याचं वय कमी दिसत होतं. अगदीं

चिमणीच्याच वयाची ती दिसत होती. चिमणीला पाहून समवयस्क शेजारीण मिळाल्याचा आनंद तिला झाला; पण चिमणी पाठमोरी होती. तिनं वळून पाहिल्याबरोबर दोघींची दृष्टादृष्ट होऊन ओळख पटली. ‘ अग चिमू जोग ! ’ ती म्हणाली. चिमणी मात्र सकाळ-पासून घाबरून गेली होती. ती कांहीं न बोलतां नुस्ती हासली. आपल्या बायकोची मैत्रीण शेजाराला आलेली पाहून बन्याबापूंना बरं वाटलं. ते म्हणाले, ‘ वा: ! हा योगायोग छान जमला. आमच्या हिची ह्या मैत्रीण आहेत असं दिसतं. ’

“ ‘ हो तर ! ही चिमी न् मी हुजुरपागेंत त्रिनी यत्तेपासून इंग्रजी चौथीपर्यंत बरोबर होतों ना ! बरं पण, चिमूताई, येवढी आलीस तशी आतां सकाळचा चहा तरी घे माझ्या इथं. आणखी जेवणाला सुद्धां आत्तांची वेळ तरी आमच्या इथें या सगळीं जणं. घरांत डाळतांदुळापासून तयारी करावी लागेल. चल, जरा आमची खोली तर पहा ! ’ असं म्हणून बन्याबापूंची बायको तिला आपल्या बिऱ्हाडांत ओढून घेऊन गेली.

“ बन्याबापूंनीं बैठक मारली; मी त्यांना म्हणालों ‘ मी यांचा मावस मेव्हणा. मिसेस साने आमची मावसबहीण. ’ बन्याबापू म्हणाले, ‘ ओ हो, असं का ? पण हे सानेसाहेब आपलं लग्न अजून व्हायचं आहे असं आम्हांला सांगत आले ! चालंलच आहे. तरुण रक्त आहे. तुमचं नांव काय हो पाव्हणे ? ’ मीं त्यांना आपलं नांव सांगितलं. त्यांनीं मला आपलं नांव सांगितलं. थोडा कोकणस्थी बादरायण संबंध जोडला. आमच्या चिमणीला संभाळून घ्या, अशी मीं त्यांना विनंती केली. इतका वेळ जांवईबुवा कांहीं

बोलले नाहींत; पण आतां मुकाट्यानं कोट चढवूं लागले, तेव्हां मी त्यांना म्हणालों, ' बसा हो जरा. चिमणीनं फराळाचं आणलं आहे त्याचा समाचार घेऊं. '

" आणखी आमच्या घरीं चहा तयार होतो आहे तो घ्या न् मग जा कुठं जायचं असेल तिथं. बहुतेक चितळ्यांच्या इथं जायचं असेल ! डोळे मिचकावीत बन्याबापू म्हणाले. "

" कोण चितळे ? "

" चितळे कोण ? "

" हे चितळे कोण बुवा ? "

असे निषाद, मध्य आणि खर्ज स्वरांत उद्गार निघाले. ते अनुक्रमें सौ., आई व मी यांचे होते, हें चाणाक्ष वाचकांस इत्यादि.

" अगदीं बरोब्बर ! हेच उद्गार बन्याबापूंनीं चितळ्यांचं नांव काढतांच माझ्या तोंडून निघाले. 'कळेल, कळेल !' बन्याबापू म्हणाले. ' दॅट्स माय प्रायव्हेट अफेअर,' म्हणजे तें माझं खासगी रहस्य आहे, असं जांवईबुवा चिडून म्हणाले. तोंच बन्याबापूंच्या बायकोनं तीन कप चहा आणून ठेवला. जांवईबुवा टोपी चढवून बाहेर निघाले, पण मीं त्यांना, ' चहा घेऊन जा हो, ' असं म्हणून त्यांना दंडाला धरून मट्कन् खालीं बसवलं. माझ्या बळाची पुनः त्यांना चांगलीच प्रचीति आली असली पाहिजे असं त्यांच्या गोऱ्यामोऱ्या चेहऱ्यावरून दिसलं. आम्ही चहा प्यायला प्रारंभ केल्यावर ज्या चितळ्यांच्या घरीं बापूराव जायला निघाले होते ते चितळे स्वतःच तिथं आले आणखी हासत म्हणाले, 'काय

हो बापूराव ! म्हटलं अजून झोंपूनच राहिली आहे कीं काय स्वारी तें पहायला आलों. आज काय पाहुणे आले आहेत वाटतं ' ! चितळे जरी इतक्या आनंदानं बोलत होते तरी ते त्या वेळीं तिथं यावेत हें बापूरावांला आवडलं नाहीं. पण बन्याबापूंनीं मात्र आनंदानं चितळ्यांना या बसा करून त्यांच्यासाठीं आणखी एक पेला चहा मागितला. तो आल्यावर बन्याबापू प्रथम इकडचं तिकडचं बोलून म्हणाले, ' काय रावबहादुर, हे कोण आहेत ओळखलंत का ? हे आमच्या बापूरावांचे मेव्हणे आहेत ! '

" ' मेव्हणे ? म्हणजे बापूरावांची सख्खी बहीण यांना दिली आहे वाटतं ! ' चितळ्यांनीं विचारलं.

" ' नव्हे नव्हे. यांची बहीण बापूरावांना दिली आहे !' बन्याबापूंनीं सांगतांच म्हाताऱ्याच्या हातांतला कप एकदम खालीं गळून पडला. ' बाय् जोव्ह व्हॉट डु यू मीन' ? म्हणजे याचा अर्थ काय ? असं चितळे ओरडले. ' यांचं लग्न झालं होतं एकूण ? मला वाटलं हे प्रथम वर आहेत म्हणून ! '

' अहो, पण हे बिजवर तरी कुठें आहेत—'

इतक्यांत आपलं लुगडं घेऊन जायला चिमणी घरांत यायला घुटमळत होती, तिच्याकडे पाहून बन्याबापू म्हणाले, 'या वहिनी ! मुंबईस असंच पुरुषांच्या अंगावरून घरांत जावं लागतं. रावबहादुर, हें बापुरावांचं कुटुंब. आजच पहाटे या पुण्याहून आल्या. आणखी हे यांचे बंधु. यांचं नांव गुंड्याभाऊ. '

" चितळ्यांनीं आपलं आरशीचं घर बाहेर काढलं. मग तें उघडून आंतून आरशी बाहेर काढली. त्यांतच ठेवलेला शॅमॉय

कातड्याचा तुकडा घेऊन त्या आरशीचं एक भिंग पुसलं. ''

असें सांगून चहाच्या दुसऱ्या कपांतला शेवटचा घोट पिऊन टाकून गुंड्याभाऊनें आपलें तोंड पुसलें व सुपारीची फक्की मारिली.

पुढला मजकूर ऐकण्याची उत्कंठा लागलेल्या आईनें विचारलें, " मग पुढें ? "

" मॉग पुफे, '' सुपारी बोकाणत गुंड्याभाऊ सांगतो, " मग पुढं त्यानं दुसरं भिंग पुसलं आणखी काय ? मग आरशी डोळ्याला लावून शॅमॉय कातडं आरशीच्या घरांत ठेवून त्यानं टप्दिशीं तें बंद केलं, आणखी कोटाच्या खिशांत ठेवून दिलं आणखी आरशीच्या भिंगांच्या वरच्या अंगावरून चिमणीकडे त्यांनीं पाहिलं, आणखी म्हटलं, ' ओ हो धिस इज् इन्डीड् ए नाइस् गर्ल ! मिस्टर साने, अशी चांगली वाइफ् मिळाली असतां तुम्हीं आपलं मॅरेज झालं नाहीं असं सांगून लोकांच्या मुलींना आणखी त्यांच्या आशाळभूत बापांना नादीं लावावं ही शरमेची गोष्ट. ' मग माझ्याकडे त्यांनीं पाहिलं.

" आरशीच्या भिंगावरून नजर फेंकून माझ्याकडे सारखं दोन मिनिटं त्यांनीं पाहिलं !

" मग आरशीच्या भिंगांतून कांहीं वेळ टक लावून पाहिलं.

" मग आरशी काढून माझ्याकडे ते पाहूं लागले. मग एकदम त्यांनीं मला विचारलं, ' काय हो, तुम्ही गुंडो धोंडो दांडेकर नाहीं का ? ' मीं होय म्हटलं. मीं त्यांना अगोदरच ओळखलं होतं. मीं म्हटलं, ' आणखी तुम्ही नागपुरास सब्जज्ज असतांना मला एक महिना सक्तमजुरी दिली होती. तुम्हांला मी केव्हांहि विसर-

णार नाहीं ! ''

गुंड्याभाऊबद्दल आईला नेहमीं अभिमान वाटत असेच. त्यांतून नागपूरच्या हिंदु-मुसलमान दंग्याच्या वेळीं तो मुद्दाम मारा-



आईला गुंडयाभाऊचें कौतुक बेसुमार वाटूं लागलें होतें.

मारी करण्यास गेला, व सपाटून मार खाऊन व देऊन तुरुंगांत जाऊन आला. तेव्हांपासून तर तिला त्याचें कौतुक बेसुमार वाटूं लागलें होतें. एखादा भाविक भक्त आपल्याला तिळमात्र न समजणारा वेदान्त सांगणाऱ्या गुरूकडे ज्या पूजायुक्त दृष्टीनें पहात रहातो, त्या दृष्टीनें ती गुंडयाभाऊकडे पाहूं लागली.

" चितळे म्हणाले, ' अहो, मीं म्हणून तुम्हांला एक महिन्यावर सोडलं. दुसरा एखादा असता तर जन्मभर अंदमानाची हवा खायला पाठवलं असतं तुम्हांला ! काय समजलां ? बाकी नुस्त्या सोट्याच्या जोरावर चार गुंडांना तुम्हीं लोळवलंत, त्याची हकीकत ऐकून मला फार कौतुक वाटलं. काय करावं ? नोकरीची बिडी पायांत नसती तर तुम्हांला हारतुरे घालून तुमचा सत्कार केला असता ! ' काय हो, ' माझ्या हातांतल्या सोट्याकडे पाहून ते म्हणाले, ' याच सोट्यानीं तुम्हीं त्या लोकांला पाणी पाजलंत का ? '

" मीं सोटा आपटून मोठ्यांदा गर्जना केली, ' होय, हाच तो माझा विजयी सोटा ! आणखीहि जर का कोणी गुंडबाजी केली, नाहींतर माझ्या मनाविरुद्ध वागलं, नाहींतर फाजीलपणाचं वर्तन केलं ( असं बोलतांना मी बापूरावांकडे मुद्दाम पाहूं लागलों. ) तर त्याला याच सोट्यानं वठणीवर आणायला हा गुंड्याभाऊ मागंपुढं पहाणार नाहीं ! ' माझी गर्जना ऐकून बापूरावांची पांचावर धारण बसली. ते थरथरा कांपूं लागले.

" ' बेश, बेश ! आमच्या मुंजे डॉक्टरांना असेच वीर

पाहिजेत. ठीक आहे. बापूराव-आय मीन् मिस्टर साने! आतां लक्षांत ठेवा बरं. यांच्यासारखे मेऱ्हणे तुमचे पाठीराखे आहेत. यांना आणखी तुमच्या वाइफ्‌ला घेऊन आमच्या इथं चहाला या आज. नंतर तुमची वाइफ् आमच्या मालतीकडे येत जाईल. तुम्ही कधींमधीं येत जा,' असं सांगून चितळे निघून गेले. बापूरावांनीं आपलं लग्न झालं नाहीं अशी थाप मारून या लोकांना नादीं लावलं होतं. यानंतर मी एक यादी तयार करून घेऊन स्वयंपाक-पाण्याला लागणाऱ्या जिनसा घेऊन आलों. आमच्या अंघोळी झाल्या. बन्याबापूंच्या घरीं जेवणं झालीं. बापूराव पावणेदहा वाजतां पोषाख करून कचेरींत गेले.

" कचेरी संध्याकाळीं पांच वाजतां सुटते. त्या वेळीं बापूराव कचेरींतून बाहेर पडतात तोंच आमची स्वारी सोटा घेऊन बापूरावांना घरीं पोंचवायला दाराशीं हजर! नाहींतर पळायचे परस्पर कुठें तरी! माझ्याकडे पाहून त्यांनीं कपाळाला आंठ्या घातल्या, पण मी त्यांना कसची दाद देतों? त्यांना पकडून ट्राममध्यें बसवून घरीं घेऊन आलों. ते कपडेबिपडे काढून जागच्या जागीं ठेवतात तों समोर ताटांत व्यवस्थितपणें ठेवलेले चहाचे दोन कप, चिवड्याच्या दोन बशा, तांब्याभांडं, हें पाहून स्वारी खूष झाली. चहा पितांना त्यांनीं खोलीच्या भिंतींकडे पाहिलं. त्यांच्या केर-कोळीष्टकं सांचलेल्या ब्रम्हचारी मठाऐवजीं ती खोली आतां लक्ष्मीचा हात फिरलेल्या घराच्या सारखी व्यवस्थित दिसत होती. त्यांची चर्या जरा खुलल्यासारखी पाहून मींहि आपला सोटा जरा बाजूला ठेवला आणखी पनवेलच्या आणखी ऑफिसच्या गोष्टी काढल्या.

" संध्याकाळीं साडेसहा वाजले. चितळ्यांकडच्या आमंत्रणाची मीं आठवण दिली. बापूराव आतां त्यांच्याकडे जायला ' कां कूं ' करीत होते. पण मीं पुनः जोराचा आग्रह करून त्यांना उठवलं. चिमणी, बापूराव आणखी मी अशीं तिघं चितळ्यांच्या घरीं गेलों. तिथं चितळे आणखी त्यांची मुलगी आमची वाट पहात होतीं. चितळ्यांच्या मुलीनं बापुरावांशीं शब्दहि न बोलतां चिमणीशींच बोलणं लावलं. चितळ्यांनीं बापुरावांना वैवाहिक सुखाबद्दल बराच उपदेश केला. चितळ्यांच्या मुलीनं चिमणीला खण दिला आणखी सांगितलं, ' बरं झालं मिसेस् साने, तुम्ही वेळींच आला म्हणून ! नाहीं तर तुमच्या न् माझ्या जिवाचा पोरखेळ झाला असता.'

" झालेल्या फजितीनं बापुराव खजील झाले होते, परंतु आपल्या इच्छेविरुद्ध आपली बायको घरांत यावी हें त्यांना अद्याप बरं वाटत नव्हतं. आम्ही तिघं जणं बिऱ्हाडीं परत आलों. चिमूताईनं चूल पेटवली. दिवेलागणीच्या सुमारास शेजारीपाजारी मंडळी जमली. त्यांनीं बायको आणल्याबद्दल बापुरावांचं अभिनंदन केलं. मी मधेंच बोलून, ' आमच्या चिमणीला आतां संभाळून घेण्याची जबाबदारी आपल्या सर्वांवर आहे, ' असं सर्वत्रांना सांगितलं. जेवणाची वेळ झाली तशी सगळी मंडळी परत गेली; पण इतक्या लोकांचा पहारा आतां जांवईबुवांच्या वागणुकीवर रहाणार इतक्यानं मला समाधान झालं. ' गुंडयाभाऊ, पानं मांडलीं आहेत, ' चिमणीनं येऊन सांगितलं.

" ' मला कशाला सांगतेस ? ज्यांना सांगायचं असेल त्यांना सांग, ' मी म्हणालों.

" हें ऐकून ' इश्श–अं–अ ' करून तिनं जो एक झुरका मारला–"

" कसला विडीचा कीं काय ? " गुंड्याभाऊची कुठें तरी फजिती करण्याला टपून बसलेला मी म्हणालों.

" झुरका नसला तर भुरका असेल,"–गुंड्याभाऊ.

" भुरका कसला कढीचा का आमटीचा " ? मी त्याला जिरवीत विचारिलें.

" कढीचा नव्हे रे, बायका भुरका नाहीं का मारीत हा असा, " असें म्हणून गुंड्याभाऊनें भुरका मारून दाखविला. त्याच्या आडदांड शरीराला तो भलताच विक्षिप्त दिसला. पण तो पाहून सौ. ची हासून फुरगुंडी कीं काय म्हणतात ती वळली. हा व्यत्यय आईला आवडला नाहीं. तिनें म्हटलें, "ऐका रे, पुढें काय झालं गुंड्या " ?

" पुढं काय ? त्यांचं अंतःकरण जरा नरमलं. आपली बायको अगदींच रुक्ष नाहीं असं त्यांला वाटलं कीं काय कोण जाणे, पण ते आपल्या पाटावर जाऊन बसले. मी दुसऱ्या पाटावर बसलों. पुनः त्यांच्या अंगांत भूत संचारलं. भात नुसता चिवडूं लागले. तें पाहून मीं चिमणीच्या अंगावर, ' चिमणे ! भात किती फडफडीत केला आहेस ? ते पहा नुस्ते चिवडीत बसले आहेत ! यापेक्षां खानावळींतलं अन्नच त्यांना चांगलं लागत होतं असं दिसतं ! ' असं इतक्या जोरानं ओरडलों कीं त्याचा नाद भांड्यांतून देखील उमटला. बापूराव, ' नाहीं हो, तसा कांहीं वाईट नाहीं भात, ' असं म्हणून जेवूं लागले. जेवण झाल्यावर त्यांनीं कपडे केले.

'कुठं जातां ?' मीं विचारलं.

" 'सिनेमाला, आज ती नवीन इटालियन फिल्म आली आहे,' ते म्हणाले.

"मी दारांत उभा राहिलों आणखी म्हणालों, 'आतां एकटं नाहीं जायचं, सहकुटुंब गेलं पाहिजे बरं का ? चिमणे ! लौकर आटप, सिनेमाला जायचं आहे ग जोडप्यानं !' मी दारांत वाट अडवून उभा होतों, त्यामुळं बापूरावांचा नाइलाज झाला. चिमणीनं भराभर जेवून घेऊन उष्टंशेण केलं, आणखी आम्ही तिघे सिनेमाला गेलों. पहिल्यांदा ते बायकोशेजारीं बसण्याची टंगळमंगळ करीत होते. पण मीं चिमणीला मध्यें बसवून तिच्या एका बाजूला बापूरावांना बसवलं. सिनेमा चालू असतांना बापूरावांनीं तिघांकरतां आइसक्रीम घेतलं.

"सिनेमा संपल्यावर आम्ही परत आलों. दुसऱ्या दिवशीं सकाळीं बापूराव जागे झाले ते कपबशांच्या खडखडाटानं बायको घरांत असली म्हणजे तोंड धुण्याच्या अगोदर, न मागतां, एक आणा न द्यावा लागतां, चहा मिळूं शकतो या गोष्टीनं त्यांचं समाधान झाल्यासारखं दिसलं. आपण होऊन त्यांनीं मजजवळ म्हटलं, 'आतां मी भाजी घेऊन येतों हं. आणखी कांहीं आणायचं आहे का ?' अर्थात् हें चिमणीस उद्देशून होतं.

" 'मला काय विचारतां ? ज्यांना विचारायचं असेल त्यांना प्रत्यक्ष विचारा ना !' असं मीं म्हटल्याबरोबर बापूरावांनीं हासत मला चिमटा घेतला. स्वारी आतां निवळत चालली असं माझ्या लक्षांत आलं. बापूराव आणखी मी असे दोघे बाजारांत गेलों. भाजी,

केळीं आणखी एक वेणी त्यांनीं घेतली."

"काय? वेणी घेतली?" सौ. नें आश्चर्य व्यक्त केलें, "म्हणजे जमलंच म्हणायचं!"

"ऐक ग. गुंड्या, मग पुढं काय झालं?" आईनें विचारलें.

"पुढं काय? त्यांचं जेवण मोठ्या खुषींत झालं. मग ते ऑफिसांत गेले. दुपारीं मी कंटाळलों म्हणून जो ट्रॅममध्यें जाऊन बसलों तो दादरपर्यंत गेलों, आणखी तिथून अपोलो बंदरपर्यंत आलों. मग म्हटलं हीं नवीन आरोग्यभुवनं निघालीं आहेत त्यांना आश्रय द्यावा; म्हणून एका आरोग्यभुवनांत गेलों. आणखी पन्हं, पचडी, ताक, पाणी, हवा, यांच्यावर यथेच्छ ताव मारून नवीन निघालेली नाटिका पहायला गेलों. तिथून संध्याकाळीं सात सवा-सात वाजतां चिमणीच्या बिऱ्हाडीं गेलों. दाराशीं येतांच मला कोलनवॉटरचा वास आला. काय भानगड आहे? असं वाटून आंत गेलों आणखी पहातों तों, बापूराव पायावर पातळ पांघरूण टाकून निजले आहेत, चिमणी डोकं चेपती आहे, सोडावॉटरची बाटली फोडून ठेवलेली जवळच आहे. 'हें काय? ताप आला आहे कीं काय?' बापूरावांचा साडेअठ्याणणव अंश उष्णता असलेला हात हातांत धरून मीं विचारलं. त्यांची नाडी मात्र ताडताड उडत होती.

"'ताप नाहीं पण डोकं दुखतं आहे हो! मी आज दोन वाजतांच ऑफिसांतनं रजा घेऊन आलों,' बापूराव म्हणाले. रात्रीं बापूरावांनीं थोडा भात खाल्ला. मी स्वयंपाकघरांत म्हणजे आंतल्या खोलींत जेवलों. जेवतांना चिमणीला म्हणालों, 'चिमणे, मी आतां

जातों, माझं काम झालं. मी कालपासून तुझ्या अंगावर मोठमोठ्यांदा ओरडलों तें तुझ्या बऱ्याकरतांच होतं हें समजून माझ्यावर रागावूं नको बरं ! '

" ' येवढं का मला समजत नाहीं गुंड्याभाऊ ? ' चिमणी हें उत्तर देतांना गहिंवरून आली. जेवण होऊन मी बाहेर आलों. वळकटीशीं कारभार करतांना मला पाहून बापूराव कण्हत म्हणाले, ' गुंड्याभाऊ, तुमचं अंथरूण गॅलरींत घातलं तरी चालेल ना ? आंत उकडतं आहे.'

" मी म्हटलं, ' नाहीं. मला तर सर्दी झाली आहे बुवा ! ' त्यासरशीं बापूरावांचं खर्रकन उतरलेलं तोंड पाहून मी पुढं म्हणालों, ' ह्यः ह्यः, घाबरूं नका, मला रात्रींच्या पॅसेंजरनं पुण्याला गेलंच पाहिजे तेव्हां माझं अंथरूण गॅलरींत घालून कसं चालेल ? ' बापूराव आपला आनंद झांकण्याचा दुबळा प्रयत्न करीत म्हणाले, ' बरोबर आहे, अंथरूण चालायला हवं असलं तर आगगाडींतच ठेवलं पाहिजे म्हणजेच तें चालेल. पण उद्यां जा ना ? रहा कीं आजच्या दिवस. '

" छे हो ! जरूरीचं काम आहे, ' मीं म्हटलं. मग इकडे-तिकडे गप्पा मारल्या, न् चिमणीच्या बिऱ्हाडांतून रात्रीं नवालाच निघालों. कारण पुण्याच्या पॅसेंजरवर जागा पकडायला फार लवकर निघावं लागतं, असं बापूराव म्हणाले. "

" मग पुढं ? " आईनें आनंदानें विचारलें.

—

# प हा रा.



आमच्या प्रभूचें वर्ष एक हजार नऊशें सत्तावीसच्या जुलई महिन्याचा शेवटचा आठवडा होता. मी मंडई करून घरीं परत जात होतों; तेव्हां वर्तमानपत्रें विकणाऱ्या एका पोराचे, “ बडोदें शहरांत भयंकर पाऊस ! आगगाड्या, तारायंत्रें बंद ! ” वगैरे शब्द ऐकून मी सायकलवरून खालीं उतरलों आणि पोऱ्यास हाक मारून पत्र मागितलें. वर्तमानपत्रांतला खळबळ्या मजकूर वाचण्यांत मी गर्क झालों, हें पाहून पोऱ्या म्हणाला, “ अहो रावसाहेब, पत्र विकत घ्या न् मग वाचा.”

“ वा रे शहाण्या ! माल चांगला आहे का वाईट आहे हें कळल्याशिवाय तो कोणी विकत घेतो का ? मी आधीं हें पत्र चांगलं आहे का तें पहातों; चांगलं लिहिलं असलंस तर घेतों, नाहीं तर नाहीं घेणार, ” मी म्हणालों.

बडोद्याच्या पावसाची बातमी तर फार रोमांचकारी होती; बडोद्यास तारायंत्र किंवा टपाल किंवा दुसरें कांहींहि दळणवळणाचें साधन शिल्लक नाहीं अशी बातमी असूनहि पुरांत सांपडलेल्या लोकांच्या हालांचें काल्पनिक वर्णन बातमीदारानें दिलें होतें. आतां हे हाल काल्पनिक होते कीं मुळीं बातमीदारच काल्पनिक होता, हें सांगतां येणें कठीण होतें. परंतु एकंदरींत वर्णन रम्य होतें, यांत शंका नाहीं. सर्व पत्र वाचून पाहिल्यावर वर्तमानपत्रवाल्याला तें परत देत मी म्हणालों, “ हें घे तुझं पत्र परत, चांगलं

नाहीं लिहिलंस गड्या ! ''

पोऱ्यानें मुकाट्यानें पत्र परत घेतलें. हा बेटा असा मूर्ख कीं, नेहमीं या युक्तीनें मी पत्र वाचीं परंतु " अगोदर पैसे टाका न् मग पत्राला हात लावा,'' असे तो कधींहि म्हणाला नाहीं ! मीं चटकन् सायकलवर उडी टाकिली आणि घरीं गेलों. भाजीची झोळी सायकलच्या शिंगाला टांगली होती, ती उचलतांच हलकी लागली म्हणून पहातों तों त्यांतला दीड आण्याचा दुध्या भोपळा नाहींसा झाला होता. हा त्या वर्तमानपत्रवाल्या पोऱ्याचा प्रताप असला पाहिजे अशी माझी खात्री झाली. अशिक्षित वर्गांत याप्रमाणें परस्वापहार आणि चोरी यांचा प्रसार होत चालला आहे हें अत्यंत खेदकारक होय. पत्र वाचण्यांत मीं मग्न झालों आहें असें पाहून त्यानें झोळींतून भाजी काढून घेतली, हें उघड आहे.

दुसऱ्या दिवशीं ऑफिसांत एका टॉमीनें टाइम्स ऑफ इंडियाचा अंक विकत घेतला होता, तो मीं जरा मागून घेतला. त्यांत तर बडोदें शहाराभोंवतीं सर्व अंगांनीं दहा बारा मैलपर्यंत पाण्याचा गराडा झाला असल्यानें तेथील कांहींच वार्ता कळत नाहीं, बडोद्याशीं संबंध असलेले सर्व लोक हवालदील झाले होते, असा मजकूर होता. तो वाचून माझी फार चमत्कारिक स्थिति झाली. माझे जीवश्च कंठश्च मित्र प्रोफेसर दिघे यांची काय स्थिति झाली असेल? मीं त्यांना बडोद्याहून खारी सुंठ आणण्याकरितां दिलेल्या दोन रुपयांची कांहीं मोठी जिकीर मला वाटली असें बिलकूल नाहीं, परंतु बिचारा बायकोमुलांचा पोशिंदा जगो म्हणजे झालें, असें मला वाटलें. पैशापेक्षां माणसाची किंमत अधिक आहे.

त्यांतून पुढल्या दसऱ्याला बडोद्याची स्वारी आणि साठमारी पहाण्याकरितां जावयाचें आम्हीं ठरविलें होतें आणि त्या बेतांत ही अकालवृष्टि विरजण घालणार कीं काय अशी मला भीति वाटली. त्या दिवशीं कामाकडे कांहीं माझें मन लागेना आणि त्याचा परिणाम असा झाला कीं माझ्या खेरजावजाबाक्यांत एकहि चूक राहिली नाहीं. एरव्हीं माझ्या कामांत इतक्या चुका रोज रहातात कीं, त्यांची बरोबरी व्यापारी दुकानांत खोक्यांचें पॅकिंग करणाऱ्याच्या हातूनहि व्हावयाची नाहीं. साहेब देखील आश्चर्यानें म्हणाला, " काय जोग, कसें आहे तें कीं, तुम्हीं नाहीं केली एकहि चूक आज तुमच्या मोजण्यांत ? "

मी संध्याकाळीं घरीं गेलों तेव्हां गुंड्याभाऊ आईजवळ आपल्या बढाईच्या गोष्टी सांगत बसला होता. कॅप्टन गोपूमामांचें ' प्रेमाच्या आणि लढाईच्या गोष्टीं ' चें पुस्तक आहे, तसें गुंड्याभाऊच्या " बढाईच्या गोष्टीं " चें पुस्तक काढावें असें वारंवार माझ्या मनांत येतें. घरांत सौभाग्यवती आणि तिची मैत्रिण गुलाबबाई अशा दोघी गप्पा करीत बसल्या होत्या. मी कपडे काढीत असतां आई म्हणाली, " आप्पा, ही गुलाब आली आहे. बापडी कालपासून काळजींत पडली आहे. तिला इथं ठेवून मल्हारराव बडोद्याला गेले, पण कालपासनं बडोद्याला खूप पाऊस पडतो आहे. वादळ झालं, अशा बातम्यांवर बातम्या येताहेत तिचा जीव कसा खालींवर होतो आहे. "

आईचें बोलणें चालू असतांच गुलाब बाहेर आम्ही होतों तेथें येऊन उभी राहिली. गुलाब सत्रंजीवर येणार असें पाहातांच

आई तिच्याकडे रागानें पहात सतरंजीवरून भुईवर सरकली. " आप्पा कालपासून मला कांहीं सुचत नाहीं. तुम्ही तरी बातमी काढून खुशाली कळवा कांहीं बडोद्याकडची ! " हुंदके देत गुलाब म्हणाली.

" तार करून खुशाली विचारूं का ?" मीं विचारलें.

" अहो तें इतकं सोपं नाहीं. परवांच मीं तार करवली, पण तार ऑफिसांतनं मला चिठ्ठी आली कीं, बडोद्याचं कनेक्शन तुटलं आहे, तेव्हां तुमची तार पुढें टपालानीं रवाना केली आहे म्हणून, " तिनें सांगितलें.

" मग तारेच्या बारा आण्यापैकीं टपालाचा एक आणा ठेवून बाकीचे अकरा आणे परत मागायचे आहेत का ? "

"जाऊं द्या हो आप्पा, इकडे आमचा जीव पडला आहे घोरा-मदी आणखी तुम्हांला थट्टा सुचते आहे ! आतां तुम्ही माझ्या-करतां बडोद्याला स्वतः जाऊन आणखी मला तारेनं, पत्रानं, नाहीं तर स्वतः परत येऊन समक्ष खुशाली कळवाल का ? " माझ्या-कडे दीनवाण्या मुद्रेनें पाहात ती काकुळली, " कराच येवढं. माझ्या नि काऊच्या मैत्रीखातर येवढं कराच. "

गुंड्याभाऊ आणि मी एकमेकाकडे पाहूं लागलों; इतक्या उत्सुकतेनें पाहूं लागलों कीं, एकमेकांचे विचार आपापल्या नजरेनें खेंचून घेत आहों, असें पहाणारास वाटावें. एखादी साहसाची संधी मिळण्याची आम्ही वाट पाहात होतों; कोणातरी बुडत असलेल्यास वांचवावयास मिळावें म्हणून गुंड्याभाऊ रोज एक आणा खर्चून टिळक तलावावर सकाळचा प्रहरभर बसे; एखादी मुलगी मोटार-खालीं सांपडत असतां तिला सोडवावयास मिळावें म्हणून मुलगी

आणि मोटर या दोन वस्तु रस्त्यावर एकदम दिसल्यास मी सायकवरून उतरून ' अटेन्शनच्या ' पवित्र्यांत उभा रहात असें. परंतु कोणतेंहि धाडस करावयास उभ्या वर्षांत आम्हांला संधी मिळाली नव्हती. नाहीं म्हणायला सहा महिन्यापूर्वी मी भाऊ महाराजांच्या विहिरीजवळून जात होतों, तेव्हां विहिरीजवळ गर्दी पाहिली. ' काय आहे ? ' म्हणून चौकशी केली. एक मुलगा बुडाला आहे असें मला कळलें.

एखाद्या लक्षाधीशाचा पोरगा असेल; त्याला मी बाहेर काढीन मग तो लक्षाधीश मला—

झट्कन् मीं टोपीं फेकून दिली व कोट काढून टाकला.—दहा हजार रुपये देऊं करील. मी नको नको म्हणेन—शर्ट फेंकून दिला.

पण तो म्हणेल, " तुम्ही बक्षीस घेऊं नका पण ही मी आपल्या बहिणीला ओवाळणी घालतों. "—धोतराचा काचा मारून मीं विहिरींत सूर मारून एकदम तळाशीं जाऊन लक्षाधिशाच्या औरसाचा कान पकडून त्याला वर आणलें. हात देण्यास दोघेजण वरून खालीं उतरले होते, त्यांनीं आम्हांला विहिरीबाहेर काढिलें. लक्षाधिशाच्या पोराकडे मीं मोठ्या आशेनें पाहिलें; पण तो लक्षाधिशाचा पोरगा नसून माझा मोरूच होता !

साहसी पुरुषांच्या कपाळीं अशी निराशा वारंवार येते. एखाद्या आग लागलेल्या घरांत धैर्यानें शिरून निद्रिस्त तरुणीस म्हणून उचलून हातावर झेलून धडाधड उडणाऱ्या प्रज्वलित वाश्यांतुळयांच्या माऱ्यांतून रस्त्यावर आणून ठेवावें, तर ती आपल्याच घरीं स्वयंपाकाला येणारी आजीबाई निघते; किंवा एखाद्या

अत्यंत निर्जन व अप्रसिद्ध ठिकाणाचा शोध आपण लावला असा एखाद्या धाडसी प्रवाशास वाटणारा अभिमान, तेथला 'रानटी' मनुष्य तेथें दर आठवड्यास बाजार भरतो अशी बातमी सांगून, वितळवून टाकतो. टिळक तलावावर पराक्रम गाजविण्याची संधि बघत बसणाऱ्या गुंड्याभाऊची एकदा अशी गंमत झाली. एका दहा वर्षें वयाच्या मुलाला बुडतां बुडतां त्यानें वांचविलें. कांठावर त्याचा बाप उभा होता, त्यानें प्रथम, "पोवतां नाहीं येत तर पान्यांत कशाला उतरला होतास मरायला?" असें म्हणून पोराच्या थोबाडींत मारली; आणि मग त्याच्या कानांतली बिकबाळी नाहींशी झालेली पाहून तो गुंड्याभाऊच्या अंगावर ओरडला, 'काय हो मिष्टर! पोऱ्याला जगवायला म्हणून जायचं न् त्याच्या काणांतली बिगबाळी पळवायची असली इद्या इथं दाखवतां काय? वा रे जीव वांचवणारा'!

जगाची ही कृतघ्नता पाहून गुंड्याभाऊनें साहसार्थ टिळक तलावावर बसण्याचा नाद सोडून दिला.

परंतु या गोष्टी दोनतीन महिन्यांच्या जुन्या झाल्या होत्या. साहसाचा बडोद्यास जाणें हा मार्ग आह्मां दोघांना पसंत पडला. गुलाबबाईला आश्वासन दिलें कीं, आजच आम्ही दोघे बडोद्याला जाण्यास निघूं आणि तिचे पति प्रो. मल्हारराव ऊर्फ भाईसाहेब दिघे यांची खुशाली दोन दिवसांत कळवूं. आपल्या मुलानें जीव धोक्यांत घालणें हें आईला पसंत नव्हतें. तरी गुलाबच्या देखत तिला स्पष्ट बोलतां येणें शक्य नव्हतें. शेवटीं आई, सौ. व गुलाब या आम्हांला पाथेय करण्याच्या तजविजीस लागल्या. मीं आठ दिवसांची रजा

काढण्याकरितां खालील अर्थाची चिठ्ठी साहेबाला लिहून ती एका कारकून-मित्राकडे नेऊन दिली:--

' पुणें ता. २६-७-२७.

साहेब, उद्यां ता. २७ पासून आठ दिवसपर्यंत माझें डोकें सपाटून दुखून मी हिंवतापानें आजारी पडणार आहें. मला अंथरुणावरून उठवणार देखील नाहीं अशी, स्थिति व्हावयाची असल्यानें आठ दिवस रजा देण्याइतके आपसाहेब दयाळू होतील, अशी आशा आहे. तसदी माफ करावी.

मी आहें, साहेब,
आपला फार आज्ञाळू
सेवक

**सी. व्ही. जोग**

टेन्थ क्लार्क, पेमेंट विभाग.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं आम्ही दोघे मुंबईस पोहोंचलों. तेथें बी. बी. सी. आय. रेल्वेच्या कुलाबा स्टेशनवर बडोद्यास जाणाऱ्या गाड्यांची चौकशी केली, तेव्हां कळलें कीं, बडोद्याजवळची लाइन वाहून गेली असल्यानें बडोद्याच्या अलीकडे दहा मैल इटोला नांवाचें स्टेशन आहे, तेथपर्यंत आगगाडी जाते व बाकीचा प्रवास लाइनच्या कांठेकांठे होऊन पगेपगे करावा लागतो; अर्थात् आम्हांला पाठीवर राहील इतकेंच ओझें घेऊन जाणें भाग होतें, म्हणून ट्रंक व बिछाने मित्राकडे टाकून दोन पिशव्यांत वाटचालीपुरतें सामान घेऊन आम्ही रेल्वेनें निघालों व ता. २८ च्या सकाळीं इटोल्यास उतरलों.

आमच्याबरोबर स्वयंसेवकांच्या दहाबारा टोळ्या उतरल्या. त्यांनीं पुरांत सांपडलेल्या निराधार लोकांकरितां धान्य व कपडे यांचे निधी घेतले होते. आम्ही सर्व मंडळी रेल्वे लाइनच्या कांठानें जाऊं लागलों. कांठावर निसरडें असल्यानें वारंवार घसरून पडत होतों. वाटेंत ढाढर नांवाच्या नदीचा पूल लागला. याच्या खालच्या कमानी सुटून जाऊन या तीरापासून त्या तीरापर्यंत रूळ त्यांच्या खालच्या आडव्या स्लीपरांसह लोंबकळत होते. हा पूल आतां लोंबता पूल झाला होता. या लोंबत्या पुलावरून जाणें ही एक सर्कशींतली कसरत व्हावयाची होती; कारण दोन लाइनींपैकीं एकीचें तर कंबरडें मोडून ती नदींतून वर येण्याला शिडीसारखी झाली व दुसरी मात्र या या कांठापासून त्या कांठापर्यंत पसरली होती. अगोदर पलीकडे जाण्याचा हिय्या कोणी करावयाचा हें ठरेना. आमच्या बरोबरचे स्वयंसेवक आम्हांला म्हणूं लागले, 'ए रावसाहेब च्यटनीआ ! तुम्ही पुणापासून आले ना ! आतां मराठी बारगीरचा पाणी दावा, आमच्या अगोदर तिकडे ज्या, मग आम्ही येशील. आम्ही महाराष्ट्राचा अनुकरण करील.'

आमच्या अंगांत हे शब्द ऐकून किती स्फुरण चढलें असेल याची कल्पना पुण्यपत्तनस्थांशिवाय इतरांस येणार नाहीं. पुण्याचें नांव राखण्याकरितां अस्सल पुणेकर काय म्हणाल तें धाडस करण्यास प्रवृत्त होईल. गुंड्याभाऊनें आपलें सामान नीट आवरून घेतलें. धोतराचा काचा मारिलेला होताच. आपल्या वहाणा त्यानें पाठ–पिशवींत कोंबल्या, पाण्याची लोटीहि त्याच ठिकाणीं ठेविली, आणि पुलाच्या दक्षिण टोंकाच्या मागें वीसपंचवीस पावलें

जाऊन उभा राहून त्यानें डोळें मिटून आपले पूज्य गुरु ब्रम्ह-चारी प्रोफेसर हणमंतराव यांचें दोन मिनिटें स्मरण केलें. सर्वांचे डोळे त्याच्या भाविक मूर्तीवर लागले. महाराष्ट्राचा ढाढर नदीच्या तीरावरील लौकिक गुंड्याभाऊच्या कृतीवर झुकत होता. कित्येक अश्रद्धाळू गुजराती स्वयंसेवक हा भित्रा माणस कालहरण करीत आहे असें दर्शविण्यासाठीं एकमेकांकडे पाहून डोळे मिचकावीत गालांत स्मितत होते तर दुसरे त्यांना चूप करण्यासाठीं डोळे वटारून नाकावर तर्जनी ठेवीत हो—

**जय बलभीमकी !**

अशा भयंकर गर्जनेसरसा गुंड्याभाऊ जो टाणकन उडाला, तो हातांतला सोटा जमिनीस टेंकून त्याच्यावर शरीर पेलून पुलाच्या दोन कमानीं इतकी जागा ओलांडून, तेथें पुन्हां सोटा टेंकून त्याच्यावर शरीर पेलून बाकीच्या तीन कमानींची जागा आक्रमण करून पैलतीरावर जाऊन ठाकला. नंतर बोल बजरंग-बलीकी जय ! अशी पुनः गर्जना करीत तो दंड थोपटीत आमच्याकडे तोंड करून उभा राहिला. त्याच्या उजव्या नेत्रांत अभिमानाची आणि डाव्यांत विजयश्रीची चमक झकाकत होती. सर्व स्वयंसेवकांनीं टाळ्या वाजवून त्याच्या पराक्रमाचें चीज केलें. मग एक उतारवयाचा स्वयंसेवक माझ्याकडे पाहून म्हणाला, ‘ हवे रावसाहेब, तमारो प्रभाव जोवा दो ’!

या कसोटींतून पार कसें पडावें, असा माझ्यापुढें प्रश्न उभा राहिला. किंचित् विचार करून मीं अस्सल गुजरातींत म्हटलें, ‘ हमारो प्रभाव वायलो छे. ये जो आदमी छे, तो हनुमानपंथी

है और हम् गनिमी कावेवाला छे. हम् ऐसे उडी खाके जानेवाले नथी. शिवाजीसारखे....' यानंतर शब्दज्ञानाचें दारिद्य हावभावानें भरून काढीत मी म्हणालों, 'ऐसे ऐसे हम सरपट सरपट जाएंगे.'

स्वयंसेवक इंग्रजी, गुजराती, धेडगुजरी, हिंदी या भाषांत अनुमतिदर्शक भाषणें करून हा त्या दुसऱ्या रावसाहेबापेक्षां अधिक मोठा चमत्कार करून दाखवील, अशा अपेक्षेनें मजकडे पाहूं लागले. मी स्कौटी पोषाखांत होतों. पायांतले बूट काढून ते मीं गळ्यांत दोरीनें अडकावून दिले, काठी त्या दोरीलाच लटकावून दिली आणि पाठपिशवी व पाणलोटा नीट आवरून पुलाच्या ऐल कांठावर जाऊन ओणवा झालों.

खालून जोरानें वहाणारा पाण्याचा लोंढा, आणि त्याच क्षणीं त्या प्रवाहांतून धडपड करीत वहात जाणारी एक म्हैस पाहून मला चक्कर आली. मी कपाळाला हात लावून बसलों. टाळ्यांचा गजर.

"रावसाहेब गभरी गयो."

"ए मराठा शिलेदार! असाच तुझा एन्सेस्टर (पूर्वज) सिंधु नदीचा पार गेला काय?"

असल्या प्रकारचीं उपमर्दकारक भाषणें ऐकून माझें रक्त उसळल्या खेरीज राहील काय? (येथें 'नाहीं' असें उत्तर द्यावयाचें आहे.) "अरे भाईसाहेबांनो, मी घाबरलों नाहीं. मी अगोदर गुरूचें स्मरण करून नंतर ही सिगारेट तोंडांत धरून जाण्याकरितां थांबलों आहें," या अर्थाचें धेडगुजरी स्पष्टीकरण मीं केलें.

नंतर सिगारेट कोणत्या खिशांत आहे हें माहीत असूनहि सगळे खिसे चांचपून सिगारेटपेटी काढिली. त्यांतील सिगारेट तोंडांत धरून काडयांची पेटी त्याच पद्धतीनें चांचपून बाहेर काढून सिगारेट पेटविली. बऱ्याच वेळां अंगांत रग आणण्याकरितां मी सिगारेटचा उपयोग करीत असतों. सिगारेटमधून निघणाऱ्या धुराबरोबर माझ्या मनाचा उदासपणा हवेंत वितळून जातो आणि हवेंतील त्याच्या टोंकाशीं असणारी आग माझ्या अंतःकरणांत शिरते. सिगारेटचे दोनतीन झुरके झाल्यावर मी उत्साहानें त्यांस म्हणालों, " भाईसाहेबांनो, आतां एक दोरी माझ्या कंबरेला बांधा, म्हणजे–"

" तुम्ही पडी गेलां म्हणजे वरतीं खेसायला ! " मला माझ्या ' एन्सेस्टरा 'ची आठवण करून देणारा लठ्ठ स्वयंसेवक म्हणाला.

त्याच्याकडे लक्ष न देतां मीं आपलें वाक्य पुरें केलें, " मी पलीकडे तारेच्या खांबाला बांधीन. तुम्ही ती इथल्या तारेला बांधा, म्हणजे तिला धरून तुम्ही सगळे पलीकडे येऊं शकाल. "

आपण पलीकडे कसे जाऊं हा प्रश्न आमची चेष्टा करण्याच्या भरांत त्या लोकांच्या डोक्यांत आला नव्हता; परंतु माझी युक्ति पसंत पडून त्यांनीं दोनतीन दोऱ्या एकीला एक बांधून केलेल्या लांब दोराचें एक टोंक माझ्या कंबरेभोवतीं बांधलें; पण अद्याप रुळावरून पलीकडे जाण्याचा हिय्या होईना. माझा धिम्मेपणा व सावधगिरी पाहून रागावून गुंड्याभाऊ ओरडला, " ए आप्पा ! असा भितोस काय ? या वेळीं महाराष्ट्राची अब्रू डळमळायच्या बेतांत आली आहे तुझ्या भागुबाईपणामुळें ! चल लवकर."

" गुंड्याभाऊच्या भीतीनें मीं रांगत रांगत एकेक लाकडी चौकट (स्लीपर) आक्रमण्यास प्रारंभ केला. दोन स्लीपरांच्या मधून खालीं पाहिलें कीं, दोनतीन हात अंतराखालून जोरानें धावणारा आणि आपल्याबरोबर नदीकांठच्या मांजी घरांतलें सामानसुमान, गुरें, झाडांच्या मोठया खांद्या, असले पदार्थ वाहून नेणारा पाण्याचा लोंढा घेरी आणतो कीं काय असें वाटे; डोळे मिटून जावें तर घसरण्याची भीति अशा स्थितींत दोन कमानी ओलांडून गेलों व पुढल्याच स्लीपरपाशीं पाय घसरला. क्रमिक चित्रपटांत हप्त्याच्या शेवटीं असा देखावा असतो, पुलावरून खालीं पाण्याच्या प्रवाहांत बुडणाऱ्य माणसाचें काय झालें तें पहाण्यास त्याच नाटकगृहांत पुढल्या शनिवारचें आमंत्रण असतें.

परंतु संथपणें चिनाई शेंगा चावीत आणि कोल्डड्रिंकचे ग्लास रिकामे करीत सिनेमांतील रोमांचकारी दृश्यें पहाणाऱ्या प्रेक्षकासारखी मजा वाटण्याच्या स्थितींत मी नव्हतों. माझा पाय घसरल्यानें मी रुळांवरून खालीं पाण्यांत पडावयाचा, परंतु कमरेला दोरी बांधलेली असल्यानें त्रिशंकूसारखा लोंबकळत राहिलों. इतक्यांत गुंड्याभाऊनें उलट दिशेनें सपाट्यानें येऊन मला उचललें व आम्ही उत्तर तीरावर येऊन ठाकलों. कंबरेचें दोरीचें टोंक सोडून मीं तें तारायंत्राच्या एका खांबाला बांधिलें व मग त्याला धरून सर्व जण आम्हांला येऊन मिळाले. आम्ही असे धारिष्टानें पुढें येऊन इतरांस मार्ग करून दिला नसता तर त्या लोकांना दोन दिवस खोळंबून राहावें लागतें.

आतां बडोदें पांच कोसच राहिलें होतें. तेवढें अंतर मोठेसें विघ्न न येतां तोडून ता. २२ च्या संध्याकाळीं आम्हीं बडोदें शहरांत पोंचलों. त्या दिवशीं सकाळींच पूर ओसरला होता व पुराच्या पराक्रमाचें अधिक भिषण स्वरूप दृष्टीस पडत होतें.



कमरेला दोरी बांधली असल्यानें

प्रोफेसर मल्हारराव दिघे हे जंबुबेट नांवाच्या मोहल्ल्यांत रहात होते, त्यांच्याकडे आम्ही उतरलों. रात्रीं तार ऑफिसचें दळणवळण सुरू झालें होतें. 'तुम्ही जिवंत आहांत काय तें कळवा,' अशा हजारों तारा परगांवांहून बडोद्याच्या रहिवाशांस येऊन थडकत होत्या व खुशालीच्या तारा तेथून बाहेर कडकडत होत्या. तार ऑफिस मुद्दाम रात्रंदिवस चालू ठेवण्याची व रात्रींहि साधारण दरानें तारा



स्लीपराखालीं लोंबकळत राहिलों.

करण्याची सवलत तारखाल्यानें दिली होती.

मल्हाररावांची खुशाली कळविणें ही कामगिरी संपली तरी या संकटकाळीं बडोद्यास चारपांच दिवस राहून समाजसेवा करण्याचें आम्हीं ठरविलें. पुराच्या धडाक्यानें पुष्कळ घरांना रस्त्यांकडून व वरून खिंडारें पडलीं होतीं, कित्येक तर भूमिसुहृद् बनलीं होतीं. त्यामुळें चोऱ्यांचा सुळसुळाट झाला होता. चोऱ्यांमुळें त्यांचे आनुषंगिक खून पडण्याचा संभवहि होता; त्यामुळें बडोद्यांतल्या पुढाऱ्यांनीं ‘ जानमालरक्षण समिति ’ काढिली होती, तिच्यांत प्रो. मल्हारराव हे पुढारी असल्यानें रात्रीच्या स्वयंसेवक पाहारेकऱ्यांत नांवें नोंदण्यास आम्हांला मुळींच पंचाईत पडली नाहीं.

आ आ ऽ ऽ ऽ ऽ क्छ !

हुंश्यां ऽ ऽ ऽ ऽ र !

सावधा ऽ ऽ ऽ न !

अशा आरोळ्या ठोकीत व काठ्या आपटीत जंबुबेटांतून निघून चार तरुण पहारेकरी दांडियाबाजारांत शिरले होते. त्यांतला एक मजबूत बांध्याचा गोरटेला पहारेकरी हा आपला गुंड्याभाऊ होता. त्याच्या डोक्यावरची ती गवळी पद्धतीची कानटोपी, अंगांतला तलम तालिमबाजी हाततुटका सद्रा, त्यांतून दिसणारा त्याचा काळा गंडा, तांबूसवर्ण धोतर, हातांतला जाड सोटा, व मराठी भाषेच्या शुद्धीकरणार्थ “ सावधाऽन ऽ!” असें ओरडणें, या सगळ्यांवर पुणेरी मर्दानी तरुणाचा छाप स्पष्ट दिसत होता. त्यानें खडे गोळा करून पाठीवरच्या पिशवींत ठेविले होते व ते मारण्याकरितां एक गोफण घेतली होती. नानुलाल नांवाचा एक गुजराती तरुण

विद्यार्थी आणि धांदले नांवाचा तरुण दक्षिणी शिंपी हे या बॅच-मध्यें सामील होते. धांदल्याच्या हातांत कंदील होता. आणि स्कौट-कमिशनरसारखा नीटनेटका पोषाक केलेला, डोळ्यांना चष्मा, डोक्यावर हॅट, तोंडांत उंची सिगारेट, असा हा रुबाबदार पहारे-करी कोण ?

वाचक हो, माझ्याशिवाय इतका तरतरीत मनुष्य दुसरा कोण असणार ? जंबुबेटांतून दांडिया बाजार ओलांडून काछियावाडी-पर्यंत एका वाटेनें जाऊन दुसऱ्या वाटेनें परत यावयाचें अशी आमची कामगिरी होती. वाटेंतल्या घरांपैकीं बरींच घरें ओस राहि-लेलीं होतीं; कारण या भागांत पुराच्या पाण्यानें सर्व घरांचे तळमजले बुडवून टाकले होते व सुरक्षितपणाकरितां दुसरीकडे गेलेले सगळे लोक अद्याप परत आले नव्हते. जिकडे तिकडे सामसूम दिसत होती तरी एखाद्या आंबटशोक्याच्या घरांतून बाजाच्या पेटीचे सूर ऐकूं येत होते. या सामसुमीचा भंग पहारे-कऱ्यांच्या टोळ्यांनीं मात्र होत होता. दहावीस पावलें गेलें कीं, स्वयसेवकांची एखादी टोळी भेटत होती.

रात्रीं अकरांच्या सुमारास पहारेकरी कमी होऊं लागले. नानु-लाल हा धांदल्याला म्हणाला, "च्यल धांदले, आपण सिनेमा पाहून येऊं. आज बहु धररगडच्या खेल आहे."

आम्ही त्यांना सिनेमाला जाण्याची परवानगी दिली व दोघेच फेऱ्या करूं लागलों. फेऱ्या करतांना एका दुमजली घराशीं पोचलों. त्याच्या तळमजल्याला गजाच्या खिडक्या होत्या. एका खिडकींतून माझी सहज आंत नजर गेली, तों अंधारांत चमकणारा एक मोठा

बिंदु दिसला. तो पाहून मी थबकलों व 'सावधान!' असें ओरडण्याच्या बेतांत आलेल्या गुंड्याभाऊस थांबविलें. तो बिंदु हालला.

माझ्या छातींत चर्र झालें.

"हें बहुतकरून चोरकंदिलाचं भिंग असलं पाहिजे," गुंड्याभाऊनें आपला अभिप्राय दिला. तें भिंग एकदम खालून वर जाऊन पुनः खालीं आलें, त्याबरोबर एकदोन भांडीं खालीं पडल्याचा आवाज आला. आम्ही गजाच्या खिडकीच्या दोन बाजूंस उभे राहून लेन्सवाल्या चोराच्या लीला पाहूं लागलों. तो चोर भिंग घेऊन फळ्या, फडताळें, टेबलखुर्च्या, सर्व सामानसुमानाची उलथापालथ करीत होता व जिनसा पडल्याचे आवाज मधून मधून ऐकूं येत होते. चोर पकडण्याची संधि मिळालेली पाहून मला फार आनंद झाला.

मीं आपल्याजवळची एक काडी शिलगावून आंत उजेडाचा झोत पाडला व त्या उजेडांत एक शुभ्र वस्त्रें परिधान केलेला पुरुष उभा आहे असें आम्हां दोघांना दिसलें. हा त्या चोराचा साथीदार असला पाहिजे. काडी विझली. वारा इतका कीं, दुसरी काडी पेटेना; परंतु आतां अंधारांत त्या पुरुषाची आकृति पुसट पुसट दिसतच होती.

पुनः भिंग हालूं लागलें. खालून वर, वरून खालीं, पुढून मागें, मागून पुढें असें तें सारखें होत होतें.

"बस्स. आतां या दोन्ही चोरांना आधीं गोफणीचा प्रसाद दिला पाहिजे. म्हणजे ते लंगडे होतील आणखी त्यांना पकडणं

सोपं जाईल, " असें म्हणून गुंड्याभाऊनें एक खडा मारून भिंग फोडलें आणि दुसरा खडा त्या चोराच्या साथीदाराच्या पायावर मारला. साथीदारानें तोंडांतून यत्किंचित् आवाज काढला नाहीं; परंतु तो सगळाच्या सगळा जमिनीवर आपटला व आपटतांच त्याचे खळकन् तुकडे झाले ! हा चमत्कार काय आहे ! अशा आश्चर्यांत पडण्याच्या आंतच त्या जागीं दिव्याचा उजेड आला आणि त्या चोराच्या साथीदारासारखे आणखी बरेच लोक तेथें उभे असलेले दिसले. त्यांत नामांकित पुढारी आणि राजेरजवाडेहि होते. अर्थात् ही एका मूर्तिकाराची खोदशाळा होती असें आम्हांला कळलें. गुंडयाभाऊच्या गोफणीचा दगड लागून एक पुतळा फुटून खालीं पडला होता व ज्याचा एक डोळा रक्तबंबाळ झाला आहे असें एक काळें मांजर सैरावैरा धांवत होतें. दिवा आणणारा मनुष्य आपल्या भग्न कृतीकडे दुःखानें पाहात होता. थोडया वेळानें आपल्या मांजराकडे त्याची दृष्टि वळली.

आपली कृति अशी खरोखरच्या उजेडांत आलेली पाहून घाबरलेल्या गुंड्याभाऊनें गोफण पिशवींत ठेवून दिली, आणि आम्ही मागें पाऊल घेणार तोंच आणखी चारपांच स्वयंसेवकांनीं वाट अडविलेली दिसली म्हणून तसेच थबकलों.

इतक्यांत त्या घराचें दार उघडून मूर्तिकार ( यांचें नांव प्रोफेसर जाधव होतें असें नंतर कळलें ) काखेंत तें मांजर घेऊन त्याला गोंजारीत उंबऱ्यावर उभे राहून रागानें म्हणाले, " कोणीं हा मूर्खपणा केला ? या बिचाऱ्या मांजराचा एक डोळा पूर्वीच नाहींसा झाला होता, आणखी एकच शिल्लक राहिला होता, तो

टाकला फोडून ! आणखी माझा हा लाइफसाइज क्ले मॉडेल ( भरआकारी शाडूचा पुतळा ) फोडून टाकला न् माझी आठ दिवसांची मेहनत फुकट घालविली ! चोर एक वेळ पतकरले; पण हा




कोणीं हा मूर्खपणा केला ?

व्हॉलंटियरांचा सुळसुळाट नकोसा झाला आहे बुवा ! आतां कोण देईल हें माझं नुकसान भरून ? जानलेव समिति कीं काय ? ”

स्टूडिओपुढें एव्हांना बराच समुदाय जमलेला होता आम्ही एकेक पाऊल मागें सरकत तेथून पसार झालों, ते दुसऱ्या एका गल्लींत शिरलों. ही गल्लीं आमच्या कक्षेंत होती कीं नव्हती हें आम्हांला माहीत नव्हतें; परंतु पुनः त्या रागावलेल्या मूर्तिकाराच्या घरासमोर जाणें नको असें आम्हांस वाटत होतें. पुनः पहाऱ्याचे वेगळाले साद घालीत काळ्या आपटींत जात असतां, मागून तर कोणी आपल्याला धरावयास येत नाहीं ना ? अशा भीतीनें मधून मधून मागें वळून पाहातच होतों. दोनतीन घरें साफ भुईसपाट झालेलीं लागलीं व त्यांतल्या एकांत खडबड चाललेली ऐकूं येत होती; परंतु मांजरच असेल तें असें वाटून आम्ही पुढें चालूं लागलों.

“ नका हो अण्णासाहेब या तुमच्या गरीब मुलीला असं छळूं ! मी पदर पसरून तुमची विनवणी करित्यें ! अण्णासाहेब, विनवणी करत्यें. ” हा कोकिळेच्या सारखा मंजुळ आणि मधुर आवाज ऐकून आम्ही स्तंभित होऊन ज्या मुखांतून हा सुंदर स्वर निघाला तें मुख किती सुंदर असेल याची कल्पनाच करीत राहिलों. तोंच एक भसाडा आवाज आमच्या कानीं पडला.

“ खबरदार शके ! तूं खूब आपल्याला माझी मुलगी समजत असशील ! पण तुझ्या जन्माचं रहस्य तुला मीं सांगितलं म्हणजे तुला वाटेल कीं, यापेक्षां आण्णासाहेबांनीं तापलेल्या शिशाचा रस आपल्या कानांत कां नाहीं ओतला ? बस्स ! जाऊं दे तें; बोल,

या कागदावर सही करून देतेस कीं नाहीं ?"

अण्णासाहेबांचेच हे शब्द असले पाहिजेत हें उघड आहे. मीं गुंड्याभाऊच्या पाठीस चिमटा घेऊन म्हटलें, "गुंड्या ! लेका, रोमान्स आहे रे रोमान्स ! बहुतकरून या युवकीचं न् तुझं लग्न जमणार असं दिसतं आहे."

"चूप, ऐक," त्यानें मला चापलें.

पुनः वरून त्या सुंदर ( असावीसें वाटलें ) तरुणीचे शब्द ऐकूं आले, "अण्णासाहेब, मग मला तुम्हीं लहानाची मोठी केलीत तें आपला हा हेतु साध्य करण्याकरतां का ? हा हेतु साध्य करण्याकरतां का, अण्णासाहेब ? सांगा. मग तुमच्यांत आणखी कापून खाण्याच्या उद्देशानं कोंबडींबदकं लठ्ठ करणाऱ्या साध्या खाटकांत अंतर काय ? काय अंतर आहे, अण्णासाहेब ?"

खाटीक कोंबडींबदकें लठ्ठ करीत असतो ही कल्पना चुकीची होती परंतु या नीच अण्णासाहेबाच्या कैदेंत वाढलेल्या त्या अनाथ अबलेला तें काय बरें माहीत ? गुंड्याभाऊचें मन विरघळत असल्याचें त्याच्या थरथर कांपणाऱ्या ओठांवरून व विस्फारलेल्या डोळ्यांवरून दिसून येत होतें.

"कारटे ! तुला लहानाची मोठी केली ती माझ्या बायकोनं ! केवळ त्या माउलीच्या वेडेपणानं तूं एवढी मोठी होऊं शकलीस ! तिची माया तुझ्यावर नसती, तर तूं तान्ही होतीस तेव्हांच तुझी मान मुरगाळून टाकून उकिरड्यावर तुला फेकून देऊन तुझ्या बापाची इष्टेट घशांत घातली असती, समजलीस ! तुला जगवलं त्याचे उपकार असे फेडतेस काय, कारटे ? कर

सही या कागदावर, नाहीं तर हाल हाल करून तुला सही करणं भाग पाडीन. त्या पाजी हेमंतच्या नादीं लागून बहकूं नकोस."

आण्णासाहेबांची ही जरब ऐकून गुंडयाभाऊ क्रोधानें थरथर कांपूं लागला व दारास धक्का देऊन आंत शिरण्यास पाहूं लागला. परंतु त्याला आवरून मी म्हणालों, "गुंडयाभाऊ, दम धर जरा. हा बदमाष आणखी काय बोलतो तें पाहूं. ऐन वेळीं त्याच्या पाजी मसलतीला खो घालण्यांतच खरी खुबी आहे."

असें मी बोलत आहें तों पुनः त्या युवकीचा करुण स्वर कानीं पडला. "हेमंताच्या नादीं लागूं नकोस असं म्हणतां तर सांगा, अण्णासाहेब, त्यांच्याशिवाय खऱ्या प्रेमाचं, खऱ्या जिवाचं दुसरं कोण आहे? कोण आहे, अण्णासाहेब, आहे कोण?"

"मी आहें!" गुंडयाभाऊ खाळून ओरडला; परंतु त्याचें ओरडणें आण्णासाहेबांच्या गर्जनेंत लुप्त झालें. "कोण आहे?" तिला वेडावीत आण्णासाहेब म्हणाले, "माझा वसंत आहे. हा माझा वसंत इतका देखणा, हुषार, गुणी असून त्या भिकाऱ्याच्या पोराला माळ घालायला पाहातेस?"

"पण मीं त्यांना," हुंदके देत ती म्हणाली, "आपलं अंतःकरण अर्पण केलं आहे—अंतःकरण त्यांच्या चरणीं वाह्यलं आहे. तें आतां दुसऱ्याला कसं देऊं, अण्णासाहेब, कसं देऊं दुसऱ्याला?" आतां तिचें स्फुंदन सुरू झालें.

"खुशाल दे तुझं अंतःकरण त्या हेमंत्याला! आपला हात आणखी इष्टेट माझ्या वसंताला दे म्हणजे झालं, पण बस्स, तुझ्याशीं हुज्जत घालायला मला वेळ नाहीं. दे या कागदावर सही करून!"

" देत नाहीं, साफ देत नाहीं. करा तुम्ही माझ्या जिवाचं बरंवाईट काय करायचं असेल तें. " त्या युवकीचे वीरश्रीचे उद्गार ऐकून माझें हृदय थरारलें. अरेरे ! मजपेक्षां गुंडयाभाऊ किती नशीबवान, कीं त्यानें अद्याप लग्न केलें नव्हतें !

" ठीक आहे. तुला वठणीवर आणायला किती वेळ लाग-तोय्. वसंत ! ए वशा ! टाक हिला कोंडून त्या अंधार कोठडींत न् किल्ली माझ्याजवळ दे. बघतोस काय शेळपटा ? मी जरा खालीं नळावर जाऊन येतों."

तो पाजी मनुष्य नळावर जाण्याकरितां खालीं येत आहे हें पाहून आम्ही दोघे जिन्याच्या दोन बाजूंस दबा धरून बसलों व शीळ घालीत धाड धाड जिना उतरून तो हरामखोर बाहेर पड-तांच त्याच्यावर तुटून पडलों. गुंडयाभाऊ त्याला खालीं पाडून त्याच्या उरावर बसला व रागानें म्हणाला, " अरे पाजी बदमाषा ! त्या अनाथ अबलेचा छळ करून तिची संपत्ति घशांत घालायला पाहातोस काय ? "

आण्णासाहेब धडपड करीत म्हणाला, " अरे सद्या, हें तर पांचव्या अंकांत आहे ! "

" पांचव्या अंकांत का ? " त्याच्या छातींत गुद्दा लगावून गुंडयाभाऊ म्हणाला, " तुझ्या या कपटनाटकाचा पांचवा अंक आतांच करून त्याचे बारा वाजवतों, समजलास ? हलकट माणूस ! बोल त्या युवकीला कुठं कोंडून ठेवलं आहेस ! त्या अंधारकोठडीच्या किल्ल्या स्वाधीन करतोस का देऊं आणखी खाऊ ? "

" सद्या, ग....ग....गाढवा, चावटपणा काय आहे ? "

आण्णासाहेबांनीं धापा टाकीत विचारिलें.

" चावटपणा ? त्यांच्या कानास हिसका देऊन गुंडयाभाऊ खेंकसला, " तुझ्यासारख्या बदमाषाला पिटून काढणं हा चावट-पणा, आणखी त्या अनाथ दीन युवकीला कोंडून उपाशीं ठेवणं हा सभ्यपणा झाला होय ? बोल, कुठं आहे तो तुझा कारटा वसंत्या, म्हणजे तुमची दोघांची गठडी एकदम बळवतों !"

"सद्या, क....क....कोण अरे ही क....क....कसली चेष्टा—"

खालीं पडून सुटकेची धडपड करणाऱ्या आण्णासाहेबांनीं रडक्या सुरांत म्हटलें.

पुनः त्यांना एक ठोसा देण्याकरितां गुंडयाभाऊनें उगारलेला हात त्या युवकीच्या, " जाऊं द्या हो, त्यांना, " या मंजुळ विनंतीमुळें वरच्या वर राहिला. ही गोड विनंती ज्या मुखांतून निघाली त्या मुखाकडे पहाण्यास गुंड्याभाऊनें तोंड वळविलें. परंतु तें मुख त्यांच्या अपेक्षेप्रमाणें एखाद्या सुंदर स्त्रीचें नसून एका काळ्याभोर वर्णाच्या सोळासत्रा वर्षे वयाच्या विद्यार्थ्याचें होतें, आपलें मधुर सुखस्वप्न असें ढांळसलेलें पाहून गुंड्याभाऊ चकित झाला. त्याची पकड ढिली पडली. लगेच आण्णासाहेबांनीं आपली सुटका करून घेतली आणि बेसावध असणाऱ्या गुंड्या-भाऊस लोळविलें.

हा सगळा प्रकार होईपर्यंत वीसपंचवीस स्वयंसेवकांचा घोळका तेथें जमला होता. त्यांपैकीं कित्येकांजवळ कंदीलहि होते. दोघांची मारामारी पाहून कांहीं पोक्त गृहस्थांनीं दोघांस धरून ठेविलें. आण्णासाहेब सारखे हातवारे करीत राहिले होते व तोंडानें गुंड्या-

भाऊस आम्हानें पुटपुटत होतें. कारण लोकांनीं दोघांस धरून ठेविल्यानें आम्हानें कसोटीस लागणार नाहींत अशी त्यांना पक्की खात्री होती. बुचकळ्यांत पडलेला गुंड्याभाऊ स्वस्थ उभा होता.

" अहो, झालं काय ? "

" अरे, शुं थयुं ? "

असे उद्गार निघूं लागले. आण्णासाहेबांकडे बोट करून मीं म्हटलें, " हा पाजी मनुष्य–"

" तोंड संभाळून बोल ! " आण्णासाहेब दरडावले.

" हा सभ्य मनुष्य या माडीवर एका अनाथ तरुण सुंदरीचा छळ करून एका कागदावर तिची सही मागत होता, " मीं खुलासा करूं लागलों.

" हिः हिः हिः हिः ! " तो मंजुळ आवाजाचा काळा तरुण हांसून बोलला, " आतां हें सगळं कोडं उलगडलं ! आम्ही कलाभुवनचे वऱ्हाड-खानदेश–नाशिक नगर–मोंगलाई क्लबचे विद्यार्थी ' शकुंतला ! शेंबूड काढ ! ' नांवाचं नवीन धर्तीचं सिनेमा फॅशनचं नाटक बसवीत आहों. त्याची तालीम चालली होती. तिच्यांत हा असा देखावा होता. अनाथ अबला दुसरी तिसरी कोणी नसून मंचि तों होतों, हिः हिः हिः हिः !"

कोड्याचा उलगडा झाला तरी भांडणाचा निकाल अद्याप लागला नव्हता. आण्णासाहेब आपली छाती चोळीत गुंड्याभाऊकडे रागानें पहात, " मला इथें भर रस्त्यांत पाडून यांनीं मार दिला त्यामुळें शारीरिक आणखीं मानसिक इजा मला झाली आहे, तिची भरपाई करून दे, नाहींतर फिर्याद लावतों, " असें म्हणत होते.

आम्ही परक्या शहरांत, परक्या गल्लींत एकटेच दोघे असल्यानें फार घाबरलों होतों. इतक्यांत नानुलाल व धांदले सिनेमाचा खेळ पहाणें आटोपून तेथें प्राप्त झाले व आम्हांला पाहून म्हणाले, " वाः मेहरबान, आपला बीट सोडून या पिरामिटर रस्त्यावर कशाला आलांत हो ? "

" आणखी तुम्ही तरी बीट सोडून सिनेमा पहायला कशाला गेलां होतां हो ? " मीं त्यांना चापलें.

आणखी चारपांच मंडळी मूर्तिकार प्रो. जाधव यांना घेऊन तेथें आली. आपण या दोघांना आपल्या खिडकीशीं प्रथम पाहिलें व यांनींच दगड मारून आपला क्ले मॉडेल व मांजर यांना इजा केली असली पाहिजे, असें प्रोफेसरांचें म्हणणें होतें. गुंड्याभाऊची पिशवी तपासून पहातां तींत दगड व गोफण हे दोन विरुद्ध साक्षीदार मिळाले. मग काय ? प्रोफेसरसाहेबहि गुंड्याभाऊकडून नुकसानभरपाई मागूं लागले.

आम्ही धांदल्यांकडून प्रो. मल्हाररावांस तेथें बोलावून आणिलें. वऱ्हाड–खानदेश–नाशिक–नगर–मोंगलाई क्लबाला देणगी म्हणून पंचवीस रुपये व प्रोफेसरसाहेबांस नुकसानभरपाईदाखल शंभर रुपये देण्याचें आम्हीं कबूल केलें. प्रो. मल्हारराव हे जामीन राहिले व आम्ही त्यांच्या बिऱ्हाडीं परत आलों.

दुसऱ्या रात्रीं आम्ही आपला बीट बदलून घेतला. कारण उघड आहे. आम्हांला सयाजीगंजचा बीट मिळाला. तेथें पहारा करीत असतां दोघेजण ट्रंका डोक्यावर घेऊन धांवत होते, त्यांस आम्हीं हटकलें. ट्रंका आमच्यापुढें ठेवून त्यांच्यांतला एकजण

मला म्हणाला, " देखो साब, हम लोग ठेसन जा रहे तो हमारे पीछे चोर आनेको लगे, फेर हम भगने लगे. " इतक्यांत टापांचा आवाज ऐकून ते दोघे दचकले व " अरे आगये हरामखोर ! " असें म्हणून पळून गेले. ट्रंका आमच्यासमोर राहिल्या.

टापांचा आवाज मोठा होत जाऊन आमच्यापुढें एक घोडेस्वार उभा राहिला त्यानें खालीं उतरून आमचे हात पकडले व " च्योर पकडा !" अशी आरोळी दिली. तत्क्षणीं तेथें लोक गोळा झाले. मुद्देमालासकट चोर सांपडल्यावर त्यांना कायदेशीर सजा होण्याच्या अगोदर मिळावयाचा प्रसाद आम्हांला मिळाला. प्रो. मल्हाररावांची ओळख आम्ही सांगूं लागलों; पण सगळी चौकशी उद्यां करूं, सध्या सरकारचे पाहुणे म्हणून पोलीसचौकींत रात्र काढा असें उत्तर मिळालें. रात्रभर पोलीस चौकींत काढल्यावर दुसऱ्या दिवशीं प्रो. मल्हारराव यांच्या वशिल्यानें आम्ही सुटलों. बडोद्याचे राजवाडे पहाण्याऐवजीं तेथली पोलिस चौकी आणि माजिस्त्रेट कोर्ट हीं मात्र पहावयास छान मिळालीं. समाजसेवा आपल्याला फारशी धार्जिणी नाहीं असें मनाला पटवून आम्ही पुण्यास परत येण्यासाठीं त्याच रात्रीं बडोद्याहून निघालों.



# रावसाहेब चिमणराव, स्टेट-गेस्ट

आज संध्याकाळीं पावणेसहा वाजतां ऑफिसांतून परत येतांच सौ. च्या रोजच्या वर्तनांत मोठेंच परिवर्तन घडून आलेलें दिसलें. माझ्या घरीं येण्याच्या वेळीं ती नेहमीं आपल्या एखाद्या मैत्रिणीच्या घरीं गेलेली असावयाची व माझ्यानंतर अर्धा-पाऊण तासानें परत येऊन, " अग बाई ! आज कचेरींतून लौकर परत यायचं वाटतं ! मग हातांनींच चहा करून घेतला असेल ? थोडासा शिल्लक ठेवला आहे का ? " असें पदर बांधीत म्हणायाची; परंतु आज ती जणूं माझी वाटच पहात होती असें दिसलें. मी ऑफिसचे कपडे बदलून साहेबाचा पुनः ब्राम्हण बनलों नाहीं तोंच टेबलावर चहा, तिखटामिठाचा सांजा आणि तांब्या-भांडें हजर झालें. नेहमीं आमचें सर्व टपाल सेन्सॉर होऊन नंतर आमच्या हातांत पडावयाचें तें आज बंद स्थितींत आलेलें पाहून मला जरा आश्चर्य वाटलें.

सांजा-चहा मटकावतांच गुळण्यांकरितां पंचपात्रींत पाणी, तोंड धुतांच तो नॅपकिन, लगेच सुपारी—

" अरे वा: ! आज हें आहे तरी काय ? आज अगदीं एखाद्या जहागिरदारासारखी बरदास्त चालली आहे ! "

" जसं कांहीं रोज मी कांहीं करीतच नाहीं ! " मीं काढून टाकिलेले बूट उचलून त्यांत पायमोजे व्यवस्थेनें ठेवीत ती रागाचा आविर्भाव आणीत म्हणाली.

" बरं बुवा; राहिलं आमचं, पण आज काय लुंगवायचा विचार आहे ? "——

" बरं; असं वाटत असलं तर मी इथून निघूनच जात्यें. खायप्यायला द्यायचं एखाद दिशीं चुकलं तर राग येतो खंडीभर, अन् काम करायला लागलं तर त्याचा भलताच अर्थ करायचा ! " बूट जागच्या जागीं ठेवीत ती म्हणाली व फणकऱ्यानें निघून गेली; तें एक परी बरेंच झालें; कारण अनेक प्रकारच्या खर्चांनीं त्या महिन्यांत माझें टाळकें शेकलें होतें व आणखी कांहीं तरी खर्चाची ही प्रस्तावना घरांतून होत होती. बायको आपली बरदास्त विशेष काळजीनें करूं लागली कीं, खजिन्यावर कांहीं-तरी हुंडी आहे असें ज्याच्या ध्यानांत येत नाहीं तो पुरुष अगदीं मतिमंद समजावा. सौ. घरांतून निघून गेली व मी कोटटोपी चढवून फिरावयास जाण्याला निघण्यापर्यंत तिचा राग टिकेल अशी आशा माझ्या मनांत उत्पन्न झाली; परंतु ' उत्पद्यन्ते विली-यन्ते दरिद्राणां मनोरथाः ' या संस्कृत म्हणींत वर्णिल्याप्रमाणें ( मॅट्रिकमध्यें मीं संस्कृत दुसरी भाषा घेतली होती ) मी कोटटोपी चढवून बाहेर निघतों तों ती आपला राग गिळून टाकून पुनः बाहेर आली; व म्हणाली, " खर्च करावा लागणार आहे थोडासा !"

" हं, " आवंढा कीं काय म्हणतात तो गिळून मी उत्तरलों, " तें वाटलंच होतं मघां, पण काय बेत आहे ? मी तर बुवा तुझ्या खर्चांना कंटाळलों आहें. "

आमचें संभाषण ऐकून आई बाहेर येऊन म्हणाली, " चिमण बाबा, आतां हा थोडा खर्च लौकिकाकरतां केला पाहिजे. "

" वाः ! केवढा आमचा लौकिक वायां चालला आहे ? पन्नास रुपड्यांकरतां हापिसांत खर्डे घासतां घासतां कंबरेचे टांके ढिले होतायुत न् म्हणे लौकिक ! " चिडून मी म्हणालों.

" आपल्या इथला नसला तरी माहेरचा लौकिक मला संभाळला पाहिजे ना ? " अनार्येप्रमाणें माझी भार्या म्हणाली. आईला हा टोमणा आवडला नाहीं, पण बिचारी मूग गिळून गप बसली. मीं मघां आवंढा गिळला, आतां आईनें मुगांवरच समाधान मानिलें !

" उद्यां माझी मावसमावशी यायची आहे, तेव्हां आतांच मंडईतून फळफळावळ आणखी मेवामिठाई आणली पाहिजे. सकाळीं लौकरच यायच्या आहेत त्या, " ती ऐटीनें सांगूं लागली.

" हंः ! तुझी मावसमावशी यायची म्हणून फळफळावळ न् मिठाई, आणखी माझी मावशी आली होती तेव्हां थालिपिठाला लावायला लोणीदिखील मिळायची पंचाईत पडली होती ! " आई जवळ असली म्हणजे सौ. शीं स्पष्ट बोलण्यास मी मुळींच डगमगत नाहीं.

" अरे पण चिमण, हिची मावसमावशी म्हणजे कोण ठाऊक आहे का तुला ? चंदनवाडच्या राणीसाहेब आहेत त्या ! त्या उद्यां बसायला येणार आहेत, त्यांच्या इतमामाप्रमाणं त्यांची वेवस्था ठेवली पाहिजे, " आई म्हणाली.

माझे घरचे, आजोळचे आणि सासुरवाडचे जेवढे नातेवाईक होते, त्यांत लक्ष्मीशीं नातें असणारे कोणी नसल्यानें माझ्या मावससासूचें राज्ञीपद माझ्या अंतःकरणास अभिमानाच्या गुदगुल्या करूं लागलें. शिवाय या राणीसाहेबांची व त्यांच्या मध्यस्थीनें चीफ-

साहेबांची ओळख झाल्यास खर्डेघाशा चिमणराव जोग स्टेट कारभारींहि होणार नाहीं कशावरून, अशी आशा मनाला ओझरती चाटून गेली.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं राणीसाहेबांच्या स्वागताची जय्यत तयारी झालेली होती. अडीच रुपयांचीं फळें, दोन रुपयांचा सुका मेवा, दोन रुपयांची मिठाई आणि एक रुपया चौदा आण्यांत फुलें, अत्तर-गुलाब व विड्याचें सामान अशी खरेदी झाली. एक जरीकाठी भारीपैकीं खण उधार आणला. रा. कुळकर्णी यांच्या घरची मोठी सत्रंजी व गालिचा आणून त्यांवर चादरींत गुंडाळलेल्या गाद्यांचे लोड करून ठेविले. सौ. गुलाबबाईकडून चांदीचीं ताटें आणलीं, अत्तरदाणी-गुलाबदाणी तिनें आपल्या ओळखीच्या कोणाकडूनशी आणविली. टेबलावर परिटाकडून आणिलेली आमची एकुलती एक पांढरी स्वच्छ चादर पसरली. सकाळीं साडेआठ वाजतां मला घर सोडून जाण्याची तात्पुरती सूचना मिळाली, परंतु मला तर राणीसाहेब कशा आहेत तें पहावयाचें होतें, म्हणून आमच्याच वाड्यांतले बिऱ्हाडकर बंधु दत्तोपंत यांची आमच्या वाड्याच्या समोरील भागांत दरवाज्याशेजारीं एकखणाची 'धी न्यू भारत टेलरिंग फर्म' आहे तिच्यांत जाऊन बसलों.

पावणेनऊ वाजतां "चंदनवाड संस्थान, नंबर २" ची मोटार आमच्या दरवाजाशीं धडकली. लाल अंगरखा व पट्टावाल्या शिपायानें ड्रायव्हरच्या शेजारच्या आसनावरून उतरून मोटारचें दार उघडलें. त्यांतून राणीसाहेबांची स्वारी पांघरलेला शेला सावरीत, आणि मधून मधून गोठपाटल्या मागें सरकावीत उतरली.

सौ. सामोरी गेली होती; तिची मैत्रीण गुलाब व दत्तोपंतांचें कुटुंब ही मंडळीहि बरोबर होती. राणीसाहेबांनीं मोटारींत असलेल्या दासीस म्हटलें, " चांगुणा, रावसाहेबांना बसूं दे गाडींतच तुझ्याजवळ; भाऊसाहेब, तुम्ही या वाटलं तर खालीं. काय, इथेंच बसतां ? बरं, रावसाहेबांशीं भांडूं नका न् त्यांना चिमटे घेऊं नका बरं का ? चांगुणा, दुसरं दुपटं ठेवलं आहेस ना बरोबर ? रावसाहेबांचं अजून कांहीं झालं नाहीं. अगबाई, हें का घर काऊताई तुमचं ? फार चांगलं........" असें बोलत त्या घरांत गेल्या.

पंधरा मिनिटांनीं माझा मुलगा चि. मोरू मला राणीसाहेबांनीं बघायला बोलाविलें आहे असें सांगण्यास आला. मला फार आनंद झाला व निघणार तोंच माझ्या डोक्यावर टोपी नसल्याचें दत्तोपंतांनीं माझ्या लक्षांत आणिलें; परंतु माझी टोपी राहिली आमच्या माडींत, तेव्हां प्रसंगावधान धरून दत्तोपंतांची टोपी डोकीस चढवून आपल्या माडींत जाऊन राणीसाहेबांच्यापुढें अदबीनें नमस्कार करून राहिलों.

" कसं काय आप्पासाहेब, बरं चाललं आहे ? " त्यांनीं ममतेनें चौकशी केली.

" ठीक आहे तुम्—आपल्या आशीर्वादांनीं, " मीं नम्रपणें उत्तर दिलें.

" काऊताई आमची आवडती भाची आहे; कधींची म्हणती आहे चंदनवाडला ये म्हणून, पण योग आला नाहीं. तिच्या लग्नाच्या वेळीं आम्ही सिमल्याला गेलों होतों म्हणून हजर रहातां आलं नाहीं, " राणीसाहेब बोलल्या.

" हो, मोठ्यांच्या मागें सतरा हजार कामं असतात, " आई म्हणाली.

"सिमल्याला व्हाइसरॉयच्या बायकोची भेट झालीच असेल," गुलाब आपल्या ज्ञानाचा तोरा दाखवीत म्हणाली.

" हो हो, झाली तर ! लॉजमधें पार्टीलाच गेलों होतों. बरं; आम्ही येतों आतां. आप्पासाहेब, आपण आणखी काऊताई एकदां चंदनवाडला येऊन जा. सरकारना सुद्धां फार आनंद होईल.... भाऊसाहेबांच्या मुंजीला येऊं म्हणतां ?....ती फार लांब आहे. पण यंदाच आधीं येऊन जा अन् मुंजीला आणखी एकदा या. पहा आपले सुदाम्याच्या घरचे पोहे—" राणीसाहेबांनीं आमंत्रिलें.

" आपल्यासारख्यांनीं आपल्या घरच्या मेजवानीला सुदाम्याचे पोहे म्हटलं," गुलाब म्हणाली, "तर आमच्या सारख्याच्या खरोखरींच्या पोहेकुरमुऱ्याच्या फराळाला नांवच बाकी रहायचं नाहीं ! गरिबांच्या जवळची शब्दसंपत्ति तरी निदान श्रीमंतांनीं हिरावून घेऊं नये ! "

सौ. नें गुलाबला डोळ्यांनीं दाबिलें. राणीसाहेबांना गुलाबच्या बोलण्याचा राग आला नाहीं, कारण तिच्या या नाटकी वाक्याचा अर्थच त्यांना समजला नसावा !

" आतां चंदनवाडला गेलें म्हणजे फुरसतीचा वेळ पाहून आमंत्रण पाठवीन, तेव्हां वाटेल तशी सवड करून चार दिवस राहायला या ! असें राणीसाहेबांनीं आम्हां उभयतांना पुनः बजावून सांगितल्यावर मी पुनः आमंत्रण स्वीकारून " येतों " असें

म्हणून नमस्कार करून तेथून निघून दत्तोपंतांच्या दुकानांत जाऊन बसलों.

\+ \+ \+ \+

सुमारें तीन महिन्यांनीं मला चंदनवाडहून पुढें लिहिल्याप्रमाणें मजकुराचें पत्र आलें:—

" श्रीसर्वेश्वराय नमः ।

मु. चंदनवाड.

जि. सातारा.

ता. आजची, माहे हा, सन चालू.

मे. रावसाहेब चिमणराव विठ्ठल जोग, मु. पुणें स्वामीचे सेवेसी पोष्य गुंडो कृष्ण उपाध्ये, खासगी कारभारी निसबत श्री. सरकारवाडा, स्वस्थान चंदनवाड याचे कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती वि॥ पुणें येथें श्रीमंत सकल सौभाग्यवती राणीसाहेब यांनीं गेल्या श्रावणमासीं समक्ष आमंत्रण दिल्याप्र॥ आपण सौ. वज्रचुडे-मंडित काऊताई ताईसाहेब आणि चिरंजीवांसह आमचे सरकारकडे राजपाहुणे म्हणून येत्या पंध्रवड्यांत येण्याची मे॥ करितील. अन-मान होणार नाहीं. अगाऊ दोन दिवस वर्दी दिली असतां मसूर स्टेशनवर वाहन पाठविण्याची व्यवस्था होईल. व गेस्ट हाऊस-मध्यें " ( येथून पुढील मजकूर भाताचें तपेलें उतरण्याच्या कामीं आईनें लाविला ).

पुण्याहून सकाळीं निघून बेळगांवकडे जाणाऱ्या पॅसेंजरच्या दुसऱ्या वर्गाच्या एका खणांत तीन उतारू बसले होते. डोळ्यांस चष्मा, अंगांत पारशी फॅशनचा काळा कोट, गळ्याभोंवतीं

रेशीमकाठीं उपरणें, डोक्यावर झिरमळ्यांची पुणेरी पगडी असा एक तिशीच्या सुमाराचा तरुण; नाकास झुपकेदार नथ, जरीचें अस्मानी लुगडें, कोपरापर्यंत बाह्यांची पेशवाई चोळी, अंबाभवानी फॅशनचें कुंकूं, पायांत सफेत वहाणा, अशी एक तरुण स्त्री आणि जरीची टोपी घातलेला, चेहऱ्यावर आनुवंशिक हुशारीचा तजेला पण आजोळकडून आणलेला हट्टी आडदांडपणा चमकत आहे असा सहा–सात वर्षांचा मुलगा, असें हें त्रय होतें. चि. मैना व चि. राघू या दोघांस घरीं आजीजवळ ठेवून आम्ही मोरूस घेऊन चदनवाडास सरकारी पाहुणचार भोगण्यास जात असतां आजम गुंडो कृष्ण उपाध्ये यांचें पत्र पुनः पुनः मी वाचून पहात होतों.

आमची गाडी सालप्याच्या स्टेशनवर समोरून येणाऱ्या दुसऱ्या ट्रेनची वाट पाहात बराच वेळ उभी होती. मी फलाट्या-वरून येरझारा करीत असतां मध्येंच थांबून सालपा ह्या अक्षरांचें कानडी वळण पाहात उभा राहिलों. तेव्हां माझ्या खांद्यावर हात ठेवून एका व्यक्तीनें, "काय रे, आंबाबाईचा जोगवा कुठें चालला ?" असें म्हटलें. माझ्या आडनांवावर माझ्या शाळू-सोबत्यांचा हा श्लेष होता.

सदू पवाराला फार दिवसांनीं पाहून मला आनंद झाला. आम्ही दोघे नूतन मराठी विद्यालयाचे विद्यार्थी, एकाच वर्गातले आणि एकाच तुकडींतले "कसं काय रे लेका ? कुठें असतोस ? काय करतोस ?" वगैरे कुशल प्रश्न, पूर्वीच्या मास्तरांच्या व सोब-त्यांच्या आठवणी वगैरे होत आहे, तंव जिची आम्ही वाट पाहात होतों ती गाडी समोरून सरपटत आली; आणि फक्त दहा मिनि-

टांत आमच्या ट्रेनीनें सालपें सोडलें. नंतर वाटेंतल्या प्रत्येक स्टेश-नावर तो माझ्या डब्याशीं येऊन गप्पासप्पा करी. त्याच्या बोल-ण्यावरून असें दिसलें कीं, तो चंदनवाडासच राहात असे. त्याची तेथें थोडी बहुत शेती होती. "वहिनी," तो सौ. ला आग्रहानें म्हणाला, "तुम्ही तर सरकारी पाऱ्हण्या म्हणून चाललां आहां, तुम्हांला कसं म्हणावं राजवाडा टाकून माझ्या खोपटांत राहायला या म्हणून ? पण गरिबाला विसरू नका बरं ! एक दिवस तरी गरिबाच्या घरची मीठभाकरी खायला आलं पाहिजे."

सौ. आपल्या सरकारी पाहुणचाराच्या सुखस्वप्नांत इतकी दंग होऊन गेली होती कीं, सदूच्या बोलण्यावर तिरस्कारानें नाक मुरडण्यापलीकडे तिनें कांहींच उत्तर दिलें नाहीं.

"आतां तुम्हांला थट्टा वाटत असेल, पण आमच्या सरकार-कडे येणारे बरेचसे पाऱ्हणे तिथलं चंबूगवाळं आटपून माझ्या घरची पिठलंभाकरी खाऊन मगच आपल्या घरीं परत गेलेले आहेत. तुम्हांला कदाचित् तसा अनुभव यायचा नाहीं, कारण तुम्ही आईसाहेबांच्या नातेवाईक आहांत," डब्याच्या हॅण्डलला धरून त्यानें टकळी चालविली.

"ए गाफील माणूस ! धावत्या डब्याला धरून काय चालला आहेस ? मरायचं आहे का ?" गार्ड ओरडला.

"अरे नाहीं बुवा, गाडी धावते आहे हें ध्यानांतच नाहीं आलं !" असें म्हणून सदूनें हॅण्डल सोडून दिलें आणि एंजि-नाच्या व आमच्या दुसऱ्या वर्गाच्या डब्याच्या दरम्यान असणाऱ्या आपल्या जागेकडे धूम ठोकली.

दुपारीं दोन वाजतां मसूर स्टेशन आलें. या स्टेशनावर चंदनवाडचे कारकून व शिपाई आम्हांला उतरून घ्यावयास आले असतील अशी माझी अपेक्षा होती. परंतु तसें कोणी दिसलें नाहीं. स्टेशन लहान असल्यानें हमालहि नव्हता, म्हणून मोरूच्या मदतीनें मी आमची पोर्टमॅन्टो व होल्डऑलमध्यें गुंडाळलेले दोन बिछाने स्टेशनच्या बाहेर आणले. ( पोर्टमॅन्टो व होल्डऑल आमचे मित्र प्रो. दिघे यांचे उसने आणलेले होते. ) सौ. नें मोठ्या कष्टानें टिफिनकॅरियर व पाण्याचा तांब्या उचलला होता आणि तोंडानें, " कसं असं झालं कुणाला माहीत ? तरी मी म्हणत होत्यें तार करा, पण बारा आणें जड वाटले ना ? पत्र तरी टाकलं पोष्टांत का खिशांतच राह्यलं कोणाला माहीत ? " अशी पिरपिर चालविली होती. अजून तरी पुरुषवर्गाला समान हक्क द्यावे आणि त्यांचा दर्जा समान समजावा असें आमच्या भगिनीवर्गाला ( आणि सौ. ला सुद्धां ) वाटूं नये काय ?

स्टेशनच्या आवारांत एक मोटर लॉरी उभी होती, तिच्या सारथ्यानें आम्हांस पाहून गर्जना केली, " चंदनवाड चंदनवाड ! दोन आणे स्वारी ! " पण आम्हीं सरकारी पाहुण्यांनीं असल्या खटाऱ्यांतून जावें काय ?

सारथ्यास नकारात्मक उत्तर देण्याकरितां सौ. नें नाक मुरडलें. नकार, नापसंती, तुच्छता, हे सर्व विचार दर्शविण्याकरितां बायकांची ही सांकेतिक खूण आहे. ती दाबून टाकण्याकरितां पुरुषवर्गानें त्यांच्या नाकांत नथ अडकावून टाकिली होती.

सौ. च्या नाकमुरडीनें तो थंड पडूं नये म्हणून त्यास मी

उत्तेजीत म्हणालों, "सरकारी पाव्हण्यांची ही मोटार नव्हे ना?"

आपल्या मावसमावशीचा या प्रश्नानें केवढा अपमान झाला असें वाटून तिनें माझ्याकडे डोळे वटारून पाहिलें. पण मी कांहीं असा बायकांना भिणारा आधुनिक सुशिक्षित नाहीं !

"ही नव्हे; चांगली रोल्स रॉइस् येईल तुम्हांला न्यायला; वाट पाहा. शिरप्या ! भरली का रे गाडी? हॅण्डिल मार...." सारथी म्हणाला. लॉरी निघून गेली.

"आप्पा, रोल्स रॉइस येणार आहे का हो आपल्याला न्यायला?" मोरूनें उत्सुकतेनें विचारिलें.

"होय बाळ, ही बघ आणली रोल्स रॉइस," सदूनें मागून येऊन आपल्या खटाऱ्याकडे बोट दाखवून म्हटलें, "आतां रोल्स रॉइसपेक्षां याच गाड्यांना जास्त किंमत येणार आहे. चला वहिनी, सरकारी मोटारची वाट पाहात संध्याकाळपर्यंत बसलां तरी ती यायची नाहीं. मी तुम्हांला एक घंट्यांत पोंचवतों. म्हण्या, रावसाहेबांचं सामान उचलून दमणींत घाल."

सुमारें पाऊण तास वाटचालींत तीन मैल अंतर तुटलें. सदर्न मराठा रेल्वेनें प्रवास केल्यानंतर खटाऱ्याच्या गतीची मंदता फारशी जाणवली नाहीं. या रेल्वेचे प्रवासी एक गमतीची गोष्ट सांगतात. ( गोष्ट जुनी आहे व ती खरी नसल्यास तिचें कल्पकत्व मजकडे नाहीं हें स्पष्ट सांगून ठेवतों. नाहीं तर म्हणाल, 'ग्रंथ-चौर्य !' ) स. म. रेल्वेची मेलगाडी बेळगांव स्टेशन सोडून एक-दोन मैल गेली नाहीं तोंच मोठ्यानें केकाट केकाट केकाटून थांबली. ड्रायव्हर इंजिनाखालीं उतरला व आगवाला हातांत

फावडें घेऊन ट्रेनीच्या वाटेंत उभ्या रहाणाऱ्या म्हशीच्या अंगावर धावला. गार्डानें मोठ्यानें ओरडून विचारलें, " काय रे सोराबजी, काय झालं ? " ड्रायव्हर ओरडला, " म्हैस आहे लाइनवर, साली लाइन ब्लाक करूनशी उभी आहे. " फुर्र्र् ! भोंऽऽऽ ! गाडी चालू झाली. पांच मिनिटांनीं पुनः उभी राहिली. गार्डानें ओरडून विचारिलें, " अरे सोराबजी, फिरून काय झालं ? " ड्रायव्हर ओरडला, " फिरून म्हैस आली. " फुर्र्र् ! भोंऽऽऽ ! गाडी चालू झाली. सात मिनिटांनीं आपली पुनः केकाट केकाट केकाटून थांबली. गार्डानें चवताळून ओरडून विचारलें, " अरे आज काय म्हशींचा कळप मोकाट सुटला आहे कीं काय ?" " अरे नाहीं रे रामराव, " सोराबजीनें सांगितलें, " तेच म्हैस साली फिरून फिरून येती आहे इंजिनखालीं मरायला ! "

एकदा त्या रेल्वेचें पूना मेलचें एंजिन धूरवाफ सोडीत रुळां-वर विश्रांति घेत होतें. तेव्हां एक गोगलगाय रुळांवरून जाऊं लागली. " ए किड्या, इकडे कशाला येतोस, मी चालूं लागलें कीं चिरडून मरशील फुकट ! " एंजिन म्हणालें. गोगलगायीनें पुसलें, " तूं कोण आहेस ? " " मी मेलचं इंजन आहें, फुस्स् !" ऐटीनें एंजिन म्हणालें, " पण तुझं नांव काय ? फुस्स्स् ? " गोगलगायीनें उत्तर दिलें, " मेल्या, तूं जर मेलचं इंजिन असलंस तर मी शर्यतीची आरबी घोडी आहें ! तोंड तर पाहा या पूना स्नेल ( स्नेल=गोगलगाय ) च्या इंजनाचं कसं आहे काळंकाळं ढुस्स् ! "

चंदनवाडं दिसूं लागलें. एक तलाव, त्याच्या कांठीं झाडी,

त्या झाडींत दोन कळस दिसत होते; घरेंहि दिसत होतीं; गांवापासून जरा अलग श्रीमंतांचा वाडा होता. मोरू सारखा चंदनाचीं झाडें कोठें आहेत याची चौकशी करीत होता. राणीसाहेबांनीं मोटार कां धाडली नसावी याचें विवेचन त्याची आई आपल्याशींच करीत व जरा कोठें कांहीं वाजलें कीं, " आली वाटतं मोटार ! " असें म्हणत होती. मी आणि सदू विडया ओढीत लहानपणाच्या आठवणी काढीत होतों. हळूंहळूं आम्ही गांवच्या हद्दींत शिरलों.

" मग काय वहिनी, सरकारवाड्यांत उतरतां का आमच्या घरीं येतां ! " सदू पवारानें निवाणीचा प्रश्न टाकला.

"पाहा बुवा!" असें म्हणून सदूनें एका देवळापुढें खटारा उभा केला आणि म्हटलें, " हें आमचं गेस्ट हाउस; आंत कारकून आहे का तें पाहून ये म्हण्या ! "

म्हण्यानें आंत जाऊन कारकुनास बोलावून आणलें. कारकुनाच्या अंगांत सोलापुरी चेकचा आखूड कोट, डोक्यावर पांढरा रुमाल व कपाळास आडवें गंध असा पोषाक होता. त्यानें सदूस विचारलें, " काय रे सदोबा, कोण मंडळी ? "

" पुण्याची पाव्हणी मंडळी आहेत. तुम्हांला वर्दी नाहीं का मिळाली ? " सदूनें विचारलें.

" कोण रावसाहेब जोग का ? " कारकुनानें विचारिलें व आमचा होकार मिळाल्यावर, "आपल्याला आणायला स्टेशनवर मोटार गेली होती. तिची अन् आपली चुकामूक झाली वाटतं ? उतरायचं रावसाहेब. तसदी माफ करा हँ. ताईसाहेब, बाळासाहेब उतरा. अरे ए मारत्या ! सक्या ! कुठं गेले हरामखोर ! नेमके

कामाच्या वेळीं हे जातात बार भरायला न् चहा ढोसायला! मारत्या मारत्या होत्....कुठं गेले गाढवींच्चे कोणाला माहीत? सदोबा, यवढं तुमच्या नोकराकडून सामान चढवा ना?"

"तरी मीं म्हटलं मोटार पाठवली असेल म्हणून?" सौभाग्यवतींची पुटपुट सुरू झाली.

देवळाच्या ओवऱ्यांच्या वरची एक माडी आम्हांला देण्यांत आली होती. माडींत जुन्या तऱ्हेची बैठक असून शिवाय नवीन तऱ्हेचें पण वयानें जुनें झालेलें बैठकी सामानहि होतें. काचेचे लोलक पाहुण्या मंडळींनीं तोडून नेल्यानें विशोभित झालेलें झुंबर वरतीं हंड्यांच्या पलटणीच्या मध्यभागीं विराजत होतें. व्हिक्टोरिया महाराणी, कैसर विल्हेल्मचें कुटुंब, दोन्ही हात जोडून प्रार्थना करणारी ख्रिस्ती मुलगी, सारंगी वाजविणारा साहेब आणि ती ऐकत उभी राहिलेली मड्डम, सन १९१२ चा दिल्लीदरबार व त्याच्या मिसलीचा नकाशा, श्रीरामपंचायतन, विश्वामित्रमेनका, गोपीवस्त्रहरण ( मनुष्यस्वभाव किती विक्षिप्त आहे पाहा, ज्या कृष्णानें पांचपन्नास गोपींचीं लुगडीं पळवून त्यांना कलाकभर कोकलत ठेविलें, त्यानेंच दुःशासनानें एका बाईचें वस्त्रहरण करण्याचा घाट घातला असतांना त्याला विघ्न केलें! इतकें असून दुःशासन तेवढा दुष्ट आणि कृष्ण तेवढा चांगला! ) इत्यादि चित्रें भिंतींवर टांगलीं होतीं.

आम्ही सर्वजण खुर्च्यांवर जरा टेकलों, कारण मनापासून टेकून बसविण्याची त्यांची ताकद नव्हती. इतक्यांत तेथें खाकी पोषाक व ड्रायव्हरकॅप घातलेला एक इसम धापा टाकीत आला व म्हणूं लागला,

" वा रावसाहेब, मी तर ठेसनावर वाढूळ वाट पाह्यली तों आपण खुटच्या वाटेनं आलां ? "

" हाशम, तुझं नेहमींचं आहे. टायमावर जायचं नाहीं, आणखी मग यायचं कोकलत ! आत्तां रावसाहेबांना न् ताईसाहेबांना सदूच्या खटाऱ्यांतून यावं लागलं. पाव्हणे असेतसे लेक्चर देणारे विद्वान् नाहींत. आईसाहेबांच्या भाच्या आहेत या. मुलाखतींत आईसाहेबांना कळलं तर मधल्या मधें आमची हजामत होईल. मीं तुला सकाळींच वर्दी दिली होती...." कारकुनाची सरबत्ती झडली.

" आतां काय करावं, महीपतराव ? मी गाडी यायच्या आधीं वाढूळ टेशनावर जाऊन बालापिराच्या पिपळाखालीं छायेंत गाडी उभी केली होती; उन्हांत उभी केली तर व्हार्निश उडून जातं. आगगाडी सुटल्यावर मीं रावसाहेबांचा शोध केला तर कोणी सांगेनात. अहो पाव्हणे रावसाहेब ! आपल्याला सरकारांनीं इच्च्यारलं तर सांगूं नका बरं, गरिबाच्या पोटावर पाय येईल ! " मला विनंती करीत तो म्हणाला.

" कांहीं हरकत नाहीं, जा तुम्ही " मीं औदार्यानें आश्वासलें. लवून मुजरा करून तो निघून गेला.

पुन: सदूनें मला आग्रह केला परंतु माझा व सौ. चा निश्चय मेरु पर्वताप्रमाणें अचल आहे असें पाहून त्यानें मोरूवर आग्रहाचा हल्ला चढविला. त्यानें मोरूला मोट दाखविण्याचें व मोटेच्या सौंदरावर बसविण्याचें, म्हशीची धार काढूं देण्याचें, बैलाची गाडी हांकण्यास बसूं देण्याचें, हुर्डा खाऊं घालण्याचें, आंब्याच्या व जांभळांच्या झाडांवर चढविण्याचें अशीं अनेक प्रलोभनें दाखविलीं.

ल्हान पोरगाच तो! सदूकाकाबरोबर शेतावर जातों, राजवाड्याचा पाहुणचार नको असा हट्ट धरून सदूबरोबर निघून गेला. आतां सौ., कारकून व मी अशीं तिघेंच माडींत राहिलों.

" अरे मारत्या–सक्या, टवळीच्यांनो कुठें गेलां होतां शेण खायला?" दोन शिपाई पेशाचे असामी मला अदबीनें रामराम करून उभे राहिले त्यांस कारकून खेकसून बोलला.

" रावसाहेब व ताईसाहेब दरबारी पाव्हणे यायची वर्दी दिली होती का नाहीं? तुम्हीं उडाणटप्पूपणा करावा आणखी सरकारचीं न् आईसाहेबांचीं बोलणीं मात्र खायला आम्ही! जा रे मारत्या, गोविंदा आचारी कुठं गटारं फुंकायला गेला असेल तिथून घेऊन ये. आधीं चहा कर म्हणावं. आणखी सक्या तूं पाणी तापवायच्या यंत्रांत भर घाल न् विस्तो पेटव—"

" आम्हांला ऊन पाणी नको स्नानाला, थंड पाण्याचीच संवय आहे," सौ. म्हणाली.

" छे: छे: ताईसाहेब, संवय असली तरी ऊन पाणी तयार हें झालं पाहिजेच. मग आपल्याला वाटलं तर वापरा नाहीं तर नका वापरूं," तंबाकूचा बार भरीत कारकूनबुवा म्हणाले.

खांद्यावर टावेल, कमरेभोंवती पंचा, उघडा बंब देह, तोंडांत लाललाल विडा, बोटभर वाढलेली दाढी अशा अनादिसिद्ध स्वरूपाचा गोविंदा आचारी आला. मुजराबिजरा कांहीं न करतां तो कारकुनास म्हणाला, "काय महीपतराव, गेस्ट आले वाटतं कोणी?"

" डोळे आहेत का खाचा झाल्या?" महीपतराव खेक-

सले, " दिसत नाहींत का रावसाहेब न् ताईसाहेब बसलेलीं ? तुला वर्दी दिली होती पण तुझा पत्ता आहे कुठें ? झटपट स्वयं-पाक न् आधीं चहा बनव. मी सामान काढून देतों. सेकंड क्लास गेस्ट आहेत, लिप्टन पिवळा चहा, मोरस साखर, निर्भेळ दूध, पळ, पळ ! पळ ! " चुटक्या वाजवीत भाषणाचा उपसंहार झाला.

परंतु त्या चुटक्यांचा बल्लवाचार्यावर कांहींच परिणाम झाला नाहीं. " बरं मग जेवायला काय करूं ? वांगीभात, पुरणपोळी, मोहनभोग–" तो विचारूं लागला.

" अहो यवढं कशाला ? नुस्ती भातपोळी करा म्हणजे झालं. आत्तां तर भातपिठलं बस्स झालं. उगीच कशाला फार भानगडींत पडतां ? " मी म्हणालों.

" वा: रावसाहेब, असं कुठें झालंय ? आपण आइसाहेबांचे भाचेजांवई–" महिपतराव म्हणाले.

" याऽई ! भाचेजावई ! " तंबाकूनें लाल झालेली जीभ काळ्याकुळकुळीत दांतांच्या पंगतींतून बाहेर काढून आचारी म्हणाला.

महिपतराव म्हणाले, " आणखी साध्या पिठलंभातावर आप-ल्याला ठेवायचं ? चंदनवाड संस्थानच्या नांवलौकिकाची कांहीं चाड आहे कीं नाहीं आम्हांला ? उद्यां तुमच्या केसरींतच येईल कीं, चंदनवाडच्या चीफसाहेबांनीं आपल्या भाचेजावयाला पिठलं-भातावर ठेवलं म्हणून ! मग सगळे लोक आमच्या तोंडांत शेण घातल्याशिवाय राहातील का ? काय गोंधा ? "

" बरोबर आहे ! त्यांतून अलीकडे संस्थानिकांच्या विरुद्ध

फारच जोराची चळवळ ज्यारी आहे. मी म्हणतों महिपतराव, या सगळ्या राजकीय पुढाऱ्यांना चार दिवस रामनवमीच्या उत्सवाच्या प्रयोजनाला बोलवावं आणखी या गोविंदरावाच्या हातचे बुंदीचे लाडू चारावे, म्हणजे ही चळवळ--फप्--एकदम थंडी होऊन जाईल–पचक् थूः ! " ती चळवळ तोंडांतून बाहेर टाकीत गोविंदा म्हणाला.

" तें मग पाहूं, " महिपतराव म्हणाले, " सध्या जेवणाची तयारी कर, राजकारण नंतर करतां येईल. मग काय ताईसाहेब, शिरापुरीचा साधाच बेत आत्तां ठेवूं; आणखी गोंद्या, रात्रीं बासुंदी कर. जा, आधीं चहा करून घेऊन ये. चल मी सामान काढून देतों. "

कडोसरीच्या किल्लया काढून महिपतरावांनीं तेथलें भिंतींतलें एक कपाट उघडलें व लिप्टनच्या पिवळया लेबलाच्या डब्यांतला दोन चमचे चहा मोजून एका बशींत घातला. " मोरस साखर चार चमचे" असें आपल्याशीं पुटपुटत त्याच बशींत चार चमचे साखऱ्या त्यांनीं टाकल्या. नंतर, " मोर, ससा आणि खर म्हणजे गाढव, यांच्या हाडांचा चुरा म्हणून मोरस साखर ! " अशी अभिजात कोटी बडबडत फडताळांतून तबक, कपबशांच्या दोन जोड्या, चहादाणी, साखरदाणी, दोन चमचे, एक गाळणें अशा जिनसा प्रत्येक जिनसेचें नांव घेत बाहेर काढून सत्रंजीवर ठेवल्या. गोविंदा तबकाखेरीज इतर वस्तू तबकावर ठेवून तें घेऊन चहा करण्यास निघून गेला. महिपतरावांनीं दोन बोटें जुळवून तीं तोंडाशीं नेत मला विचारलें, "आपल्याला धूम्रपान करायचं असेल ना ? "

" हो, नित्य नाहीं पण नैमित्तिक. "

फडताळांतला उंची सिगारेटांचा डबा काढून त्यांनीं त्यांतल्या कांहीं एका तबकडीवर ठेवून व कांहीं स्वतःच्या खिशांत कोंबून, तबकडी आगपेटीसह मजपुढ ठेवून, डबा फडताळांत परत ठेविला. नंतर एका जस्ती डब्यांत सुपारी, लवंगा, वेलदोडे वगैरे जिनसा घालून तो आमच्या समोर मेजांत ठेविला. मग त्यांनीं मारत्यास बोलावून हुकूम दिला, " मारत्या, रामटेकचीं पानं आणून ठेव रावसाहेबांच्या करतां. ते सेकंड क्लास गेस्ट आहेत, बरं का ! "

आम्ही विडा खात नाहीं अशी त्यांस बातमी दिली.

" अहो, पण रावसाहेब, आपला हक्क आहे ना रामटेकच्या पानांचा तो कां उगाच बुडवतां ? तुम्हीं नाहीं खाल्लीं तर आम्हीं नोकर मंडळी आहों ना ? तुमचं काम करण्याकरितांच तर आमची योजना झाली आहे ! ह्यः ह्यः ह्यः ! बरं आहे रावसाहेब, ताईसाहेब, हे दोन शिपाई आणखी गोविंदा आचारी आपल्या तैनातीला आहेत, " महीपतराव आपला काढून ठेविलेला पांढरा सफेत फेटा नीट गुंडाळीत म्हणाले, " मी वाड्यांत वर्दी देऊन येतों, म्हणजे भेटीची वगैरे व्यवस्था होईल. संध्याकाळीं बहुतेक भेटीचा वेळ ठरला तर वाड्यांत न्यायला, नाहींपेक्षां फिरायला जायला मोटर येईल. आपले कपडे वगैरे ट्रंकेंतून काढा आंघोळी-करितां. चहा वर पाठवूं कां खालींच घेतां ? आंघोळीच्या चौका-शेजारींच मुदपाकखाना आहे. "

" खालींच घेऊं कीं, " ट्रंकेंतून काढलेलें माझें दुसरें धोतर, मुद्दाम नवीन घेतलेला टर्किश बाथ टावेल, स्वतःचें दुसरें लुगडें,

इतके कपडे खांद्यावर टाकले आहेत, साबणाची पेटी हातांत घेतली आहे, ट्रंकेच्या किल्लीचा गोफ करंगळींतून लोंबत आहे, अशा थाटानें उभी राहिलेली सौ. म्हणाली.

" मारत्या, मंडळींना चौकांत घेऊन जा. सक्यानं पाणी तापवलं असेल. अगोदर चहा घेऊन मग आंघोळी होऊं देत. चांगली बरदास्त ठेवा बरं का पाहुणे मंडळींची ! सरकारच्या घरची मंडळी आहेत हें लक्षांत ठेवा," असें आज्ञापून महीपतराव गेले. मारत्याच्या मागोमाग आम्ही जिना उतरून चौकांत शिरलों. चौकाला लागून स्वयंपाकघर होतें. मध्यें आंगण व त्यांत विहीर होती. शेजारींच नहाणीघर होतें. गोविंदानें आम्हांला बसण्यास पाट दिले व चहा दिला. चहाबरोबर बुरसलेले शंकरपाळे होते. सकाळपासून वाटेंत घेतलेल्या जिनसांखेरीज पोटांत कांहीं गेलें नसल्यानें तो पुळकावणी सेकंडक्लास चहाहि आम्हांला गोड वाटला. परंतु त्यास लिप्टन पिवळ्या डब्यांतल्या पत्तीचा स्वाद मात्र लागला नाहीं. वाटेंत घेतलेल्या जिनसांचीं नांवें.

पुणें स्टेशन—चहा.
आळंदी—अंजीर.
राजेवाडी—पुनः अंजिर.
जेजुरी—चिवडा व भजीं.
निरा स्टेशनजवळील पाण्याची सोंड-बरोबरच्या पोळ्या व बटाट्याची भाजी.
निरा—ऊस.
वाठार—चहा व पाव.

सातारा---सातारी पेढे.

इतक्या अल्प आहारावर राहिल्यामुळें आमच्या पोटांत कावळे कावकाव करूं लागले तर त्यांत नवल नाहीं. ( चिवचिव करूं लागले असते तर मात्र नवल झालें असतें. )

" अरे सख्या-" सौ. हाक मारूं लागली.

" ओ ! " मी दचकून म्हणालों.

" इश्श ! हा काय चावटपणा-इथं काय नाटकाबिटक आहे काय ? मी त्या सखाराम गड्याला हाक मारली आहे, " सौ. म्हणाली, " सखाराम, पाणी तापवलं का रे ? " नहाणीघरांत किंवा आसपास कोणी नव्हतें.

मारुतीनें इकडे तिकडे चौकशी करून सांगितलें कीं, सख्याचा पत्ता नाहीं. पाणी विहिरींतून शेंदावें लागेल, कारण पंचपात्रांत उपसलेलें नव्हतें. पाणी काढून देण्याची ड्यूटी सख्याची होती; मारुतीची नव्हे. गोविंदाचा हात उसण भरून दुखावलेला होता. आतां पाहुण्यांच्यावरच पाळी आली विहिरींचें पाणी काढण्याची ! सौ. नें पाणी शेंदलें. ती साताऱची होती, त्यामुळें संवयच होती तिला. मीं आंघोळ केली. नंतर मीं पाणी काढण्यास आरंभ केला. मी पुण्याचा. नळाचें पाणी मुबलक मिळ-णाऱ्या ठिकाणीं विहिरीचें पाणी काढण्याचा प्रसंग मला पूर्वीं आला नव्हता. अर्थात् रहाट एकदम सुटून गडगडगड करीत बादली जी एकदम खालीं गेली ती विहिरीच्या भिंतीवर जाऊन आदळली व पाण्यावर तरंगूं लागली. बाधली आंत बुडवून तिच्यांत पाणी कसें येऊं द्यावयाचें तें सौ. नें सांगितलें. पाणी वर ओढतांना

व बाधली अगदीं काठाशीं आल्यावर अलीकडे ओढून घेतांना तर तीन वेळ माझे झोक गेले ! आणि हा देखावा पाहून सौ. हासत होती ! ‘ अनार्या खास ती समजा ! ’ अपमानानें मी इतका तापलों कीं विहीर जवळ नसती तर जीव देण्याचा माझा खास



नंतर मीं पाणी काढण्यास आरंभ केला.

विचार झाला असता. मीं पाणी काढून दिलें. त्यानें तिचें स्नान झालें. " आतां कपडे धुवायला तरी कोणी येईल का ? " सौ.-नें तेथें मारत्याच्या ऐवजीं नवीन प्रकट झालेल्या सख्यास विचारलें. आश्चर्यचकित झाल्यासारखें करून आणि स्वतःच्या थोबाडाला हस्तस्पर्श करीत तो म्हणाला, " म्हनजी ? तुम्ही सव्ता हातांनीं पाणी काढलं ? आतां मला आईसाहेब काय म्हनतील ? अक्षी माझे कान उपटतील ना ? ' पाव्हण्यांला हिरीचं पाणी काढाया लावलंस ? ' असं म्हटल्याबिगर रहातील का ? मीं जरा पाणी प्यायला पांच मिनटं गेलों तर हें काय झालं ? ताईसाहेब, सांगू नका--"

ताईसाहेबांच्या कनवाळू अंतःकरणास पाझर फुटून त्यांनीं आपण सख्याचा अपराध आईसाहेबांस सांगणार नाहीं असें कबूल केलें; पण कपडे धुण्याला कोणी येईल काय ? असेंहि त्यास विचारिलें.

" कपडे धुवायचं काम मारत्याचं आहे. आतां पाहा कुठं पळाला ? लई कामचुकार आहे बगा, " सख्या म्हणाला.

" मग इथें ठेवूं का कपडे ? आला कीं धुऊन टाकायला सांग, " सौ. नें म्हटलें.

" त्याचा काय नेम आहे काय पुन्हा कवा येईल त्याचा ? नाहीं तर रात्रभर ओलेच रहायचे ! " सख्यानें सल्ला दिली.

" बरं मग मीच टाकत्यें धोतर न् लुगडं पिळून, " सौ. उद्गारली, आणि कपडे खळबळून आपटून पिळून त्यांच्या घड्या करून ओटीवरच्या दांड्यांवर लावण्याकरतां गोविंदाजवळ काठी

मागते तोंच मारत्या धावत धावत येऊन घाबरल्यासारखें करून म्हणतो, " अरेरे ! ताईसाहेब, मी जरा पान खायला पांच मिनटं बाहेर गेलों तर तेवढ्यांत कपडे धुऊन टाकलेत ? सख्या, गाढवीच्या लेका, तूं कां नाहीं सांगितलंस मारत्या येऊन धुवील म्हणून ? "

" सख्यानींच तर म्हटलं मारत्या केव्हां येईल त्याचा काय नेम म्हणून, तेव्हां आम्हीं स्वतःच धुऊन टाकले ! " मी म्हणालों.

" अरे चोरा ! " मारत्या रागानें म्हणतो, " दुसऱ्या माणसाबद्दल असं खोटं बोलतो काय ? म्हंजी मधल्यामधें दुसऱ्याची नुसकानी करायची ! आतां आईसाहेब माझे कान उपटल्याशिवाय रहातील का ? का रे सख्या—" परंतु मारत्याला उत्तर देण्यास सख्या जागेवर राहिला नव्हता.

" ए मारुती, चुलींत काय घालूं रे ? दोन लाकडं होतीं तीं चहा करतांना जळून गेलीं. आतां तुझीं हाडं घालूं का सख्याचीं ? " गोविंदा स्वयंपाकघरांतून बाहेर येऊन मोठ्यानें बोलूं लागला.

" घाल स्वतःचीं ! " मारत्यानें सल्ला दिली.

" स्वतःचीं घातलीं तर पिठलंभात कोण करणार आणखी पाव्हण्यांचीं घातलीं तर खाणार कोण ? आं ? आणखी तांदूळ तरी कुठं आहेत ? जा लौकर, कोठाऱ्याला बोलावून घेऊन ये. कोठी उघडून पावशेर तांदूळ आंबेमोहोर, आणखी अदपाव बेसन, तिखटमीट, छटाक गोडं तेल, चार लाकडं काढून द्यायला सांग. सेकंड क्लास गेस्ट आहेत म्हणावं, जा जा जा, " गोविंदानें

मारत्यास फर्मावलें.

" जा जा जा झनी, घेऊनि ये किल्लया, " असें आपल्याशीं गुणगुणत मारत्या गेला.

जेवणाला अजून तासभर अवकाश लागेल असें दिसून आम्ही माडीवर गेलों आणि बरोबरचा फराळाचा डबा उघडून त्यांत अवशेष राहिलेला सांजा व बटाट्याची भाजी फस्त केली.

आम्ही फराळ करीत आहों तोंच सख्या धावत वर आला. खासगी कारभारी गुंडोपंत हे येत आहेत अशी त्यानें वर्दी दिली. आम्ही घाईघाईनें डबा परत ठेवून खुर्च्यांवर थाटानें बसलों. रा. गुंडोपंत आले. त्यांच्या डोक्यास तांबडा चौकटीचा जरीचा रुमाल, अंगाभोंवतीं शेरवानी, पायांभोवतीं तुमान, पावलांभोंवतीं चढाव, असा पोषाक होता. ते वयानें पंचेचाळीस ते पन्नासच्या दरम्यान होते. मिश्या काळ्या, पण वाढलेलीं पांढरीं दाढीचीं खुंटें मिशांचा रंग बाटलींतला असल्याची साक्ष देत होतीं. आमच्यापुढें कोपरापासून हात जोडून ते म्हणाले, " कसं काय रावसाहेब—ताईसाहेब, आपल्याला तकलीफ पडली. मोटार ड्रायव्हरच्या चुकीमुळं बैलाच्या दमणींतनं यावं लागलं असं कळालं. ड्रायव्हरला ठपका दिलेला आहे. आतां इथं सगळी व्यवस्था ठीक आहे ना ?—"

इथल्या व्यवस्थेवर टीका करण्याकरितां माझे व सौ. चे ओठ फुरफुरत होते, परंतु आम्हांला बोलण्याची संधि न देतां गुंडोपंतांनीं आपलें व्याख्यान चालू ठेविलें, " बाकी राजपाहुण्यांच्या बरदास्तींत तरबेज झालेलेच नोकर इथें ठेवले आहेत. आपण सकाळीं जेवून खाऊनच निघाले असाल—"

मीं मानेनें नकार दर्शविला पण त्याकडे लक्ष न देतां पुढें म्हणाले, “ आतां रात्रीं जेवण होऊं द्या आणखी मग राजवाड्यांतल्या आरसेमहालांत काशीकरबुवांचं कीर्तन ऐकायला उभयतां या. प्रसाद घेऊन आपण परत या आणखी ताईसाहेबांना आईसाहेब तिथेंच ठिऊन घेणार आहेत. उद्यां सकाळीं सरकारस्वारीची भेट होईल. सख्या ! महीपतरावांना सांग रावसाहेबांचं कांहीं उणं पडूं देऊं नका म्हणून. आतां सहा वाजतां मोटार येईल फिरायला न्यायला आणखी इथलीं कांहीं प्रेक्षणीय स्थळं पहायला घेऊन जाईल. मी जातों. कमीज्यास्ती कांहीं लागलं तर सांगा. संकोच करूं नका, ” पुनः एकदा कोपरापासून हात जोडून नमस्कार करून गुंडोपंत कर्र् कर्र् चढाव वाजवीत खालीं गेले.

ट्रंकेतून रेल्वे गाइड काढून सदर्न मराठा रेल्वेच्या गाड्यांचें सुधारलेलें वेळापत्रक वाचण्यांत मी गर्क होऊन गेलों. सौ. फिरावयास जाण्याकरितां लुगडें बदलण्यांत व केस नीट करण्यांत गढून गेली. सहा वाजून गेले तरी मोटारीचा पत्ता नाहीं, तरी साडेसाहाला दाराशीं पोंक्पोंक् असा आवाज आला. “ आली वाटतं मोटार, ” असे उद्गार काढून आम्ही दोघे निघण्याच्या तयारीनें बसलों. सख्यानें आपला पट्टाडंगला चढवून मला रामराम करून मोटार आल्याचें कळविलें. एक जुनाटशी फोर्ड गाडी आमची वाट पाहात होती. आम्ही आंत बसलों. अत्यंत आज्ञाधारक व कर्तव्यतत्पर नोकर मारत्या व सख्या ड्रायव्हरशेजारीं बसले. मोटार निघणार तोंच गोविंदानें धावत येऊन पिठलें भात खाऊन जाण्याची विनंती केली. महीपतराव शशिकान्तास कडेवर

घेऊन शकीला फरफटत घेऊन धावत आले, व आमच्यासमोर आपल्या मुलांस जरा बसविण्याची विनंती करूं लागले. गोविंदाची विनंती मानेच्या झटक्यानें मीं व मुरडलेल्या नाकानें सौ०नें झिडकारून टाकिली. महिपतरावांनीं आपल्या मुलांस आमच्या समोर आदळलें व 'भांडूं नका' असें बजावतात तोंच मोटर इथून तितकी गेली आणि थांबली.

"क्रीडावैभव क्लब," दार उघडीत सख्या म्हणाला.

आम्हीं खालीं उतरून क्लब पाहिला. क्लबाची इमारत एखाद्या झोपडीएवढी किंवा जकातीच्या नाक्याएवढी होती. प्रभाकर कंदिलाभोंवती चार सभासद ब्रिज खेळत होते. इमारतीपुढें जागोजाग उकरलें गेलेलें टेनिसचें कोर्ट होतें. टेनिसचें जाळें फाटकें होतें. टेनिस कोर्टाची इतकी आबाळ कां असें मीं एका मेंबरास विचारलें. त्यानें सांगितलें अलीकडे चीफसाहेबांना ऊठबशांच्या व्यायामाचा विशेष नाद लागल्यानें टेनिसकडे फारसें कोणाचें लक्ष नाहीं. सगळे आफिसर, कारकून, वकील सकाळीं चीफसाहेबांच्या बरोबर ऊठबशा काढण्यास जातात. पाहुण्यांना नाहीं ना काढावयास लावीत? मला शंका आली.

आम्ही क्लबची शोभा पाहून मोटारींत बसलों. गांवच्या बाजारांतून मोटार गेली व एक दोन बारीक गल्ल्यांतून जाऊन एका बसक्या घराशीं थांबली. सारथ्यानें दोन तीन वेळ शिंग वाजविलें, तेव्हां एक घामट पोरगा जवळ आला ड्रायव्हरनें त्याला विचारलें, "ममद्या, भाकर खाया का रे?....मै अब्बी खाके आता हूं. तोंपर्यंत टाकींमंदी पाणी भरो."

पांच मिनिटें झालीं. जाणारे येणारे लोक आंत डोकावून पाहून सख्यामारुत्यांस "कोण रे?" असें विचारीत व त्यांस



पुन्याचे पाव्हने आहेत. हां ष्टेट गेष्ट आहेत.

" पुन्याचे पाव्हने आहेत....हां ष्टेट गेष्ट आहेत. ही बाई आई-साहेबांची भाची न् हा तिचा नवरा....हीं पोरं आपल्या महिपत-रावाचीं....हाशम जरा भाकर खाऊन येतो आहे...." अशी माहिती मिळे. आम्ही गांव पहाण्यास निघालों आहों कीं गांवांतल्या लोकांनीं पहाण्यास आम्हांला एक्झिबिट म्हणून ठेविलें आहे तें आम्हांला कळेना! दहा....पंधरा....वीस मिनिटें झाल्यावर हाशमची स्वारी पान खात आली व सिलिंडर उघडून खाटखुट धडधड धडधड गरगरगरगर फुट्फुट् असें कांहीं वेळ झालें. मोटार चालू होईना. सख्या, मारत्या व ममद्या यांनीं मागून ढकलीत थोडी नेल्यानंतर जरा चालली व पुन: थांबली. शेवटीं चारपांच जणांनीं मागून लोटीत लोटीत बाजारांतून चालविली. लग्नांत आमची वरात मोटारींतून निघाली नव्हती, तिची अगदीं पुरी हौस फिटली.

रात्रीं गोविंदाच्या हातचा पिठलेंभात खाल्ला. सांजा व पुऱ्या होण्याला जरा अवकाश लागेल असें त्यानें सांगितलें. आम्ही पिठलेंभात खाऊन वर गेलों. मी पाणी मागण्याकरितां म्हणून जेव-णानंतर अर्ध्या तासानें खालीं गेलों. तेव्हां महीपतराव, त्यांचीं दोन मुलें, सख्या, मारत्या, त्यांचे दोन मित्र आणि गोविंदा ही मंडळी कोंडाळें करून शिरापुरीवर ताव मारीत असतांना दिसली.

रात्रीं दहा वाजतां खासगी कारभारी आम्हांला कथेला घेऊन जाण्यास आले. कंदील व सोटा घेतलेला एक शिपाई व खासगी कारभारी यांच्याबरोबर आम्ही दोघें पायींच निघालों. सातआठ मिनिटांच्या वाटेवरच राजवाडा होता. वाड्यांतील माडीवरील आरसेमहालांत कीर्तन ठेविलें होतें. पूर्वेकडे तोंड करून श्री गजाननाची मूर्ति कायमची बसविलेली होती. कडीपाटास नुसते आरसेच ठोकून दिले असल्यानें वरतीं पहातांच सभामंडपां-

तील श्रोतृजनांचा विहंगमाक्ष देखावा दिसत होता. खांबास व भिंतींसहि आरसे व तसविरी यांनीं झांकून टाकिलें होतें. आरशां-पैकीं कांहीं अंतर्गोल व कांहीं बहिर्गोल तर कांहीं पारा उडालेले असल्यानें प्रदर्शनांतील हास्यदालनांत तर आलों नाहीं ना असें वाटत असे. आपल्याविषयीं जगाची मतें किती विपरीत व भिन्न प्रकारचीं असूं शकतील याची कल्पना त्या आरशांतील माझीं आडवींउभीं व छिन्नभिन्न प्रतिबिंबें आणून देत होतीं. दिवाण-खान्याच्या मधल्या भागांत पुरुष व कडेच्या दोन भागांत स्त्रिया अशी जागेची वांटणी होती.

बराच वेळ आपल्या जागीं बसून राहिलों. साडेदहाला बुवा आपल्या साथीदारांसह आले. मृदंगाला कणीक हवी होती म्हणून मुरदुंग्यानें खासगी कारभाऱ्यांस सांगितलें. " वाः रामजीबुवा ! आतां कोठाराला कुलूपसुद्धां लागलं, आतां कोठाराचं दार उघडा-यचं म्हणजे मुदपाक कमेटीचे मेंबर बोलावून त्यांच्या सगळ्यांच्या समक्ष कुलूप काढावं लागेल. जा रे लक्षुमण, तुझ्या घरून थोडी कणीक घेऊन ये तुझ्या घरीं नाहीं म्हणतोस ? मग जा आमच्या इथून घेऊन ये."

मृदंगास मुखलेप लागला. पेटीचा सूर, तंबोऱ्याचा सूर, बुवांचा सूर, मृदंगाचा आवाज यांचा मिलाफ झाला व श्रीमंत चीफसाहेब आणि श्री. सौ. राणीसाहेब यांच्या स्वाऱ्यांस वर्दी जाऊन त्या कीर्तनस्थलीं येऊन सर्वांची खडी ताजीम व मुजरे घेत सन्मानाच्या स्थळीं विराजमान झाल्या. लगेच मंगलाचरणास प्रारंभ झाला.

देवाच्या कोनाड्यासमोर श्री. सौ. राणीसाहेबांच्या शेजारीं सौ. बसली होती. माझी जागा चीफसाहेबांशेजारीं होती. अर्थात् सर्व श्रोते कौतुकानें आमच्याकडे पाहून हळूंच एकमेकांत चौकशी कुजबुजत होते.

हरिदासबोवांनीं मंगलाचरण सुरू केल्यावर माझी ब्रह्मानंदीं जी टाळी लागली ती आरतीच्या वेळीं कोणीं तरी उठावयास सांगेपर्यंत. कीर्तन संपून बुवा चीफसाहेबांच्या समोर बसले. अशींच बलवर्धक कीर्तनें करून ऊठबशांच्या व्यायामाचें महत्त्व श्रोतृवर्गाच्या मनावर बिंबवीत जा, असें चीफसाहेबांनीं बुवांस सांगितलें. प्रसादग्रहण झाल्यावर चीफसाहेबांसुद्धां सर्वांनीं-बायकांनीं देखील-बारा बारा ऊठबशा काढल्या. सभा बरखास्त होऊन मी निघण्याच्या आधीं महिपतरावांनीं माझ्या कानांत सांगितलें, "ताईसाहेब आतां इथेंच मुकाम करतील असा आईसाहेबांचा निरोप आहे. मारुति शिपाई कंदील घेऊन खालीं उभा आहे तो आपल्याला गणपतिमंदिरांत पोंचवायला येईल."

मी खालीं उतरलों, परंतु मारत्याचा पत्ता नव्हता, म्हणून एकटाच निघालों. मंदिराशीं जाऊन दार खडखडावलें तेव्हां मारत्याच्या स्वारीनें कंदील-काठी घेऊन डोळे चोळीत उघडलें व म्हटलें, "रावसाहेब इतक्यांत आलांत? मी कंदील घेऊन निघालोंच होतों. कीर्तान आज लवकर संपलं वाटतं."

सकाळीं जागा झाल्यावरहि जरा मुद्दाम डोळ्यांवरून पांघरूण ओढून घेऊन पडलों होतों. त्या वेळीं खालीलप्रमाणें संभाषण माझ्या कानीं आलें-

" गोविंद, रावसाहेब जोग उठला का रे ? "

" नाहीं महिपतराव. आत्तांच पाहून आलों. अजून निजलाच आहे. "

" बरं मग, त्याचा चहा कुठं आहे लिप्टन पिवळा ? आणखी त्याचीं पानं, वेलदोडे वगैरे रात्रीं तुम्हींच सप्पा केलेत वाटतं ? मी रिपोर्ट करीन, गाढवा हो कारभारीसाहेबःकडे ! बरं, तो पिवळा लिपटन आधीं मला दे तयार करून, मग पाव्हण्याला देऊं भुकटीचा ! मारत्या, दोन तपेल्या गरम पाणी, तस्त, न्यापकीन, काळी टुथपावडर पाव तोळा, वरतीं घेऊन जा. "

आठाच्या सुमाराला गुंडोपंतांनीं येऊन वाड्यांतलें मेजवानीचें आमंत्रण दिलें. ' सरकारची भेट जेवणाच्या आधीं होईल. साधारण दहा—साडेदहा—अकराला, फार तर साडेअकरा किंवा बाराला पानें बसतील. घेऊन जायला मोटार येईल. '

थोडया वेळानें सदू व त्याच्याबरोबर हातांत चाबूक घेतलेला मोरू असे दोघे आले. " आप्पा, आप्पा ! आज मीं गाडी हाकली, " असें ओरडतच मोरू माडीवर आला. कपाळाला खोक, हाताला खरचटलेलें, पायाला फडकें बांधलेलें, पण किती आनंदांत होता ! वर येतांच एका खिशांतून आवळे आणि दुसऱ्यांतून चिंचा काढून माझ्यापुढें ठेवून ' खा खा ' म्हणूं लागला. सदूहि येऊन, " काय रावसाहेब सेकंड क्लास पाव्हणे ! सरकारी पाहुणचाराची हौस फिटली का नाहीं ? चला आतां शेतावर गरिबाची मीठभाकरी खायला ! "

" चल चल, ती गेली आहे राजवाड्यांत, " असें म्हणून

कोट व टोपी चढवून दाराशीं उभ्या असलेल्या दोन बैलांच्या रिंगीवर मी सदूसह आरूढ झालों. मोरू बैल हाकावयास बसला व हिसके, हेलकावे, धक्के खात परंतु हासतखिदळत आम्ही पंधरा मिनिटांत सदूच्या शेतावर पोंचलों. तेथें सदूचा आडदांड पाहुणचार, त्याच्या कुत्र्याचें रानटी प्रेम, त्याच्या मुलांचे गमतीचे खेळ, त्याच्या गाईबैलांच्या शिंगांचा तिखटपणा व पायांचा लाथाळपणा, सदूच्या बायकोचा गांवढळ थट्टेखोरपणा इत्यादि गुणांच्या रसपानांत तीन तास घालवून चि. मोरूसह साडेअकराला राजवाड्यांत पोंचलों.

चि. मोरू दिवाणखान्यांतील भिंतीवर रंगविलेलीं दशावतार, छेलबटाऊ आणि मोहनाराणी, रागरागिण्या एका हातांत ढाल व दुसऱ्यांत तरवारीची मूठ पकडून एकेक पाय उंच करून एका-मागून एक फैलींत जाणारे शिपाई, वाघाशीं कुस्ती खेळणारे पहि-लवान इत्यादि चित्रें पाहाण्यांत गर्क झाला. कांहीं वेळानें त्यास भाऊसाहेब व रावसाहेब यांच्याबरोबर खेळण्यास बोलाविलें. मी दिवाणखान्यांतील झोपाळ्यावर बसून तेथील हंड्यांची संख्या मोजीत होतों. ती मोजल्यावर झुंबरांचे लोलक मोजले. त्यांचाहि कंटाळा आला, तेव्हां आमच्या ऑफिसांतले वरच्या ग्रेडचे व माझ्या मधले जेवढे कारकून मला सीनियर होते त्यांची कत्तल करण्यांत वेळ घालविला. साडेबारा वाजतां दिवाणखान्यांत जेवणारे लोक जमूं लागले व मला सोवळें नेसून श्रीमंतांच्या देवघरांत त्यांनीं भेटीस बोलाविलें आहे असा निरोप आला.

सरकारी जांभळा पीतांबर नेसून मी श्रीमंत पूजा करीत होते

तेथें गेलों. मजकरितां मृगाजिन ठेवलें होतें त्यावर मी बसलों. घंटा वाजवीत श्रीमंत म्हणाले, " आपल्या येण्यामुळें फार आनंद झाला. कसं काय आहे पुण्याचं पीकपाणी ?....तुमची प्रकृति चांगली नाहीं. तुम्ही रोज शंभर तरी ऊठबशा काढीत जा. काऊताईंनीं कबूल केलं आहे कीं, शंभर ऊठबशा काढल्याशिवाय जेवायला वाढणार नाहीं म्हणून. तुमचे लेख आम्ही वाचतों, घरांत तर फार आवडतात........आमच्यावर मात्र कांहीं लिहूं नका हो ! हः हः हः !........आम्हीहि स्टेट बँक काढणार आहों. ती निघाल्यावर म्यानेजर म्हणून तुम्हांला बोलावूं...."

मी मधूनमधून नम्रपणें बोलत होतों, " कसचं ! कसचं !.... पाऊस भरपूर झाला. सायकलवरून ऑफिसांत जातों....फार उपकार होतील...." इत्यादि इत्यादि.

श्रीमंतांनीं पूजा आटोपल्यावर ऊठबशा काढण्यास प्रारंभ केला. त्यांच्याबरोबर खासगी कारभारी, महिपतराव, तालीम मास्तर, काशीकरबुवा, ही मंडळीहि होती. मला देखील ऊठबशा काढण्यास सांगत होते परंतु माझें ब्लड् प्रेशर वाढलें असल्याची सबब सांगून मी पहातच राहिलों. दहावीस ऊठबशा काढतांच काशीकरबुवा घामाघूम होऊन व्यायामनिवृत्त होत्साते धरणी-तलावर देह जो आहे तो टाकून देते झाले. शंभरावर खासगी कारभारी निवृत्त झाले. श्रीमंत आणि तालीम मास्तर दोघांनीं हजार पुरे केल्यावर श्रीमंत पाटावर बसले.

तालीम मास्तरांनीं हात जोडून विनंती केली, " सरकार, अजून एकशें आठ ऊठबशा काढण्याची माझी हिंमत आहे. "

खासगी कारभारी मत्सरयुक्त नजरेनें त्यांच्याकडे पहात म्हणाले, " मग निवृत्त होण्याऐवजीं निवर्तण्याची पाळी येईल मास्तर तुमच्यावर ! "

" पहा तर खरं ! " असें म्हणून मास्तरांनीं ऊठबशांस प्रारंभ केला, " एक दोन तीन चार ! वाः पाव्हणे रावसाहेब, तुमचा मुलगा तर फार तरतरीत दिसतो आहे ! काय असेल बरं त्याचं वय ? "

" आठ पूर्ण, " मीं उत्तर दिलें.

" आठ नऊ दहा....कारभारी साहेब, तुमच्या सूर्यकान्ताला आतां चौदा वर्षं झालीं असतील नाहीं ?" जरा थांबून मास्तरनीं चौकशी केली.

"चौदा कसलीं ? सोळा संपून सतरावं लागलं या आगष्टांत ?"— खासगी कारभारी.

" अरे बाप रे सतरावं ? " पुनः ऊठबशांस प्रारंभ करून तालीममास्तर म्हणाले, " सतरा अठरा एकुणीस. सरकार, मला नोकरीला लागून एकुणीस वर्षं झालीं. कारभारीसाहेब माझ्या आधीं सात वर्षं नोकरींत दाखल झाले. म्हणजे सव्वीस वर्षं त्यांना झालीं. सव्वीस सत्तावीस अठ्ठावीस एकूणचाळीस चाळीस माझी उमर आतां पुरी चाळीस वर्षांची झाली पण श्रीमंत, माझी प्रकृति पहा कशी या ऊठबशांनीं छान राहली आहे ! "

" अहो मास्तर पण मला तर अठ्ठावन्न पूर्ण झालीं तरी मी तुमच्या पेक्षां जवान दिसतों !"—चीफसाहेब.

" अठ्ठावन ! अरे बाप रे ! पण लक्षांत सुद्धां यायचं नाहीं

कोणाच्या ! अठ्ठावन एकूणसत्तर सत्तर. या चंदनी देव्हाऱ्याला निदान पन्नास रुपये तरी पडले असतील, " ऊठबशा काढीत मास्तरनीं विचारिलें.

" पन्नास तर याची मजुरी होईल. पंच्याऐशीं रुपये दिले याला पंच्याऐशीं !"—कारभारी

" पंच्याऐशीं शाऐशीं सत्त्याऐशीं. पण शंभराला सुद्धां हा महाग पडला असं कोणाला वाटणार नाहीं असं नक्षीकाम आहे. शंभर एक दोन तीन ! बस्स ! आतां मात्र आपल्याच्यानीं काढवत नाहींत. सरकार, आम्ही माफी मागतों. राहिलेल्या पांच उठबशा उद्यां काढीन," तालीममास्तर थकल्यासारखें करून म्हणाले.

" आम्ही म्हणत नव्हतों ? बरं चला आतां जेवायला. आप्पासाहेब चला आपल्याला दहाची संवय असेल रोजची, आज बारा वाजून गेले. माफ करा उशिराबद्दल ! " असें म्हणून सरकारनीं आम्हांस जेवणघरांत नेलें.

जेवणघर मोठें होतें. त्यांत एकंदर चार पंगती होत्या—

खासे ( वर्ग १ ला ):—श्रीमंत चीफसाहेब, चि. भाऊसाहेब व चि. रावसाहेब. यांना चांदीचीं ताटें, चांदीच्या वाट्या, चांदीचें तांब्याभांडें, पाटावर ताट, बसायला पाट, टेकायला पाट, रांगोळ्या, उदबत्त्यांचीं घरें सोन्याचीं.

खर्चे ( वर्ग २ रा ):—रावबहादुर स्टेट कारभारीसाहेब, रावसाहेब चिमणराव, चि. मोरेश्वरपंत, रा. गुंडोपंत, रा. राजोपाध्ये. ताटांऐवजीं केळीचीं पानें व उदबत्त्यांचीं घरें चांदीचीं. बाकी सर्व वर्ग १ प्रमाणें.

खर्चे ( वर्ग ३ रा ): केळीचीं पानें, पितळेचें तांब्याभांडें, बसायला पाट, रांगोळ्या, उदबत्त्या. यांत हरिदासबुवा आणि तालीममास्तर होते.

खर्चे ( वर्ग ४ था ):–पत्रावळी, द्रोण. यांत महिपतराव वगैरे ५–६ जण होते. कांहीं मधुकरीहि होते.

आईसाहेबांनीं सोन्याच्या झारींतून पहिल्या वर्गास तूप वाढलें. मग आचाऱ्यानें ती झारी त्यांच्याजवळून घेऊन चांदीची झारी त्यांच्याजवळ दिली. तिच्यांतून दुसऱ्या वर्गास वाढलें. नंतर त्याच झारींतून तिसऱ्या वर्गास वाढून त्या परतल्या. चौथ्या वर्गास आचाऱ्यानें पितळेच्या झारींतून तूप वाढलें. भाज्याहि पहिल्या दोन वर्गांस निराळ्या व शेवटच्या दोहोंस निराळ्या होत्या. पहिल्या दोन वर्गांस श्रीखंडपुरी, तिसऱ्यास शिरा–पुरी व चौथ्यास पांढरी पोळी.

तिसऱ्या वर्गाच्या मठ्ठ्याचा भुरका घेऊन हरिदासबुवा ओरडले, " ओ हो ! काय मठ्ठा छान झाला आहे ! श्रीमंतांनीं चाखून पाहाण्यालायक आहे. ए गोविंद ! श्रीमंतांना वाढ थोडा. श्रीमंत, तें कांहीं नाहीं. अप्रतिम मठ्ठा आहे, पहाच थोडी लज्जत."

या आग्रहापुढें श्रीमंतांचा निरुपाय झाला. त्यांनीं थर्ड क्लास ताकाचा एक भुरका मारून पाहिल्यावर त्यांचें तोंड प्रेक्षणीय झालें. बुवांस दुसऱ्या वर्गाचा मठ्ठा मिळाला.

चौथ्या वर्गांतल्या एकदोघांची दृष्ट माझ्या श्रीखंडपुरीला लागत होती. अर्थात् मला जेवण गोड वाटलें नाहीं.

भोजनोत्तर वर्गवारीनें पानसुपारी झाली व श्रीमंतांचा निरोप घेऊन मी गणपतिमंदिरांत आलों. दुपारीं तीनचार वाजतां

महिपतराव चहाची चौकशी करण्यास आले तेव्हां मी म्हणालों, “ महिपतराव, मला चहा नको. मी सदू पवाराच्या इथं जातों. माझं सामान त्याची गाडी येईल तींतून रवाना करा. ” दुसऱ्या व तिसऱ्या दिवशीं चि. मोरू व मी सदूच्या घरीं राहिलों. चौथ्या दिवशीं सकाळीं सौ.हि राजवाड्यांतून निघून सदूच्या घरीं त्याच्या बायकोला भेटावयास व हुर्डा खावयास आली. ठरल्याप्रमाणें त्या दिवशीं दुपारीं बारा वाजतां पॅसेंजरनें पुण्यास जाण्याकरितां आम्ही सदूच्या खटाऱ्यांतून मसूर स्टेशनवर पोंचलों.

आगगाडी आली. तिच्यांत जागा पाहून सामान चढविलें व आम्ही स्थानापन्न झालों. सदू व त्याची बायको पोंचविण्यास आलीं होतीं. त्यांचे डोळे आसवांनीं भरले होते. गार्डाची शिटी होतांच फलाट्यावर हाशम ड्रायव्हर, मारत्या व सख्या प्रगट झाले. गेस्ट हाऊसचें शेरेबुक घेऊन महिपतरावहि आले होते. रिमार्कबुकांत माझ्या नांवावर चार दिवसपर्यंत दररोज—

स्नानास गरम पाणी
दोन कप लिपटन पिवळा चहा
नास्ता ( चिवडा, लाडू )
भोजन शिरापुरीचें, वर्ग दुसरा
पानें, लवंगा, वेलदोडे वगैरे
कॅपस्टन सिगारेट्स २०
साबू गोद्रेज नं. २

याप्रमाणें खर्च दाखविला होता. सर्व खोटें आहे या अर्थाचा इंग्रजी शेरा करून शेरेबुक महिपतरावांस दिलें. त्यांना इंग्रजी येत नव्हतें.

"या लोकांना कांहीं चिरीमिरी द्यायची असेल तर द्यावी, मनापासून सेवा बजावली आहे," महिपतरावांनीं म्हटलें. मीं खिशांतून एक चिठोरें काढून, "तुम्ही लुच्चे आहां," असें त्यावर खरडून तें एका पाकिटांत घातलें व पाकीट महिपतरावांस देऊन म्हटलें, "यांत एक पांचाची नोट आहे पण गाडी सुटल्यावर हें उघडा."

गाडी सुटली. दोनतीन मिनिटांनीं मागें फलाट्याकडे वळून पाहिलें तों चारपांच इसम मुठी वळवून मला मारण्याचा आविर्भाव करीत आहेत आणि शिव्याशाप देत आहेत असें दिसलें.



# कॅप्टन चिमणराव—स्काउटमास्तर.

कॅप्टन बाडन्-पॉवेल यांच्या बालवीरचमूच्या कल्पनेचें बीजारोपण लढाईच्या दिवसांत झालें व तिचा मोठा वृक्ष लढाई-नंतर झाला. महाराष्ट्रांत या संस्थेचें रोपटें येण्यापूर्वीं वऱ्हाडांत तिनें मूळ धरिलें होतें. या बालवीरांच्या पराक्रमांचीं भपकेबाज वर्णनें वर्तमानपत्रांतून वारंवार वाचावयास मिळत. १९१८ सालीं वऱ्हाड-वृत्तांत आलेली एक हकीकत मासल्यादाखल येथें देतों:--

"येथील हायस्कुलांतील बॉयस्काउटांची चमू ईस्टरच्या सुट्टींत दौऱ्यावर गेली होती. एकंदर वीस स्काउट आणि त्यांचे शिक्षक रा. पांढरपांडे अशी ही सेना लढाऊ शिपायांच्या पोशाखांत ब्यांड-च्या चालीवर चालतांना व कवाइत करतांना पाहून खेडवळ लोकांना फार कौतुक वाटत होतें. स्काउटचमूनें झाडगांव येथें वडाच्या मोठ्या झाडाच्या छायेंत तळ दिला होता; आणि पाणी आणणें, तंबू ठोकणें, चपात्या करणें, चहा बनविणें, इत्यादि कामें मुलांनीं स्वतः केलीं. गरीब लोकांस संकटाचे वेळीं स्काउट कशी मदत करितात हें दाखवि-ण्याकरितां एका वाटसराचें तट्टू चिखलांत रुतविण्यांत आलें. नंतर त्यास बाहेर येतां येईना तेव्हां त्याच्या गळ्यास व कंबरेस दोऱ्या बांधून आणि त्याच्या पोटाखालीं बासांचे टेकू देऊन त्यास बाहेर काढण्यांत आलें. नंतर डेप्युटी कमिशनर साहेबांच्या कॅम्पभोंवतालची जमीन साफ करून स्काउटांनीं परोपकाराचें प्रत्यक्ष उदाहरण लोकांस दाखवून दिलें. एका शेतकऱ्याच्या झोपडीस आग लावण्यांत आली

आणि नंतर अर्ध्या तासांत ती बालवीरांनीं विझवून टाकण्याचा प्रयोग केला. अशा प्रकारें सहकार्यानें परस्परांस साह्य करण्याचे धडे त्यांनीं दिलेले पाहून ग्रामवासीयांच्या मनांत स्काउटचमूबद्दल आदर उत्पन्न झाला. ही संस्था उनाड मुलांची आहे असें ज्यांस वाटत होतें ते लोकहि मुक्तकंठानें तिची प्रशंसा करूं लागले. सा. हणमंतसा गुलाबसा यांनीं सैनिकांस उसाचा रस पाजला आणि ताजा गूळ खावयास दिला. झाडगांवाहून पुढला मुक्काम उंदीरखेडास झाला. तेथील रावसाहेब देवीदास देशमुख यांनीं सैनिकांचा पाहुणचार करून त्यांस थाटाची मेजवानी दिली. मेहेरबान लॉंगमन् साहेब बहादुर हेहि त्या वेळीं हजर होते. भोजनोत्तर स्काउटांचे निरनिराळे खेळ दाखविण्यांत आले. खेळांत प्रावीण्य मिळविणाऱ्या सैनिकांस मिसेस् लॉंगवुमन् यांच्या हस्तें बक्षिसें वांटण्यांत आलीं........."

अशा प्रकारचें सैन्य आपणहि काढावें असें मनोराज्य पांचसात वर्षे मी करीत होतों. अडचण अशी होती कीं, मला स्वतःला कवाईत येत नव्हती, आणि माझ्या चमूंत नांव घालण्यास कोणी मुलेंहि जमत नव्हतीं. पुढें मी आमच्या घराजवळ नवीनच रहावयास आलेल्या ड्रीलमास्तरांकडून कवाईत शिकलों आणि नांवें नोंदविणाऱ्या मुलांच्या संख्येचा अभाव चि. मोरू, चि. मैना आणि चि. राघू यांच्या जन्मामुळें भासेनासा झाला. शिवाय आमच्या शेजारच्या छकडेवाल्याचा मुलगा अब्दुल्या, शेजारचे गोंदूअंतू या मुलांनींहि नांवें नोंदविलीं. तसाच आमचा कुत्रा वसंत हा पलटणीचा कुत्रा म्हणून रहाण्यास तयार झाला. जुन्या बाजारांतून

सर्वांकरितां खाकी पोशाख विकत आणिले. ५
लेल्या बाटल्या, खाकी पायबंद, प्रथमोपचाराचें १.
खोक्याची पेटी या जिनसा विसरलों नाहीं. दररोज
तालीम आमच्या आळींतल्या लाकडाच्या वखारीशेजारीं बखळ ६।
तींत होऊं लागली. मीं स्वत: जरी थोडीबहुत कवाईत केली होती
तरी मुलांस शिकवितांना पुष्कळच पंचाईत पडे. त्यांतल्या त्यांत
समोरील माणसाचा डावा हात आपल्या उजव्या हातासमोर आणि
त्याचा उजवा आपल्या डाव्यासमोर येतो हा उलटा न्याय माझ्या
डोक्यांत फारसा रहात नसे. मुलांना हुकूम दिला, "डावा हात--
वर"! सर्व मुलांनीं एकेक हात वर केला, तो पाहून मीं रागानें
म्हटलें, "मूर्खांनो, उजवे हात कशाला वर केले आहेत ? 'डावा
हात वर' अशी ऑर्डर दिली आहे!"

"पण आप्पा—" मैना बोलूं लागली.

"मैना! या वेळीं तूं मला 'आप्पा' म्हणतां न ये. 'सर'
म्हटलं पाहिजे. घरांत 'आप्पा' हं. काय म्हणत होतीस ?"

"म्हटलं हे आमचे डावेच हात आहेत."

"गाढव! मला मूर्खांत काढती आहे! अग, माझ्या उजव्या
हातासमोर तुमचे डावे हात कसे येतील ?" माझा प्रश्न ऐकून मुलें
खो खो हासूं लागलीं. मग समोर उभ्या रहाणाऱ्याच्या डाव्या-
उजव्याचा व्युत्क्रम माझ्याहि लक्षांत आला. पण हा घोटाळा मी
वारंवार करीं.

एखादे वेळीं पहिला व्यायाम, दुसरा व्यायाम इत्यादीचे क्रम
सैनिकांच्या ध्यानांत राहत नसत आणि एकादा हुकूम दिल्यास

प्रत्येकाचें आसन वेगळें होत असे. उदाहरणार्थ, " धडा—आपलं—व्यायाम तिसरा ! बाहूंचें वक्रीकरण आणि प्रसारण, प्रकार चौथा !" असा हुकूम दिल्याबरोबर अबदुल्या कटेवर हात देई, गोंदू सरळ खालीं सोडी, अंतूच्या खाका वर होत, मैना हातांच्या घड्या करी, तर मोरूराघू आ वासून कॅप्टनकडे बघत राहात. खुद्द कॅप्टन-साहेबांचें शिक्षण ज्या ड्रीलमास्तरांच्या हाताखालीं झालें होतें त्यांची विद्वत्ता फार अगाध होती. ' स्टॅण्ड अॅट् ईज ' च्या पवित्र्यांत दोन्ही टांचांमध्यें ४५ डिग्रींचा कोन असला पाहिजे असें त्यांनीं मला शिकविलें. तेव्हां मीं विचारिलें, ही डिग्री कशी मोजावयाची ? त्यानें सांगितलें, ताप मोजण्याच्या थर्मामिटरनें ! तसेंच दुसऱ्या एका वेळीं तो म्हणाला, 'मू टु धी राइट' म्हणजे तोंड उजवीकडे करा. मू ह्या हिंदी शब्दाचा अर्थ तोंड असा आहे.

बालचमू म्हटली कीं प्रथमोपचाराचें शिक्षण तिला असलेंच पाहिजे, म्हणून प्रथमोपचाराचें पुस्तक आणून त्यांतले बरेचसे उपाय आम्हीं करून पाहिले. अबदुल्याचा छकडा ही आमची अॅम्ब्युलन्स कार होती. छकड्याला काम नसलें म्हणजे आमच्यापैकीं एकादा सैनिक आजारी होई व बाकीचे लोक त्यास वाहून नेण्याचें काम करीत. हें पाहून आमचे शेजारचे रामभाऊ सॉर्टर म्हणाले " अहो कॅप्टनसाहेब ! असा आपल्यांतला एकादा सैनिक वाहून नेण्यापेक्षां मलाच कां नाहीं स्टेशनवर वाहून नेत ? मला रोज पूना एक्सप्रेसवर जायचंच असतं. तुमचं प्रॅक्टिस होईल, माझे तांग्याचे पैसे वांचतील !" पण मी कांहीं कच्च्या गुरूचा चेला नव्हतों. त्यांना सांगितलें, " परोपकारी संस्थांचा अशा रीतीनें आपलें कार्य साधून घेण्याच्या

कामीं उपयोग करण्यानेंच आपण इतक्या अधोगतीला पोंचलों आहों. "

आम्ही छकड्याचा तट्टया काढून टाकून त्याला ॲम्ब्युलन्स कारचें रूप देऊन दररोज तो हिंडवीत होतों. दोनदां तर आम्हीं रोग्यांना ससून इस्पितळांत पोंचविलें होतें. एरवीं मीहि पाय मोड-ल्याचें निमित्त करून छकड्यांत बसत असें. एके दिवशीं छकडा घेऊन आम्ही जात असतां आमच्या आळींतला नथूशेट सोनार कण्हत कण्हत हांक मारून मला म्हणाला, " अहो कप्ताणसाहेब, माझ्या पायाला फार दुखापत झाली आहे. "

मीं कनवाळूपणाचा उमाळा येऊन म्हटलें, " मग काय आम्ही फर्स्ट एड ( प्रथमोपचार ) करूं का ? सगळं सामान आहे बरोबर. "

" फष्ट एडच्या पलीकडे दुखनं गेलं आहे हो ! मला तुमच्या या रोग्यांच्या छकड्यांतूण टेशणावर रेल्वेचा दवाखाणा आहे तिथं पोचवाल तर मेहरबाणी होईल. "

" चला, चला समाजसेवेकरितां तर आमचा हा सगळा खटाटोप आहे. चला रे बॉईज ॲण्ड गर्ल ! शेटजींना उचलून उप-चारशकटामध्यें ठेवूं या, " प्रथमोपचाराचें पुस्तक खिशांतून काढून पंगु रोग्यांना नेण्याच्या उचलबांगड्यांचें प्रकरण काढून मीं म्हटलें, " चारहाती पालखी करतां का तीनहाती ? नाहीं तर मेणा करा. अबदुल, तूं शेटजींच्या बगलेंत हात घाल, अन् गोविंद तूं त्यांचे पाय पकड. अन्तू, तूं त्यांच्या पाठीला टेका दे. हां असेच. उचला, एक दोन तीन ! " माझ्या हुकुमाप्रमाणें तिघांनीं नथूशेटना उच-

ललें व छकड्यांत ठेविलें.

" तेवढी माझी वळकटी आना पाहूं, रेल्वेच्या दवाखाण्यांत स्वत:चा बिछाणा घेऊण जावं लागतं. चांगली दोरिणीं बांधली आहे. अण् शेजारींच पान्याचा तांब्या ठेवला आहे, तो पन आना. अस्सा, थॅन्क यू, ठेवा इथं माझ्या शेजारीं, अग आई ग पाय दुखावला ! "

आळीपाळीनें शेटजींना ढकलीत आम्हीं स्टेशनवर नेलें, तेथ-पर्यंत ते सारखे कण्हत व पाय चोळीत होते. कोणालाहि पायाला हात लावूं देत नव्हते. स्टेशन येतांच ते टुण्दिशीं उडी मारून उतरले व तांब्यावळकटी उचलून घेऊन म्हणाले, " रामराम कप्ता-णसाहेब आणि इस्काउट मंडळी ! तुमच्या या उपचार—छकड्यांत णुस्तं बसूण माझा पाय बरा झाला. आतां दवाखाण्यांत जायचं कारन राह्यलं नाहीं. आतां मी मेलणं कऱ्हाडला जानार आहें. इथपर्यंत बिणभाड्याणं मला आनल्याबद्दल सगळ्यांणा थॅन्क यू, रामराम ! " असें म्हणून तो लुच्चा तिकिट ऑफिसाकडे तुरतुर निघून गेला.

\+ \+ \+ \+

महिनाभर कवाईत झाल्यावर इतर बालचमूंप्रमाणें फिरतीवर जाऊन प्रेमळ शेतकऱ्यांचा आणि भोळ्या खेडवळांचा पाहुणचार उपटण्याचें माझ्या मनांत आलें, म्हणून चार दिवसांची सुट्टी पडली असतां सर्व सैनिकांस, " उद्यांपासून तीन दिवस आपण वनेश्वरला सहल करण्यास जाणार, " असें फर्माविलें. अबदुल्याच्या बापानें चार दिवस बैलाच्या नुसत्या चाऱ्यावारी छकडा वापरण्यास देण्याचें

कबूल केलें, सर्वांनीं दशम्या, भाजी, शिरा बरोबर घेतला. कॅम्पिंग करावयाचें असल्यानें स्टोव्ह व स्वयंपाकाचीं भांडीं बरोबर घेतलीं आणि एका गुरुवारीं संध्याकाळीं पांच वाजतां आम्ही सर्व साताऱ्याच्या रस्त्यानें निघालों. या रस्त्यावर पुण्यापासून एकविसाव्या मैलापाशीं उजवीकडे जी वाट फुटते तिनें कोसभर अंतरावर बनेश्वर आहे.

पुण्याहून सुमारें दोन कोस गेल्यावर आम्हांला पद्मावतीचा तलाव लागला. याचें पाणी खरजेसारख्या त्वचेच्या रोगांना चांगलें आहे—म्हणजे रोग झालेल्या मुलांना. (रोगांना अर्थात् वाईटच आहे, वदतो व्याघ्रः कीं काय म्हणतात त्याचें हें उदाहरण आहे.) आम्ही गेलों होतों तेव्हां या तलावास बरेंच पाणी चढलें होतें तें पाहून आम्हांला पोहण्याची तीव्र इच्छा स्वाभाविकच उत्पन्न झाली. शिवाय बालचमूस पोहतां येणें हें अति आवश्य होतेंच. पोहावयास शिकण्याचें पुस्तक आम्हीं विकत घेतलें होतें. तें उपयोग होत नसल्यानें कुजत चाललें होतें. लगेंच आम्हीं छकडा थांबविला व पोहण्याचा पोशाख चढविला—(म्हणजे नेहमींचा पोशाख उतरला इतकेंच). अबदुल्या, गोंदू, अन्तू पोहूं लागले. परंतु त्यांचें पोहणें टारपेडोशाही होतें. पावलें पाण्याच्या बाहेर मारण्याची त्यांस संवय होती. मीं त्यांस जमिनीवर पडून सफ़ाईदार रीतीनें पोहून दाखविलें पण तें त्यांस साधेना.

" सर, मग तुम्हीं पाण्यांत उतरून प्रत्यक्ष पोहून दाखवा म्हणजे आम्हांला समजेल, " अन्तू म्हणाला.

" त्यांत काय आहे रे ? अरे, असे हात क्षितिजसमांतर रेषेंत

अर्ध वर्तुळाकृती मारायचे अन् पाय पाण्यांत ऊर्ध्व रेषेंत आंतल्या आंत हलवायचे. टारपेडोसारखं धबक् धबक् किंवा बेडकासारखं डुबक् डुबक् करीत जायचं नाहीं. हं चालू द्या........अबदुल्या, अगदींच चुकलास; अरे हें बघ मी दाखवितों," असें बोलण्याच्या भरांत मी पाय तळाशीं लागत होते तेथवर उतरलों आणि पुस्त-कांतल्या आकृतिप्रमाणें सशास्त्र हात मारून दाखविले.

"सर, आतां पाय मारून दाखवा कीं!" गोंदू म्हणाला. मी भरीस पडून दोन पाय मारतांच तलावाच्या मध्यभागीं आलों. तेथें पाणी खोल होतें. तळाला पाय लागेना. घाबरून गटांगळ्या खात "ए अबदुल, ए गोंदू, मेलों काढा," असें ओरडूं लागलों. तीं वात्रट पोरें बालचमूचे नियम मोडून आपल्या शिक्षकास हासूं लागलीं. कांठावर उभ्या असलेल्या मोरूनें पोहण्याचें पुस्तक हातांत धरून म्हटलें, "आप्पा हें पुस्तक फेंकतों, झेला आणखी मनुष्य बुडत असतां त्यानं काय करावं हा भाग वाचून पहा."

"ए मोरू, तें पुस्तक पाण्यानं भिजेल. त्यापेक्षां तूं वाचून दाखीव त्यांत काय आहे तें," अंतूनें त्यास सांगितलें.

"बुडणाऱ्या माणसानें डोकें अगदीं थंड ठेवावें," मोरू वाचून दाखवूं लागला, "थंड पाण्यांत बुडत असलेल्या माणसाला डोकें थंड ठेवणें फारसें कठीण नाहीं. त्यानें हातापायांची चळवळ बंद ठेवून छाती पुढें करून पाण्यावर उताणें पडावें. श्वास फक्त नाकानें मंदमंद घ्यावा म्हणजे बुडण्याची धास्ती नाहीं."

माझी प्राणान्तिक अवस्था झाली होती. पद्मावतीच्या यःक-श्चित् डबक्यांत जर हा कॅप्टन चिमणराव बुडून मेला तर त्याला



बुडणाऱ्या माणसानें डोकें अगदीं थंड ठेवावें.

मरणानंतर जगाला तोंड तरी दाखवितां येईल काय ? हा विचार विजेच्या धक्क्यासारखा मला चाटून गेला. मला हासणाऱ्या पोरांचा व आजोबासारखा उपदेश करणाऱ्या मोऱ्याचा अतिशय राग आला व मीं त्यांस म्हटलें, "अरे कार्ट्यां आतां गड्गड्गड्गड्—माझी चेष्ट्-खोक खोक—अरे मेला. ओऽऽय्या गड् गड् गड् गड्—" इतक्यांत अबदुल्या पोहतपोहत आटोक्यांत आलेला पाहून त्याच्या मानेला मीं विळखा घातला.

"अहो आप्पा ! त्याच्या मानेला मिठी मारूं नका. हें पहा या पुस्तकांत काय लिहिलं आहे. नियम दहा—आपणांस वांचविण्याकरितां येणाऱ्या इसमाच्या मानेस आवळूं नका. तशानें तो बुडेल, तुम्हीहि बुडाल," मोरू ओरडून सांगूं लागला. अबदुल्याच्या मानेला मीं मिठी मारल्यानें तो ओरडूं लागला, तेव्हां गोंदूअंतू त्याच्या जवळ गेले. त्यानें गोंदूला मिठी मारली. मीं दुसऱ्या हातानें अंतूची मानगुटी पकडली. सर्वच घाबरून ओरडूं लागलों.

तोंच दर्शनाला आलेला एक कुणबी कांठावर उभा राहून खदां खदां हासला व ओरडला, "अहो बामणबुवा, खालीं पाय टेका कीं ! पाणी तर उलीसं हाय् न् काय धिंगाणा लावलाय् ! मला वाटलं कीं तुम्ही ह्या प्वारांची थट्टा करतां पण पाह्यलं तर खरंच घाबरून गेलाया अगदीं !"

मीं लगेच पाय सरळ केले ते डबक्याच्या तळास लागले. मग पाण्यांत ताठ उभा राहून स्मितत म्हणालों, "अहो पाटीलबुवा ! मी थट्टाच करीत होतों. ए पोरांनो, माणूस बुडूं लागला तर असेच का रे तुम्ही त्याला वांचविणार ?" माझे पाय तळास लागले तसे

मुलांचे लागत नव्हते म्हणून मला त्यांची बरीच थट्टा करतां आली. माझे व्यवसायबंधू स्काउटमास्तर यांस अनुभवानें सूचना देतों कीं, तुम्हांला चांगलें पाहतां येत नसेल तर फार खोल पाण्यांत शिरूं नका. स्वतःचे पाय टेकतील इतक्याच खोलींत जा. मुलांचे पाय तेथें टेकणार नाहींत व तुम्ही पोहत आहां असेंच वाटेल.

आम्हीं बाहेर येऊन अंगें कोरडीं केलीं, कपडे घातले आणि छकडा चालू केला. बैल हाकण्यास अबदुल्या बसला होता. बाकी सर्वांनीं दहावा मैल येईपर्यंत चालावयाचें असें ठरलें होतें. पांचसहा मैल जातांच मी स्वतः दमलों, पण सैनिकांच्या आधीं सेनानी दमल्याचें इतरांस कळल्यास फजिती होईल म्हणून, "काय मैनाताई, काय म्हणतात पाय ? काय राघोबा, बसायचं आहे का छकड्यांत ? " इत्यादि प्रकारें मुलांना चिथावण्यास सुरवात केली; परंतु मुलें चैनींत बागडत होतीं, कोणीहि छकड्यांत बसण्याची इच्छा दर्शवीना. मी तर कात्रजचा चढ सुरू होतांच थकून गेलों, परंतु मुलांच्या आधीं थकलों अशी नाचक्की होऊं नये म्हणून त्यांस छकड्यांत बसण्याचा आग्रह करीत होतों. शेवटीं मला एक युक्ति सुचली. सिगारेट काढून तोंडांत धरला व तो शिलगावण्यास काडी ओढली. वाऱ्यामुळें ती विझली. दुसरी ओढली तीहि विझली. मग तिसरी न ओढतां चवथी ओढली, तीहि विझली. शेवटीं मीं, " छेः या रस्त्याच्या वाऱ्यानं काडया विझत आहेत, मी जरा छकडयांत बसून टपाच्या आड काडी ओढतों म्हणजे विझणार नाहीं, " असें म्हणून छकड्यांत बसून सिगारेट पेटविली आणि खालीं उतरावयाचें विसरलों.

दहावा मैल येतांच सर्व मुलें पटापट छकड्यांत चढून बसलीं, बोगदा जाऊन घाट संपला. रात्रहि झाली होती, त्यामुळें कंटाळून सर्वजण पेंगले. अबदुल्लानें रश्शी जुवाला बांधिली व त्यावरच आंग पसरून दिलें. बैल शिध्या रीतीनें चालला होता. आणखी दहा मैल अंतर तोडावयाचें होतें, त्यास पांच तास लागतील; तोंपर्यंत बैलाच्या ताब्यांत छकडा द्यावा व आपणहि जरा विश्रांति घ्यावी असा मीं विचार केला. रातचाल करणारे बैलगाडीवाले असेच या जनावरांवर विसंबतात मग आपल्याला काय हरकत आहे ? चार-पांच तासांत सहज जागे होऊं. असा विचार करितां करितां माझा डोळा लागला.

पहाटे साडेपांचला मी हुकमी जागा झालों. आतां बहुतेक नसरापुरचें वळण आलें असेल असें वाटून मी बाहेर पहाणार इतक्यांत “ हें काय ?परत यायचं कसं झालं ! कोणी आजारीबिजारी तर नाहींना पडलं ? ” असे सौ. चे शब्द कानीं पडले. प्रथम मला वाटलें हा भास असेल; परंतु नीट डोळे उघडून पहातों तों आम्ही परत पुण्यास आपल्या घरासमोर येऊन थडकलों होतों ! बैलोबानें रात्रीं वाटेंत उलट दिशा घेऊन बनेश्वराला नेण्याऐवजीं परत पुण्यास येऊन आम्हांला चांगलेंच बनविलें. सकाळीं आमची सफर हा शेजाऱ्यापाजाऱ्यांचा थट्टेचा विषय झाला. काय हो ! तुमचं बनेश्वर इथंच झालं वाटतं ! पण तुम्ही इतकेजण छकड्यांत असून बैल उलट चाललेला एकाच्याहि लक्षांत कसा आला नाहीं ? तुमच्या बैलाला चांगली विनोदबुद्धि असलेली दिसते, इत्यादि प्रकारें जो तो आमच्याकडे डोकावून पाहून आमची टर उडवी.

अशी फजिती पुनः न व्हावी म्हणून आम्ही दिवसां प्रवास करण्याचें ठरवून दुसऱ्या दिवशीं सकाळीं पुण्याहून निघालों. वाटेंत एक रसाचें गुऱ्हाळ लागलें. वऱ्हाडांतल्या प्रमाणें आपल्याला येथें फुकट रस मिळेल अशा आशेनें मी सर्व चमूसह गुऱ्हाळांत शिरलों. गुऱ्हाळवाल्यानें किती रस पाहिजे असें विचारिलें. " द्या एकेक भांडें, " मीं म्हटलें.

" दोन आणे शेर भाव आहे, " त्यानें सांगितलें.

" अरे भाव कसला सांगतोस ? ही स्काउटची तुकडी आहे न् मी कॅप्टन आहें. आम्हांला फुकट रस दिला पाहिजे अशी गव्हर्मेन्टची आर्डर आहे. "

" आम्हांला नाहीं ठाऊक आर्डर न् बार्डर ! आणीक तूं रे कोण ? रंगरूट गोळा करायला निघालास व्हय ? तरीच म्हादबा म्हणत होता पुनः लढाई जुपायची आहे. हीं अशीं लोकांचीं पोरं गोळा करीत निघालास. दम कात्राजेचं पाणी दावतों तुला—" अस्तन्या सावरीत गुऱ्हाळवाला म्हणाला.

भीक नको पण कुत्रा आवर असें मला झालें. मी रंगरूट एजन्ट नाहीं असें त्याला जीव तोडून सांगूं लागलों; परंतु माझा व बरोबरच्या मुलांचा खाकी पोशाख पाहिल्यानें त्याची खात्री पटेना. मुलें माझ्या वतीनें बोलूं लागलीं तें त्याला पढवून ठेविलेलें बोलणें वाटूं लागलें. थोडक्याच वेळांत तो उसाचीं दोन कांडें घेऊन मला मारावयास आला, तोंच सर्वांनीं मिळून त्यास पिट्टी देऊन पळविलें. त्याची रसानें भरलेली एक चरवी छकड्यांत टाकून आम्हीं छकडा पिटाळला.

दुपारीं आम्ही शिवापुरास पोंचलों. तेथें एक गरम झरा व पेशव्यांच्या वेळची आंबराई आहे. खेडयांतील हवा, पाणी, दूध, भाज्यांची रेलचेल आणि पाहुणचार यांची स्तुति मीं जागोजाग वाचली होती. तिचा प्रत्यय घेण्याची वेळ आतां आली होती. खेडे-गांवचें पहिलें सुख जें हवा त्याविषयीं आमचें फारच अनुकूल मत झालें. आमच्या छत्र्या वाऱ्याच्या जोरानें उलट्या होऊं लागल्या, टोप्या डोक्यावर स्थिर राहीनात आणि फराळाकरितां मांडलेल्या पत्रावळी ( वर्तमानपत्रांचे जुने अंक ) उडून जाऊं लागल्या. दुसरें सुख पाणी. एका घरवाल्याजवळ पाणी मागितलें तों तो अंगावर आला व रेकला, " अरे जा पाणी मागणार ! आम्हांला पन्नास हात खोल विहिरींचं पाणी काढावं लागतं कंबरडं मोडून, अन् म्हणे यांना पाणी द्या ! खाकी पोशाक आणखी हा गुडघ्याइतका विलायती पंचा चढविला कीं यांना वाटतं आपण मोठे पंत सचीव झालों ! जा तिकडे विहिरीवर न् घ्या ओढून पाणी ! "

आम्ही खेडेगांवच्या पाहुणचाराच्या पहिल्या सलामीनें गार झालों. विहिरींतील पाणी काढण्यासाठीं दोर मागूं लागलों पण सर्व गांवांतल्या बादल्या, घागरी, पोहोरे, दोरासह आमच्या येण्यानें एकदम अदृश्य झाले होते. शेवटीं गोंद्याच्या पटक्याला मैनाचें पातळ, त्याला माझें धोतर आणि त्याला वसंताची सांखळी बांधून बरोबर आणिलेल्या कुकरची बादली विहिरींत सोडली. विहिरींतलें पाणी इतकें मुबलक होतें कीं बादली तळाला टेकूनच पाणी आंत शिरावें लागत होतें. ती वर काढली तेव्हां पाण्यांत प्राणी– व वनस्पति–संग्रहालयाचा लहानसा नमुनाच दिसत होता.

कॉफी तयार करण्याकरितां आम्हीं पाणी विस्तवावर ठेविलें, परंतु कॉफीसाखरेची पुरचुंडी बरोबर घेण्यास विसरलों होतों. मीं मोरूला जवळच्या वाण्याकडे जाऊन दहा रुपये भार साखर व पांच रुपये भार कॉफी आणण्यास सांगितलें. कदाचित् शिवापूरचे शेर अच्छेर वेगळे असतील, त्यांचा घोटाळा नको म्हणून ' रुपये भार ' या अखिल भारतीय प्रमाणाचें माप दिलें होतें. थोड्याच वेळानें चिमूटभर कॉफी व मूठभर साखर घेऊन तो आला. " अरे, पांच रुपये भार कॉफी इतकीच ? अन् हीं काय अदपाव साखर ?" असें मीं मोरूस विचारिलें. " त्यांनीं दिली तेवढी आणली. मला माप समजलं नाहीं, " असें त्यानें उत्तर दिलें.

लगेच अबदुल्या व गोंदूमोरूना घेऊन मी त्या वाण्याकडे गेलों व त्याच्या पुढें त्या पुडया उघडून दाखवून विचारिलें, " शेटजी, तुम्हींच ना या पुड्या या मुलाला दिल्या ? " त्यानें होय म्हटल्यावर मी संतापानें ओरडलों, " मग काय ही पांच रुपये भार कॉफी न् ही दहा रुपये भार साखर ? लहान मुलगा पाहून खुशाल त्याला फसवायचं ? "

" आणा पाहूं त्या पुड्या, मी वजन करून दाखवतों, " असें म्हणून वाण्यानें माझ्या हातांतली साखरेची पुडी घेतली आणि ती तराजूच्या एका पारडयांत घालून दुसऱ्या पारडयांत दहा रुपयांची नोट घालून आम्हांला म्हटलें, " बघा साहेब, आहे ना ही दहा रुपये भार ? आतां ती कॉफीची पुडी आणा इकडे. पहा ही या पारडयांत पांच रुपयांची नोट घातली न् ही तुमची कॉफी पहा. आहे का नाहीं बरोबर ? "

वाणीदादांची शक्कल पाहून मला रागाबरोबर हासेंहि आलें. "बरं, पुरे आतां थट्टा, आतां खरं माप द्या," मीं त्यास म्हटलें. त्यानें आपण थट्टा करीत नसल्याचें सांगितलें. रुपयांच्या ऐवजीं जर नोटा चालतात तर रुपयेभाराऐवजीं नोटाभार कां चालूं नयेत हें त्यास समजेना. आमचें भांडण जुंपलें, दुकानापुढें गर्दी झाली.

रस्त्यानें दोडगे ब्रदर्सची एक सर्व्हिसवाली मोटार चालली होती. या दोडगे बंधूंच्या मोटार स्वाऱ्या हिंदुस्थानभर चालू आहेत हें अभिनंदनीय आहे. एक पोलिस जमादार पुढल्या बैठकीवर बोकड—उताराच्या नात्यानें बसला होता. आमचें भांडण पाहून तो खालीं उतरला व सर्व हकीकत ऐकून घेऊन, "अहो राव-साहेब, हे खेडेगांवचे लोक फार भोळे असतात बरं! यांच्याशीं वागतांना जपून वागलं पाहिजे, असा मला उपदेश करून त्यानें वाण्यास म्हटलें, "बरं, वाणीदादा, आतां तुमची खुर्दनाण्याची पेटी उघडा....बऱ्या बोलानं उघडा नाहीं तर गिऱ्हाइकाला फसव-ल्याबद्दल फौजदारी करतों!"

वाण्यानें पुढें केलेल्या पेटींतून शिपाईबुवांनीं दहा रुपयांचा खुर्दा मोजून एका पारड्यांत घातला आणि दुसऱ्या पारड्यांत साखर घालण्यास फरमाविलें. नंतर ती ६४० पैसे भार साखर आणि तशीच ३२० भार कॉफी आम्हांला देवविली. नोटाभार जिनसा जर चालल्या तर खुर्दाभार कां चालूं नयेत? आम्हीं शिपायाचे मनापासून आभार मानिले आणि तो मोटारमधून पुढें जाऊं लागला तेव्हां सर्व सैनिकांनीं त्यास ओळीनें उभे राहून लष्करी सलामी दिली. "थ्री चीअर्स फॉर कॉन्स्टेबल नंबर ३०२!"

मीं जयजयकार केला आणि हिप् हिप् हुरेच्या त्रिवार घोषानें सैनिकांनीं त्याची पूर्तता केली.

तेथून पुनः आम्ही आपल्या तळावर आलों तों पाण्याला आधण आलें होतें. लगेंच कॉफीसाखर टाकून अंतूगोंदूस दूध आणण्याकरितां गांवांत पाठविलें. पैसे घेऊनहि कोणी दूध देईना. चक्कर मारणारांचा नेहमींचा अनुभव आहे कीं, खेडवळ लोक शहरी पाहुण्यांची होईल तितकी अडचण करण्यांत तत्पर असतात. खोलींत बसून खेडयांतील काल्पनिक सुखांची किंवा खेडवळांच्या काल्पनिक सद्गुणांचीं स्तुतिस्तोत्रें गाणाऱ्यांस माझें म्हणणें पटणार नाहीं; पण आम्हांला कांहीं केल्या दूध मिळेना एवढें मात्र खरें. तेव्हां मला युक्ति सुचली कीं, दुधाऐवजीं लिंबाचा रस कॉफींत मिसळावा म्हणजे तिला चांगली चव येते. मी गोंदूस शेजारच्या मळयांतील लिंबाचें झाड दाखवून दोन लिंबें घेऊन येण्यास सांगितलें. त्यानें विचारिलें, " अन् शेतकरी पकडायला आला तर ? "

" तर काय ? त्याच्या हातावर तुरी देऊन निसटून ये, " मीं सांगितलें व कॉफी गाळविण्याच्या व्यवस्थेस लागलों. गोंदूनें आमच्या बरोबरच्या धान्याच्या डब्यांतून कायसें बरोबर घेतलें व लिंबें आणण्यास गेला. थोडयाच वेळांत तो पुढें व शेतकरी मागें असें धावत आले. जवळ येतांच शेतकरी म्हणाला, " अहो रंग-रूट मास्तर, या पोरांनीं आमच्या झाडावरचीं फळं तोडलीं आणखी मी त्याला पकडायला लागलों तर माझ्या हातावर ही डाळ ठेवून हा पळाला ! "

मीं प्रश्नचिन्हाची दृष्टि गोंदूवर फेकिली.

" सर, तुम्हीच नाहीं का म्हणालांत शेतकऱ्याच्या हातावर तुरी देऊन निसटून ये म्हणून ! " गोंदूनें स्पष्टीकरण केलें.

गोंदूच्या वेडेपणाचें सर्वांस व शेतकऱ्यासहि हासूं आलें. चोरून आणलेल्या लिंबांचे पैसे शेतकऱ्यानें मागितले, त्याबरोबर मीं सैनिकांस हुकूम दिला, ' एका ओळींत ' ( फॉल इन ) !

सर्व सैनिक ओळीनें उभे राहिल्यावर दुसरा हुकूम दिला, " बगला वर ! " सर्वांनीं खाका वर केल्या.

" पाटीलबुवा, हें तुमच्या मागणीला उत्तर सगळ्यांनीं खाका वर केल्या आहेत ! " मीं शेतकऱ्यास म्हटलें. तो माझ्या गमतीदार उत्तरानें इतका खुष झाला कीं, त्यानें आम्हांस लिंबें ठेवूं दिलीं. आम्हीं चहांत त्यांचा रस मिसळला व एक पेला पाटीलबोवांस दिला. पाटीलबुवांनीं आम्हांला विचारलें " तुम्ही सरकारी हापिसर आहां काय ? " मीं होकारार्थी उत्तर दिल्यावर त्यानें मला सरकारी हुकूम दाखविण्यास सांगितलें.

मी ऑफिसांत फावल्या वेळीं टाइपरायटिंग शिकत असें, त्याच्या प्रॅक्टिसचा एक कागद खिशांत राहिला होता, तो काढून शेतकऱ्यास दाखविला. त्यावर खालीलप्रमाणें मजकूर होता.

PooNa Poona
thisito cERTify THAT This IS TO cetiff
that this xxx? To CERTTT.....that that
Your's fAITHfuxxx
ucursFai thfumy
honesstyisTHe bestp oligy Honesty IS
THE!?x bolicy a birdinthe Hands worth
too INthedush

हा कागद शेतकऱ्यानें उलट धरून वाचल्यावर त्याची माझ्या रिक्रूटिंग ऑफिसरशिपबद्दल खात्री झाली. " बरं साहेब, गरिबावर इकती दया करा. माझ्या मुलांबाळांना धरून नेऊं नका म्हणजे झालं; मागल्या वेळेला माझा पोरगा लढाईवर गेला तो परत आला नाहीं. पायां पडतों वाटलं तर आणखी धा लिंबं देतों. "

" जा, जा पाटीलबुवा, आम्ही जबरदस्तीनं कोणालाहि नेत नसतों, " अशी त्याची समजूत घालून मीं त्याला रवाना केलें. मात्र तो मघां माझ्या कोटीबाजपणाला हांसला, तो माझी कोटी गमतीदार म्हणून हासला नाहीं तर आपल्या मुलाला मीं नेऊं नये म्हणून मला खुष करण्यासाठीं हासला हें लक्षांत आल्यानें जरा खिन्न झालों.

आम्ही शिवापुराहून दुपारीं निघालों ते संध्याकाळीं भोर संस्थानाच्या हद्दींत शिरलों. मीं मुलांना सांगितलें, " बघा रे, आतां येथून पुणें जिल्हा संपून भोर संस्थान लागलं. "

गोंदूनें माझें विधान खोडण्याचा यत्न केला, " सर, पण नकाशांत भोर संस्थान पिवळं दाखवलं आहे, आणखी इथली माती पांढरीच आहे. पिवळी माती लागेल तिथून भोर. "

अंतू म्हणाला, " छट्, मातीचा अन् नकाशांतल्या रंगाचा कांहीं संबंध नाहीं. पुणें जिल्ह्याची माती पांढरी, बेळगांवची अन् कोंकणची तांबडी; पण नकाशांत त्या दोघांचे रंग तांबडे असतात; उलट दक्षिण महाराष्ट्राची जमीन काळी पण नकाशांत तें पिवळं असतं. "

गोंदू–नेहमींच नकाशे चुकतात असं नाहीं. नेपाळ आणखी

गोवा प्रांतांत दाट झाडी असते ती दाखवायला ते प्रांत हिरवे रंगवतात; समुद्र न् नद्या निळ्या असतात.

अबदुल्या—अरे हे नकाशे करणारे स्वतः मुलूख पाहून येतील तर ना ! अजमासानं कांहीं तरी रंग देतात झालं. अंतू न् गोंदूंना नकाशे करायच्या कामावर नेमायचं कोणाला सुचतं आहे ?

कांहीं वेळानें नसरापूर आलें, त्याच्या आधींच मोठी सडक सोडावी लागली होती. नसरापुरास एक सर्कस उतरलेली होती, तेथल्या जाहिराती पहाण्यासाठीं आम्ही सर्व उतरून इकडे तिकडे हिंडत होतों. सर्कशीचे मॅनेजर आम्हांला पाहून मजकडे आले व म्हणाले " काय ? कुणिकडे चालली कंपनी ? "

" बनेश्वरला, " मीं सांगितलें.

" पण आतां काय आहे बनेश्वरला ? यात्राबित्रा तर कांहीं नाहीं, इथें नसरापूरला तर आमची सर्कस उतरली आहे. तुम्ही आतां भोरला जा, तिथें रामनवमीचा उत्सव आहे. चार पैसे मिळतील—निदान उत्सवांत फुकट जेवायला तरी मिळेल ! ह्यः ! ह्यः ! कोणचे खेळ करते तुमची कंपनी ? "

" खेळ आपले नेहमींचे—आट्यापाट्या, ब्लाइंड मॅन्स बफ, टग ऑफ वॉर, खो खो—" मी सांगूं लागलों.

" अहो, या खेळांवर खेडेगांवांत काय मिळणार आहे ? चांगले संगीत रंगीत चंगीभंगी खेळ पाहिजेत इथें—" असें म्हणून एक लावणीचा चरण तो मोठ्यानें हावभावासह म्हणूं लागला.

हा आम्हांला नाटकवाले किंवा तमाशेवाले समजत आहे असें पाहून मला फार राग आला. "आमची ही तमासगिरांची टोळी




आपण जसे कॅप्टन तसा मीं पण प्रोफेसर आहें !

नव्हे मास्तरसाहेब ! ही स्काउटकोअर आहे. आम्ही बनेश्वरला क्यांपिंग करायला जात आहों. पैसे मिळवायला नाहीं कांहीं. ”

रिंगमास्तर वाईट वाटल्यासारखें करून म्हणतात, “ माफ करा, मिस्टर आपलं हे....”

“ कॅप्टन, ” मीं सुचविलें.

“ यस् कॅप्टनसाहेब ! आपण जसे कॅप्टन तसा मी पण प्रोफेसर आहें. पण आपल्या या स्काउट टोळीचा उपयोग काय ? बरेच लोक स्काउट चळवळीच्या विरुद्ध आहेत. उनाड पोरांचाच स्काउटांत भरणा असतो असा याच्यावर आक्षेप आहे ”

“ प्रोफेसरसाहेब ! हा सगळा लोकांचा गैरसमज आहे. स्काउट टोळी ही परोपकार, भूतदया, समाजसेवा अशा गुणांनीं प्रेरित झालेली असते. हें हॅण्डबुक वाचा, म्हणजे स्काउटांनीं महायुद्धाच्या नंतर किती लोकोपयोगी कामं केलीं हें तुमच्या ध्यानांत येईल ! ” याप्रमाणें आमच्या जरा गप्पा झाल्यावर दुसऱ्या दिवशींचें आमंत्रण देऊन प्रोफेसरसाहेब आपल्या कामाला गेले.

इतक्यांत गोंदूस पकडून एक दुकानदार मजकडे घेऊन येत आहे असें मला दिसलें. ती जोडी जवळ येतांच, “ या मुलास कां धरलें आहेस ? ” असें दुकानदारास मीं विचारिलें. दुकानदार उत्तरला, “ या पोरानं माझी मस्करी केली. माझ्या दुकानांतल्या पेढ्यांच्या पाटीकडे बोट दाखवून ह्यानं विचारलं, ‘ या माशा काय भाव दिल्या’ ? ”

गोंद्या म्हणाला, “ पेढ्यांच्या पाटीकडे मीं बोट दाखवलं असलं तरी तींत मला पेढे दिसले नाहींत. फक्त माशाच दिसल्या.”

गोंद्याचा हा जबाब ऐकून आणि भोंवताली जमलेल्या प्रेक्षकांची संमति त्यालाच आहे असें पाहून दुकानदारानें शिव्या देत माघारें पाऊल घेतलें आणि आम्हीं बनेश्वरचा शेवटचा कोस तोडण्यास प्रारंभ केला.

रात्रीं आठ वाजतां बनेश्वरास पोहोंचलों. छकडा देवळाच्या बाहेर सोडून बैल बांधला. देवळांत पोंचतांच तेथल्या कुंडांतील धो धो वाहणारें पाणी पाहून फार समाधान झालें. बैलाला पाणी पाजलें. आम्हीं हातपाय धुतले. नंतर देवळाच्या ओवरींत सामान-




या माशा काय भाव दिल्या ?

सुमान लावून सर्वांनीं मिळून भातपिठलें तयार केलें व भोजन झाल्यावर एकत्र बसलों.

मुलांस नीतिशिक्षण देणें हें बालचमूच्या नायकाच्या कर्तव्यांपैकीं एक कर्तव्य समजलें जातें. त्यास अनुसरून भोजनोत्तर आम्ही सर्व आगटी पेटवून तिच्या भोंवतीं बसलों. नीतिशिक्षणावरील एका प्रचंड ग्रंथांतील पांचपंचवीस नीतिकथा मीं मुखोद्गत केल्या होत्या, त्यांतली एक गोष्ट मुलांस सांगितली, ती अशीः—

" युरोपखंडांत दुकानांस तावदानें असतात, कां कीं बर्फवृष्टि, वादळ इत्यादिकांचा उपसर्ग आंतील जिनसांस न व्हावा. एके दिवशीं कांहीं मुलें दगडांनीं खेळत असतां एका मुलाचा दगड तावदानास लागून तें फुटलें. तेव्हां सर्व मुलें त्याला पळून जावयास सांगूं लागलीं. कां तर तावदानाची किंमत भरून द्यावी लागेल; परंतु तो मुलगा पळून न जातां थेट दुकानदाराकडे गेला व म्हणाला, ' महाराज, हें तावदान माझ्या हातून फुटलें आहे. याची भरपाई करण्यास मी असमर्थ आहें, कारण कीं माझा बाप गरीब आहे. तेव्हां याची किंमत भरून येई तों मी तुमचेकडे मजुरी करीन. ' त्या मुलाच्या प्रामाणिकपणामुळें मालक इतका खुष झाला कीं त्यानें तावदानाची किंमत माफ केली इतकेंच नाहीं तर त्यास एक सुंदर टोपी बक्षीस देऊन म्हटलें, ' जर या देशांतील सर्व मुलें तुझ्या सारखींच प्रामाणिक निपजतील तर किती चांगलें होईल' !"

ही गोष्ट सांगून तिचें तात्पर्य काढावयास मुलांस सांगितलें. मैना म्हणाली, " प्रामाणिपणानीं वागावं आणखी आपला अपराध

कबूल करावा म्हणजे लोक आपल्याला टोपी घालतात. " मोरू म्हणाला, " दुकानांला काचेचीं तावदानं लावूं नयेत. मुलं तीं फोडतात आणखी वर बक्षीस उपटतात " गोंदू म्हणाला, " लहान मुलांनीं खोडी केली तरी त्यांना शिक्षा देऊं नये "

अंतूचें तोंड आंबट दिसत असल्यानें ती गोष्ट त्यास न आवडल्याचें दिसत होतें. मी त्यास म्हणालों, " काय अन्तू, तुला ही गोष्ट आवडली नाहीं ? "

तो म्हणाला, " सर, ही गोष्ट आम्हांला आमच्या मास्तरांनीं वर्गांत सांगितली होती. माझी टोपी जुनी झाली तेव्हां नवी मिळावयाला ही युक्ति बरी आहे असं वाटून मी एकदां सह्याद्रिकर बंधूच्या कापडाच्या दुकानापुढें जाऊन दगड मारून काच फोडली पण तें मालकाच्या लक्षांत आलं नाहीं. मी दुकानांत गेलों अन् म्हणालों, ' शेटजी, मीं तुमचा अपराध केला आहे ' ' तो काय ? ' ' खेळतां खेळतां तुमचं तावदान फोडलं. ' ' अरे हरामखोरा, तरी आज आठ दिवस रोज आमच्या दुकानावर धोंडे पडताहेत. बरा सांपडलास ! भय्या, याला पकडून ठेव. ' दुकानदारानं तावदान पाहिलं आणखी मला पांच रुपये भरपाई द्यायला सांगितलं. मीं मजुरी करून रुपये भरायला तयार झालों, तेव्हां तो म्हणाला, ' तुझ्या सारख्या भामट्याला माझ्या दुकानांतल्या कापडाच्या गठ्ठयांवर बसूं द्यायला मी कांहीं मूर्ख नाहीं. भय्या, या पोराला धरून त्याच्या बापाकडे ने आणखी पांच रुपये घेऊन ये नाहीं तर त्याला फरासखान्यांत पाठवून देऊं. ' अशा तऱ्हेनं नवी टोपी न मिळतां माझे भिक्षावळींत सांठलेले रुपये मात्र या प्रामाणिकपणाच्या पायीं मी दवडून बसलों. "

हें पांडित्य ऐकून मी चकित झालों व म्हणालों, " ही तुझी लबाडीची युक्ति होती. तुला लबाडीबद्दल योग्य प्रायश्चित्त मिळालं. आतां दुसरी एक गोष्ट सांगतों, तिचं तात्पर्य सांगा. शिदू नांवाचा खोडकर मुलगा होता. त्याला वाटलं आपण विड्यांची लज्जत पहावी. एकदां बाप निजला असतां त्यानें त्याच्या खिशांतून विड्या चोरून घेतल्या व त्यांतील दोन एका बाजूस जाऊन ओढिल्या. तोंच त्यास ओकारी झाली, मळमळूं लागलें, डोकें दुखूं लागलें, डॉक्टरचें कडू औषध घ्यावें लागलें आणि सरते शेवटीं गुन्हा उघडकीस येऊन बापाच्या हातचा मार खावा लागला. '

मैनाचें तात्पर्यः—लहान मुलांनीं विड्या ओढूं नयेत.

अंतू —विड्या ओढून जर मळमळतं तर त्या कशाला ओढाव्या ? आपली कुवत पाहून कोणतंहि काम करावं.

अबदुल्याः- –विड्या ओढूं नयेत. शिदूनीं विड्या ओढण्याऐवजीं आगगाडीछाप नाहींतर हत्तीछाप शिग्रेट ओढल्या असत्या तर त्याला कांहीं झालं नसतं असं मी स्वतःच्या अनुभवावरून सांगतों. गांवठी दारू, विडया यांच्याऐवजीं– -

" पुरे पुरे, तात्पर्याचे धिंडवडे पुरे झाले. आतां मी आणखी एक गोष्ट सांगतों तिचं तरी तात्पर्य नीट सांगा. एक मुलगा एका रानांत गुरें चारीत होता. तेथें एक गांधीलमाशी उडतांना पाहून तो म्हणाला, ' देवानें हा प्राणी उगाच निर्माण केला आहे. याचा जगास काय उपयोग आहे ? ' इतक्यांत त्याला ती माशी कडकडून डसली व तो तिच्या मागें तिला पकडण्यास धांवला. तो झाडापलीकडे गेला नाहीं तोंच त्या झाडावर कडकड

आवाज करीत वीज पडून तें जमीनदोस्त झालें. मग तो मुलगा म्हणाला, ‘ अरेरे ! मीं व्यर्थ देवास दूषण दिलें. जर ही माशी मला न चावती तर या झाडाच्या खालींच राहून विजेनें जळून खाक होतों.’ सांगा पाहूं या गोष्टीवरून काय शिकावें तें ! ” मीं म्हटलें.

मैना:—देव करतो तें आपल्या बऱ्याकरतांच करितो.

गोंदू:— गांधीलमाशीला जिवंत सोडूं नये.

अंतू:—यांपैकीं मैनाबालेचं तात्पर्य मला जास्त पसंत आहे. देव कधींहि आपलं नुकसान करीत नाहीं. कधीं कधीं प्रथमदर्शनीं त्याची करणी आपल्याला निर्दयपणाची वाटते; परंतु तिच्यापासून परिणामीं आपलं हितच होतं असं आमचे बाबा नेहमीं सांगतात. हरिश्चंद्र, पांडव यांच्यासारख्यांनीं कष्ट भोगून स्वर्गपद मिळवलंच कीं नाहीं ? आमचे बाबा याबद्दल स्वतःच्या अनुभवाचं नेहमीं उदाहरण देतात. ”

अंतूच्या पांडित्यानें खुष होऊन, ‘ तें कोणतं रे ? ’ असें मीं विचारिलें.

अंतू म्हणाला, “ बाबांच्या शब्दांत सांगतों. ते सांगतात, अठरा सालीं इन्फ्लुएंझाची सांथ फार जोरांत आली होती. माझे चुलते कोंडूआण्णा नगरास आजारी पडल्याची तार आली तेव्हां तावडतोब तेथें गेलों. बारा तासांतच ते आटोपले. त्यांना पोहोंचवून परत येतों तों काकू आणि त्यांचा एकुलता एक मुलगा तापानं फणफणून आजारी पडलीं आहेत ! त्यांच्या शुश्रूषेचा कांहीं उपयोग झाला नाहीं. दोघां मायलेकांची स्मशानयात्रा बरो-

बरच झाली ! काकांची तान्ही मुलगी बरोबर पुण्यास आणली. तिला मुडदूस जडून सहा महिन्यांत निकाल ! काकू न् मुलगा यांना पोंचवून परत येतों तोंच बेळगांवाहून सासऱ्याची तार ! बेळगांवास मी पोंचायच्या आधींच सासरा गेला. त्याचा मुलगा म्हणजे माझा (अंतूचा) मामा दोन दिवसांनीं वारला ! दोन घरं साफ बसलीं ! दोन कुटुंबचीं वाताहत झाली ! पण देवाला याबद्दल दोष देण्याचं कांहीं कारण नाहीं देवानं हें आमच्या बऱ्याकरतांच केलं, कारण माझ्या चुलत आज्याचं नगरचं आणखी आजोबांचं बेळगांवचं अशीं दोन घरं आम्हांला मिळालीं, शिवाय दोन्हीकडचीं मिळून पंधरावीस हजारांची इस्टेट मिळाली ! तेव्हां देवाला निर्दय कोण म्हणेल ? ''

अंतूच्या बापाची नीतिमीमांसा ऐकून मी गार त्याचप्रमाणें नीतिबोधपर कथांच्या उपयुक्ततेबद्दलहि बराच साशंक झालों, आणि नीतितत्त्वें मुलांच्या मनांत ठसविण्याचा कांहीं नवीन मार्ग शोधून काढण्याच्या विचारांत गर्क झालों.

सकाळीं बनेश्वरची अवर्णनीय शोभा आम्हांला पहावयास मिळाली. विशेष माहितीकरितां सकाळच्या वर्णनावरील कोणतीहि कविता पहा. सकाळीं आम्ही दाट झाडींत खूप हिंडलों, एकदां कवाईतहि केली. पुष्कळ दमून आल्यावर कुंडांत अंघोळी केल्या आणि भातपोळ्या करण्यासाठीं चूल पेटविली. जेवणाचे आधीं मला ओवरींत एक जानवें सांपडलें. तें हातांत धरून मीं ओरडून मुलांना विचारलें, " अरे ए मूर्खांनो ! तुम्हांला जानव्याची तरी शुद्ध आहे का ? कोणाचं जानवं इथें पडलं आहे—अबदुल्याचं

आवाज करीत वीज पडून तें जमीनदोस्त झालें. मग तो मुलगा म्हणाला, ' अरेरे ! मीं व्यर्थ देवास दूषण दिलें. जर ही माशी मला न चावती तर या झाडाच्या खालींच राहून विजेनें जळून खाक होतों.' सांगा पाहूं या गोष्टीवरून काय शिकावें तें ! " मीं म्हटलें.

मैनाः—देव करतो तें आपल्या बऱ्याकरतांच करितो.

गोंदूः— गांधीलमाशीला जिवंत सोडूं नये.

अंतू—यांपैकीं मैनाबाळेचं तात्पर्य मला जास्त पसंत आहे. देव कधींहि आपलं नुकसान करीत नाहीं. कधीं कधीं प्रथमदर्शनीं त्याची करणी आपल्याला निर्दयपणाची वाटते; परंतु तिच्यापासून परिणामीं आपलं हितच होतं असं आमचे बाबा नेहमीं सांगतात. हरिश्चंद्र, पांडव यांच्यासारख्यांनीं कष्ट भोगून स्वर्गपद मिळवलंच कीं नाहीं ? आमचे बाबा याबद्दल स्वतःच्या अनुभवाचं नेहमीं उदाहरण देतात. "

अंतूच्या पांडित्यानें खुष होऊन, ' तें कोणतं रे ? ' असें मीं विचारिलें.

अंतू म्हणाला, " बाबांच्या शब्दांत सांगतों. ते सांगतात, अठरा सालीं इन्फ्लुएंझाची सांथ फार जोरांत आली होती. माझे चुलते कोंडूआण्णा नगरास आजारी पडल्याची तार आली तेव्हां ताबडतोब तेथें गेलों. बारा तासांतच ते आटोपले. त्यांना पोहोंचवून परत येतों तों काकू आणि त्यांचा एकुलता एक मुलगा तापानं फणफणून आजारी पडलीं आहेत ! त्यांच्या शुश्रूषेचा कांहीं उपयोग झाला नाहीं. दोघां मायलेकांची स्मशानयात्रा बरो-

बरच झाली ! काकांची तान्ही मुलगी बरोबर पुण्यास आणली. तिला मुडदूस जडून सहा महिन्यांत निकाल ! काकू नू मुलगा यांना पोंचवून परत येतों तोंच बेळगांवाहून सासऱ्याची तार ! बेळगांवास मी पोंचायच्या आधींच सासरा गेला. त्याचा मुलगा म्हणजे माझा (अंतूचा) मामा दोन दिवसांनीं वारला ! दोन घरं साफ बसलीं ! दोन कुटुंबची वाताहत झाली ! पण देवाला याबद्दल दोष देण्याचं कांहीं कारण नाहीं देवानं हें आमच्या बऱ्याकरतांच केलं, कारण माझ्या चुलत आज्याचं नगरचं आणखी आजोबांचं बेळगांवचं अशीं दोन घरं आम्हांला मिळालीं, शिवाय दोन्हीकडचीं मिळून पंधरावीस हजारांची इस्टेट मिळाली ! तेव्हां देवाला निर्दय कोण म्हणेल ? ''

अंतूच्या बापाची नीतिमीमांसा ऐकून मी गार त्याचप्रमाणें नीतिबोधपर कथांच्या उपयुक्ततेबद्दलहि बराच साशंक झालों, आणि नीतितत्त्वें मुलांच्या मनांत ठसविण्याचा कांहीं नवीन मार्ग शोधून काढण्याच्या विचारांत गर्क झालों.

सकाळीं बनेश्वरची अवर्णनीय शोभा आम्हांला पहावयास मिळाली. विशेष माहितीकरितां सकाळच्या वर्णनावरील कोणतीहि कविता पहा. सकाळीं आम्ही दाट झाडींत खूप हिंडलों, एकदां कवाईतहि केली. पुष्कळ दमून आल्यावर कुंडांत अंघोळी केल्या आणि भातपोळ्या करण्यासाठीं चूल पेटविली. जेवणाचे आधीं मला ओवरींत एक जानवें सांपडलें. तें हातांत धरून मीं ओरडून मुलांना विचारलें, “ अरे ए मूर्खांनो ! तुम्हांला जानव्याची तरी शुद्ध आहे का ? कोणाचं जानवं इथें पडलं आहे—अबदुल्याचं

तर नाहीं ? "

सर्व सैनिक खिदळूं लागले तेव्हां माझी चूक माझ्या ध्यानांत येऊन तिला थट्टेचें रूप देण्यासाठीं मीं म्हटलें, " का मैनाचं आहे ? " सर्वांचें खिदळणें थांबल्यावर मीं अंतू, गोंदू, चि. मोरू व चि. राघू यांना एकेकाला बोलावून त्यांचीं जानवीं जागेवर आहेत अशी खात्री करून घेतली. शेवटीं बुचकळ्यांत पडल्या-सारखा होऊन म्हणालों, " मग हा कोण गाढव कीं ज्याला आपलं जानव संभाळायची देखील अक्कल नाहीं ? जानवीं संभाळतां येत नाहींत न् हे महामूर्ख स्वराज्य मागतात ! ब्राह्मणत्वाचं चिन्ह-"

" आप्पा-" मोरू मध्येंच बोलला.

" मोरू ! किती वेळां बजावायचं कीं आपण स्काउटमध्यें आहोंत तोंपर्यंत मला सर म्हणायचं म्हणून " !

" सर ! तें तुमचंच जानवं असेल, " मोरू म्हणाला.

" माझं जानवं ? कद्धीं असं बावळटासारखं इकडेतिकडे पडा-यचं नाहीं. हें पहा-" सद्रा वर करून मी म्हणालों, " माझं जानवं जागेवर आहे. आं ! आंघोळ करतांना कंबरेला तर नव्हतं लावलं ? अरे पण कंबरेलाहि नाहीं. मग हेंच माझं कीं काय ? ओहो ! ते पहा मासे वर आले आहेत. अबदुल्या, तोंडाळा पाणी सुट्टं देऊं नको हो ! " मी विषय पालटण्यासाठीं कुंडांतले मोठे मासे दाखवीत म्हणालों.

पण पोरटीं कसलीं वस्ताद ! 'सर, आधीं जानवं घाला ना !' तीं ओरडलीं. जानव्याची ब्राह्मणसमाजाला खरोखर कांहीं आवश्यकता

आहे काय ? हा प्रश्न विचारणीय आहे.

जेवण, उष्टीं, खरकटीं झाल्यावर आम्ही लाडीसचा डाव खेळत होतों, तेथें दुपारीं तिहीच्या सुमारास कालचे प्रोफेसर सर्कसवाले आले व मला ' कॅप्टनसाहेब ' ! अशी हांक मारून त्यांनीं नमस्कार केला.

" कां प्रोफेसरसाहेब, उन्हाच्या वेळीं कोसभर कां मजल मारली ? "

" आपल्याला भेटायला, कॅप्टनसाहेब ! कालच आपण सांगितलं, कीं आपल्या बालचमूचं परोपकार आणि समाजसेवा हें कर्तव्य आहे आणखी आजच त्याची प्रचीत पहायची वेळ आली आहे कप्तानसाहेब ! "

" फार छान. आम्ही परोपकाराची संधि पहातच होतों प्रोफेसरसाहेब, पण काय करावं ? कुठें आग लागत नाहीं, पूर येत नाहीं, इन्फ्लुएंझासारखी सांथ यत नाहीं, कुछ नाहीं. आमची ही सफर फुकट जाते असं मला वाटत होतं. सांगा, सांगा, काय काम आहे तें प्रोफेसर ! "

" काम असं आहे, कॅप्टनसाहेब, " खाकरून प्रोफेसरांनीं सुरवात केली, " आज आमच्या सर्कशींत वाघ, अस्वल आणखी गाय यांचं सहभोजन आहे, असा कार्यक्रम लावून तिकिटं खपवलीं आणखी आतां अशी पंचाईत आली—ती आपल्याजवळ कशी सांगूं कॅप्टन ? "

" सांगा सांगा, संकोच करूं नका. मी वाघ न् अस्वलांचा बंदोबस्त ठेवीन, वाटलं तर प्रेक्षकांत बंदोबस्त ठेवतों—"

" बंदोबस्ताचं काहीं नाहीं हो, पण काय सांगू ? वाघ न् अस्वल यांची मारामारी होऊन दोघेहि दुखणाईत पडले आहेत ! "

" अरे वा, अस्वल बरंच धीट दिसतं आहे वाघाशीं भांडायला ! पण या मारामारीचं कारण काय ? "

" दुसरं काय कप्टन ? कनक नाहीं तर कांता ! "

" अहो पण वाघाचं न् अस्वलाचं भांडण या दोहोंपैकीं एकाहि कारणानं होणं शक्य नाहीं. कनक तर त्यांना निरुपयोगी आणि कांता तर भिन्न ! "

" तें चार पायांच्या वाघांचं न् अस्वलांचं झालं पण आमच्या सर्कशींतले वाघ-अस्वल आहेत दोन दोन पायांचे ! "

" म्हणजे काय ? "-चकित होऊन मीं.

" अहो, दोन डोंबारीच वाघाचं न् अस्वलाचं काम करतात ! आम्हांला कुठें खरा वाघ ठेवायची ऐपत आहे ! त्याचा रोजचा खुराक घालतांना आमचं अर्धं उत्पन्न खर्च होईल. "

" पण ती गाय तरी खरी आहे का ? का एकादा बहुरूपी गाईचं काम करायला ठेवला आहे ? "

" गाय खरी आहे हो ! सर्कशींत काम करून वर बिचारी शेरभर दूध देते आणखी दिवसभर लोकांच्या शेतांतून हिंडून आपलं पोट बाहेर काढते. गोमाताच ती ! "

" पण आतां या बनावांत मी काय करूं ? त्या डोंबाऱ्यांना औषधपाणी करूं ? फर्स्ट एडचं सामान आहे आमच्या जवळ. "

" ते दोघे अंथरुणाला खिळून आहेत. फर्स्ट एडनीं त्यांना काहीं व्हायचं नाहीं. आपल्याला आतां अशी विनंती आहे कीं,

आपल्या दोन सैनिकांना वाघ-अस्वलांचीं सोंगं घेऊन गरिबाला मदत करायला सांगा आणखी वेळ निभावून न्या कॅप्टनसाहेब ! गांवांतल्या कोणाला मीं चार पैसे देऊन बोलावलं असतं; पण त्यांच्या तोंडांत कांहीं रहायचं नाहीं न् माझी फजिती होईल. "

सर्व बालवीरांस समोर उभें करून त्यांना प्रोफेसरांची परिस्थिति मीं निवेदन केली. अबदुल्याला अस्वलाचें काम शोभण्यासारखें असल्यानें तें त्याला देण्याचें नक्की ठरविलें. वाघाच्या कामाला चार उमेदवार होते पण मला त्याची फार हौस असल्यानें तें मीं आपल्याकडे ठेविलें. लगेंच आम्हीं नसरापुरास गेलों.

अबदुल्यास व मला संध्याकाळीं पांच वाजतांच शिकारखान्यांत नेलें. बाकीच्यांची सोय सर्कस कंपनीच्या बिऱ्हाडांत केली होती. आम्हीं दोघांनीं वेष परिधान केले व शेजार--शेजारच्या पिंजऱ्यांत प्रवेश केला. मीं आजपर्यंत अनेक प्रकारचे वेष धारण केले होते, शाळेंत असतांना ग्यादरिंगच्या नाटकांत दासीसुद्धां झालों होतों; परंतु पशुवेष घेण्याचा हा पहिलाच प्रसंग. यामुळें फार गंमत वाटली; परंतु अंगाला खाजबीज सुटल्यास खाजविण्याची मात्र सोय बिलकूल नव्हती. सर्कशीच्या वेळेखेरीज इतर वेळीं सर्कशीचा शिकारखाना पहाण्याचा दर वेळीं आधा आणा देऊन पुष्कळ लोक जनावरें पहाण्यास येत. सर्वांत ज्यास्त प्रेक्षक माझ्याच पिंजऱ्यापुढें जमत. त्यामुळें मला बराच त्रास होत होता. 'हा वाघ तर लई मरतुकडा दिसतुया रं !' 'आरं, ह्यो तर बिबट हाय, वाहाग कसला आलाय् ?' अशा प्रकारची निंदाव्यंजक वाक्यें ऐकतांच राग येऊन मी डरकाळण्या फोडीं. त्या ऐकून माझ्या निंदकांचीं




सांपळ्यामध्यें व्याघ्र सांपडे बायकामुळें मारिती खडे !

तोंडें बंद होण्याऐवजीं ते म्हणत, ‘ हात् तुझं ! खायला मिळालं न्हाई का काय पंधरा दिवसांत ? या डुरकणीनं कोंबडं दिखील भ्यायचं नाहीं ! ’ मग मी खट्टू होऊन कोपऱ्यांत बसें. एका वेळीं एक बाई आपल्या मुलाला घेऊन शिकारखाना पहायला आली होती. मला पाहून तें मूल भ्यालें त्याची गंमत करण्यासाठीं मीं डुरकावणी फ़ोडली, तों त्या बाईनें एक खडा घेऊन मला मारला व मुलाच्याकडूनहि खडे मारविले. वाघास बोलतां येत नाहीं हें ध्यानांत न राहून मीं म्हटलें, “ हँ ! मार बया ! सांपळ्यामध्यें व्याघ्र सांपडे, बायकामुलें मारिती खडे ! ”

माझें वाक्य पुरें होण्यापूर्वींच त्या मानुषी वाणीनें बाई भयभीत होऊन ‘ भूत भू–भू -भू–भूत ’ करीत जमिनीवर पडली. लोक जमले; परंतु माझ्या सुदैवानें तिची दांतखिळी बसल्यानें माझें बेंड फुटलें नाहीं.

अबदुल्या अस्वलाचें काम सुरेख करीत होता. दोन पायांवर नाचणें, माणसांस विचुकल्या दाखविणें, सलाम करणें, त्यांनीं मारलेले खडे उलट त्यांना मारणें यांच्या योगानें तो फार लोकप्रिय झाला. अस्वलाच्या पिंज़ऱ्यापुढें सगळी गर्दी जमली, वनराज वाघास कोणी विचारीना. एक प्रकारें हें बरेंच झालें. मला वाघासारखें बसतां किंवा चालतां येत नव्हतें, डुरकून डुरकून तर घसा फुटण्याच्या बेतांत आला होता. त्यामुळें मला गर्दी सहन होईना. वसंत कुत्रा वासानें माग काढीत माझा पिंजरा शोधून बाहेरच येऊन बसला होता. राघूहि एकदां येऊन ‘ आप्पा तुम्हांला चहा हवा आहे का हो ? ’ असें विचारूं लागला.

प्रेक्षकांना ही भानगड समजेना. प्रोफेसर जवळच उभे होते ते म्हणाले, " हा मुलगा फसला ! वेडा रे वेडा ! याच्या मामाचं आडनांव वाघ आहे म्हणून याला वाटलं हा वाघच आपला मामा ! जा. बाळ तंबूत जा. "

रात्रीं दहाला सर्कस सुरू झाली. बाराला माझें काम सुरू झालें. मी माणसासारखा दोन पायांवर चाललों, कडयांतून उड्या मारल्या, अंतूनें हुकूम दिले त्यांबरहुकूम कवाईत करून दाखविली. वाघाचें इतक्या बुद्धीचें काम इतर कोणत्याहि सर्कशींत झालें नसेल.

शेवटीं सर्कशींतलें कळसकाम दाखविण्याचें राहिलं. नोकरांनीं तीन घडवंच्या ठेवून मध्यें एक वाटोळें मेज ठेवून दिलें. मग मला एका घडवंचीवर बसविण्यांत आलें. मीं गुरकावून आपली नापसंती दर्शविली. परंतु प्रोफेसरांनीं चाबकाचे फटकारे लगावल्यानें गप्प राहिलों. मग अस्वलाचा वेष घेतलेला अबदुल्या आला. तो मला पाहून भ्याला व गुरगुर करूं लागला. अस्वल कसें ओरडतें तें अद्याप त्याला माहीत नव्हतें, पण प्रेक्षकांनाहि तें माहीत नसल्यामुळें वेळ निभावली. अस्वलाच्या अंगावर केस दाट असल्यानें चाबकाचे फटकारे त्याला लागले नाहींत. पिस्तुलाचे दोन बार काढतांच तें उभें राहिलें व माझ्या समोरच्या घडवंचीवर बसलें. आम्ही दोघांनीं पंज्यांनीं एकमेकास बोचकारलें व जरा भांडण केलें. मग गाग आली व तिसऱ्या घडवंचीशीं उभी राहिली. आमच्यापुढें कांदे, कलिंगड, वांग्याचें भरीत वगैरे पदार्थ ठेविले. वाघ मांसाशिवाय कांहीं खात नसल्यानें कलिंगड

व भाजलेलें वांगें यांची योजना केली होती गाईकरितां गवत आणि आंबोण ठेविलें होतें. भोजनास प्रारंभ होतांच प्रेक्षकांतून टाळ्यांचा मोठा गजर झाला. परंतु वाघ व अस्वल नेहमींचे नाहींत असा गाईला सुगावा लागला. बराच वेळ ती आमच्याकडे आळी-पाळीनें बघून संशय दर्शवीत होती. थोड्या वेळानें खात्री होतांच तिनें माझ्यावर शिंगें रोखिलीं. मी गुरगुरलों व पंजे काढिले परंतु ती मुळींच घाबरली नाहीं. अस्वलानें तिला पंजा मारला, त्यासरशीं चवताळून ती त्याच्यामागें लागली. अबदुल्या चपळ असल्यानें तंबूच्या मधल्या खांबावर चढला. प्रेक्षकांस हा कार्यक्रमाचा भाग वाटून त्यांनीं टाळ्या दिल्या.

अस्वल हातचें निसटतांच गाईनें पुन: वाघावर हल्ला केला. मी आपलें व्याघ्रत्व विसरून दोन पायांवर धावून व “ अहो प्रोफेसर ! धावा धावा ! ” असें ओरडून गाईला चुकवूं लागलों. ‘ अरे लुच्चांनो, तरी आम्हांला संशय येतच होता कीं या वाघाच्या शेपटींत जीव कसा नाहीं ? ’ ‘ ही सर्कस का बहुरुप्याचा खेळ ? ’ ‘ अरे, हा वाघाचं कातडं पांघरणारा गाढव कशाला आला ? घ्या याचं कातडं हिसकावून ! ’ अशा आरोळ्या ऐकूं आल्या, सगळे प्रेक्षक उठले. त्यांनीं मला, प्रोफेसरांना व सर्कसवाल्यांना गराडा दिला. दहापांच जणांनीं माझा वाघाचा पोषाक हिसकावून घेतला आणि माझ्या शरीराचें जोरानें मर्दन चालविलें. त्या आनंदांत मला झोंप लागली.

* * * *

मी जागा झालों तेव्हां ऊन्ह फटफटीत पडलें होतें. कात्र-जच्या घाटांतून आमचा छकडा पुण्याकडे चालला होता. माझें

डोकें व हातपाय बंधनपट्टांनीं विभूषित झालीं होतीं. माझ्या उशाशीं चि. कु. मैना व पायाशीं चि. राघू अशीं चिंतातुर बसलीं होतीं. मोरू छकडा हाकीत होता. मागोमाग दुसऱ्या भाड्याच्या छकड्यांत जखमी झालेला अबदुल्या आणि अंतू-गोंदू असे होते. आमचा छकडा उपचारशकट बनला होता.

" आप्पा—नाहीं सर ! जागे झालांत कां ? बरं वाटतं आहे ना ? " मैनानें विचारलें.

" हो. बरं वाटतं आहे. महिन्याभरांत चालूं लागेन अशी खात्री आहे. आपण उपचाराचं सामान आणलं तें फुकट गेलं नाहीं हें पाहून मला आनंद वाटतो. "

आतां मी लवकरच बरा होऊन बालचमू दुप्पट उत्साहानें संघटित करीन. कारण डॉक्टर भांडारकरांनीं आपल्या दुसऱ्या संस्कृत पुस्तकांत म्हटलें आहे, विघ्नैः पुनः पुनरपि प्रतिहन्यमानाः । प्रारब्धमुत्तमजना न परित्यजन्ति ॥ तरी वाचकवाचिकांनीं माझ्या चमूंत सामील होऊन यांहून लांबलांबचे प्रवास व अघटित धाडसें करण्यास मला उत्तेजन द्यावें. तूर्त इतकेंच पुरे, फार बोलावयाचें नाहीं असें डॉक्टरनीं सांगितलें आहे.



# टिपा.

माझा मुंबईचा प्रवास—हा लेख १९१८ सालीं उद्यानांत प्रसिद्ध झाला.

विमा एजंटास चकविणें—ही गोष्ट १९२५ सालीं रत्नाकर नमुना अंकांत प्रसिद्ध झाली. यांतील प्रपोजल फार्म साताऱ्याच्या वेस्टर्न इंडिया विमा कंपनीच्या फार्मची नक्कल आहे.

लग्नसराई, यू. किडवे आय. सी. एस. हे लेख रत्नाकरांत १९२९ त प्रसिद्ध झाले. माझे दत्तक वडील रत्नाकरांत १९२६ सालीं प्रगट झाले.

वरसंशोधन हा लेख रत्नाकरांत १९२९ त प्रसिद्ध झाला.

माझा सेकंड क्लासनें प्रवास विविधवृत्ताच्या १९२८ च्या अंकांतून केला

अखेर लग्न जमलें तें रत्नाकरांत १९३० त.

गुलाब १९२८ त अरुण मासिकांत उमलली.

बोळवण केली यशवंत मासिकाच्या १९३० च्या साहित्य अंकांतून.

पहाऱ्याचें मूळचें स्थळ विविधवृत्ताचा १९२९ चा खास अंक.

रावसाहेब चिमणराव त्याच साप्ताहिकाच्या १९३२ च्या खास अंकांत अवतरले.

कॅप्टन चिमणराव यांची स्काउटमास्तरकी प्रथम १९२७ सालीं रत्नाकरांत गाजली.

# चिं. वि. जोशी यांचीं पुस्तकें.



**अडीच हजार वर्षांपूर्वीचा समाजः** - ‘ अडीच हजार वर्षांपूर्वी हिंदुस्थानची राजकीय, सामाजिक, शैक्षणिक, धार्मिक, वस्तु-विषयक, स्थिति काय होती याचें या निबंधांत सुंदर विवेचन केलें, आहे, तें प्रत्येक जुन्या इतिहासाच्या अभ्यासकानें वाचावें ” ( विविध-ज्ञानविस्तार ). “ हा लेख चांगला शोधकबुद्धीनें लिहिलेला आहे ” ( मराठी भाषेची घटना ). किं. ट. हं. सह २ आणे. दांडिया बाजार, बडोदें येथें लेखकाकडे मिळेल.

**इंग्रजी शिष्टाचारः**—इंग्रजी समाजांत वावरणाऱ्या हिंदी लोकांस फार उपयुक्त. श्री. सयाजीसाहित्य मालेचें, हें ७९ वें पुष्प आहे. किं. १४ आणे. रावपुरा, बडोदें, येथें कोठारी पुस्तक-विक्रेते यांचेकडे मिळतें

**मॅन्युअल ऑफ पालीः** – पाली भाषा शिकू इच्छिणाऱ्या विद्यार्थ्यांस फार उपयोगी. संस्कृत भाषेचें थोडें तरी ज्ञान असलेल्या विद्यार्थ्यांसाठीं लिहिलेलें असून पाली मजकूर देवनागरींत असणारें हें एकच व्याकरण आहे. मुंबई विद्यापीठांत मान्य. दुसरी आवृत्ति. किं. रु २. पुणें शहरांत ओरिएंटल बुक एजन्सींत मिळतें.

**संशयाचें जाळें आणखी कांहीं गोष्टीः**—पुणें येथील भारत महिला विद्यापीठांत पाठ्य म्हणून नेमिलेलें, परंतु डे. व्ह. ट्रा. सो. नें बक्षिसास अपात्र ठरविलेलें. “ पोट दुखेपर्यंत वाचकांना हास-विणाऱ्या कलेबरोबर त्यांचें हृदय हालविण्याची कलाहि प्रो. जोशी

यांनीं हस्तगत केली आहे....मार्मिकतेला रसिकतेची जोड असल्या-मुळें कथा वाङ्मयदृष्ट्या हि वाचनीय अशा वठल्या आहेत....यांनीं समाजाच्या व्यापक जीविताशीं समरस होऊन गोष्टी लिहिण्याचा केलेला उपक्रम पुढें चालवावा--" ( रत्नाकर मासिकांत वि. स. खांडेकर) "पुस्तक प्रवासोपयोगी असून क्षणभर करमणूक करील-" ( साष्टीसमाचार ). " लेखनशैली मनोवेधक, सुबोध व सरळ असून कथानकाबद्दलचें कौतूहल शेवटपर्यंत टिकतें-" (कोंकण). "संश-याचें जाळें रहस्यपूर्ण व चित्तवेधक असून फारच कुशलतेनें गुंफलें आहे. शेवटपर्यंत वाचल्याशिवाय पुस्तक खालीं ठेववत नाहीं. तिन्ही लघुकथा आधुनिक लघुकथेच्या व्याख्येंत तंतोतंत बसतात-" ( नवाकाळ ). " संशयाचें जाळें या कथेचें कथानक रंगविण्यांत लेखकाची कुशलता दिसून येत नाहीं. पिंटोची आत्महत्या आणि वाताहत या गोष्टी उत्तम आहेत-" ( महाराष्ट्र). " संशयाचें जाळें ही गोष्ट स्वतःच्या विशाल स्वरूपाप्रमाणेंच महत्त्वाच्या व मनोरमतेच्या दृष्टीनेंहि अग्रस्थान पावण्यास योग्य आहे....कथेचा प्रवाह अस्ख-लित असल्यामुळें वाचकांची चित्तवृत्ति त्यांशीं साहजिकच तन्मयता पावते....हें पुस्तक वाचकांना निःसंशय मनोवेधक व श्रेष्ठ प्रकारची करमणूक करून देणारें ठरेल " ( ज्ञानप्रकाश ). " प्रत्येक गोष्टींत कांहीं ना कांहीं तरी वैशिष्ट्य असल्यामुळें सदरहू ग्रंथ वाचनीय झाला आहे....हे निःसंशय मार्मिक व रसिक कथालेखक आहेत. त्यांच्या या संशयाच्या जाळ्यांत सांपडल्याबद्दल वाचकांना आनंदच वाटेल- " ( वैनतेय ). " सर्व गोष्टी सात्विक मनोरंजन करणाऱ्या असून त्यांत मधूनमधून....चा नेहमींचा विनोदी स्वभाव डोकाव-

ल्यावांचून रहात नाहीं-" ( विविधवृत्त ).

कापडी बांधणी. १६४ पृष्ठें किं १ रु. ट ह. ३ आणे. मुंबई ४ येथें परचुरे पुराणिक मंडळींत पुणें शहरांत महाराष्ट्र पब्लिशिंग हौसमध्यें व बडोदें येथें लेखकाकडे मिळतें.

**जातकांतील निवडक गोष्टी, प्रथमार्धः**—श्री सयाजी साहित्यमालेचें १८६ वें पुष्प " पाली भाषेंतील जातकांचा मराठी अनुवाद करून कथावाङ्मयांत एका सुंदर ग्रंथाची भर.... यांनीं घातली आहे—" ( सहविचार ). " हें भाषांतर अगदीं आज-तागायत असें झालें आहे—" ( वागीश्वरी ) " दि ट्रान्स्लेशन सीम्स टु बी टू लिटरल. दि बुक इज ए व्हॅल्युएब्ल ॲडिशन टु मराठी लिटरेचर "-( बॉम्बे क्रॉनिकल ). " तळ टीपेंत पाठभेद-दर्शक, अर्थनिर्णायक व संशोधनात्मक टीपा दिल्या आहेत त्यामुळें पुस्तक अधिकच संग्रहणीय झालें आहे "-( केसरी ). " गोष्टी नीतिबोध आणि मनोरंजन हीं दोन्ही कार्यें उत्कृष्ट करतील अशा आहेत "-( आनंद ) " सामान्य वाचकांबरोबर भाषेच्या अभ्या-सकांनाहि उपयोग व्हावा ही दृष्टि यांत ठेविली आहे--" ( ज्ञान-प्रकाश ). " इंग्रजी भाषांतर वाचून जें समाधान होऊं शकत नाहीं तें प्रस्तुत भाषांतर वाचून निःसंशय होतें या पुस्तकाला जी प्रस्तावना जोडण्यांत आलेली आहे ती बहुतेक मराठी वाचकांस नवीन धड्यासारखीच वाटेल "– ( प्रगति ) " अभ्यासाचें एक निराळेंच दालन.... यांनीं उघडून दिलें आहे"–( ऐक्य )

या पुस्तकास डे. व्ह. ट्रा. सोसायटी व इंदूर ग्रंथोत्तेजक मंडळ यांनीं बक्षिसें दिलीं आहेत. हें मुंबई इलाख्यांत प्राथमिक

शिक्षकांच्या लायब्ऱ्यांसाठीं आणि वऱ्हाड मध्यप्रान्तांत हायस्कुलांतून बक्षीस देण्यासाठीं मंजूर आहे. कापडी बां. ३४० पृष्ठे. ४ चित्रें. किं. पावणेदोन रु. ट. हं. चार आणे. मुंबई ४ येथें परचुरे पुराणिक मंडळी, पुणें शहरांत महाराष्ट्र प. हौसमध्यें किंवा बडोदें येथें लेखकाकडे मिळेल,

**एरंडाचें गुऱ्हाळ**:—" पाल्हाळीकपणाच्या दृष्टीनें पाहातां प्रस्तुत विनोदी पुस्तकाला हें नांव सत्यार्थानें लावण्यास चिंता नाहीं....त्यांतून हास्यरस मधून मधून पाझरत आहे–" केसरी. " एरंड गाळून रसनिष्पत्ति होणें अशक्य असलें तरी कलाचतुर पुरुष एरंडाच्याच गुऱ्हाळांतून मधुर हास्यरस कसा वाहवितो हें या पुस्तकावरून चांगलें दिसून येतें–" किर्लोस्कर, " एकंदरींत पुस्तकाचें नांव अगदीं सार्थ वाटतें"–चित्रमय जगत्. ........ह्या तिन्ही गोष्टींवरून....ची कल्पनाशक्ति किती मोठी आहे याचा अदमास लागतो––" सकाळ," ....हे कोल्हटकरां-प्रमाणेंच विनोदाच्या एका नवीन प्रकाराचे प्रवर्तक आहेत असें निःशंकपणानें म्हणतां येईल-" वसुंधरा. "... यांच्या विनोदांत मार्मिकपणा, सुटसुटीतपणा, व सूचकता हे गुण मुख्यत्वेंकरून आढळून येतात–" विविधवृत्त. " वाङ्मय या दृष्टीनें महाराष्ट्रांतील सर्व विनोदी लेखकांच्या लेखनाचा विचार करण्याची पाळी आली असतांना....यांनाच निःसंशय वरचा दर्जा द्यावा लागेल. सोप्या शब्दांत सुश्लिष्ट आणि मार्मिक विनोद करण्याची त्यांची हातोटी वाखाणण्यासारखी -आहे." ज्ञानप्रकाश. "उच्च दरजाचा शब्दनिष्ठ, प्रसंगनिष्ठ व स्वभावनिष्ठ विनोद उत्पन्न कर-

ण्याची कल्पकदृष्टि आणि प्रतिभा असल्यामुळें "–जागृति. " डॉक्टरांनीं आपल्या औषधाबरोबर हें पुस्तक रोग्यांना अवश्य द्यावें. मोठमोठ्या बिलांपेक्षां एक रुपयाच्या या पुस्तकानेंच त्यांना अधिक बरें वाटण्याचा संभव आहे–" वैनतेय. या पुस्तकास डे. व्ह. ट्रा. सो. नें फाटक बक्षीस बहाल केलें आहे किं १ रु. ट. ख. २ आणे. मुंबई येथें परचुरे पुराणिक मंडळी, मुंबईसच तु. पु. शेव्ये, पुणें येथें महाराष्ट्र पब्लिशिंग हौस किंवा बडोदें येथें लेखकाकडे मिळतें.

**सद्धम्मप्पकासिनीः**—महानाम थेरानें पटिसंभिदामग्गावर लिहिलेल्या पाली टीकेची रोमन अक्षरांत आवृत्ति. भाग १. किंमत १० शि. ६ पेन्स. पाली टेक्स्ट सोसायटी, गिल्डफोर्ड, सरे, इंग्लंद यांजकडे मिळते

संकल्पित पुस्तकें, ( १ ) गौतम बुद्धाचें मुलांकरितां चरित्र. (२) देवगिरी, स्थलवर्णनात्मक. (३) बुद्ध आणि त्याची शिकवण.



# प्रवासी नं. २२२

**आकारः**—उंची ७$\frac{१}{}$” लांबी १५$\frac{३}{४}$” रुंदि ११$\frac{१}{२}$

**कॅबिनेटः**—उत्कृष्ट टिक व प्लायवुडची ६ रेकार्ड ठेवण्याची सोय काळया, भुऱ्या, मरून, निळया, पिंगट रंगा-पैकिंच्या लेदरस्टनें मढविलेली अगर ओक, महो-गनी लांकडाची बनविलेली मिळूं शकेल.

**मोटारः**—डबलस्प्रिंग; वर्म ड्राईव्ह; नवीन तऱ्हेचा घडीचा हॅन्डल, काढघालीची कटकट नको; विशेष म्हणजे मोटार टर्नटेबलबोर्ड, इन्टर्नल हार्न, व कि हीं सर्व एक मशिनमेड युनिट आहेत. ऑटो ब्रेक

**टर्नटेबलः**—९”; कॅबिनेटच्या रंगांस शोभून दिसेल अशा मखमलीनें आच्छादित.

**टोनआर्मः**—वैज्ञानिकांचे मतें ध्वनि पुनरुत्पादन मुळा-बरहुकुम तंतोतंत करणारा, एस् आकाराचा; बॉल बेअरींग्जमुळें पिन एक टोंकापासून दुसऱ्या टोंकास सफाईनें हलत–जाते.

**साउंडबॉक्सः**—ऑपेरा फोन नं. १

**किंमत रु. १०२ सा. बॉक्स नं. १ सह**

**विक्रेतेः**—दामले ब्रदर्स, बडोदा.

**सोल एंजटस्ः—गेम्स मन्युफॅक्चरींग कं., मुंबई.**

